VIDNYANYUG
NOV-DEC 2000

RNI 16901 / 68 : Reg. No. PR/RNP/PNW/M/51/2000
Licence to Post without prepayment No. L-23



# विज्ञानयुग

दीपावली विशेषांक
नोव्हेंबर-डिसेंबर २०००
मूल्य ३५ रुपये



नवविज्ञानाच्या प्रगतीचा मागोवा घेणारे
आजचे आघाडीचे शास्त्रीय मासिक



## विज्ञानाचा प्रकाशदीप असाच उजळत राहो !

सप्रेम नमस्कार,

'विज्ञानयुग'चा हा तेहेतिसावा दिवाळी अंक.

याही अंकात मराठीतील नामवंत तसेच उगवत्या विज्ञान कथाकारांच्या विज्ञानकथा आणि तरुण व्यंगचित्रकार सारंग यावलकर यांची बोलकी व्यंगचित्रे सादर केलेली आहेत. श्री निरंजन घाटे यांनी करून दिलेला आयझॅक ॲसिमोव्ह यांचा परिचय आणि वानगीदाखल त्यांनीच अनुवादिलेल्या ॲसिमोव्ह यांच्या तीन लघुविज्ञानकथांचा विशेष विभागही या अंकात तुम्ही पहाल. अत्यंत साधेपणाने सादर केलेले हे ललित विज्ञान साहित्य आपणास आवडेल याची खात्री वाटते.

दीपावलीच्या या मंगलक्षणी आमच्या मनात कृतज्ञतेशिवाय काहीही नाही. अतिशय सातत्याने चालू असलेल्या या उपक्रमाला अनेक जणांनी भरभरून सहकार्य केलेले आहे याची जाणीव या क्षणी प्रकर्षाने होते.

आमचे लेखक, मुद्रक, चित्रकार, कागद व्यापारी, जाहिरातदार, वेळोवेळी 'विज्ञानयुग'ला मार्गदर्शन करणारे सल्लागार यांचे सहकार्य तर शब्दांनी वर्णन करण्यापलिकडचेच आहे.

या यशस्वी वाटचालीत सर्वात महत्वाचे सहकार्य आहे ते तुम्हा वर्गणीदारांचे. तुम्ही आम्हाला देत असलेल्या भक्कम आर्थिक आधारावरच 'विज्ञानयुग'ची वाटचाल नियमित होत आलेली आहे.

आपले सहकार्य आमच्या आगामी संकल्पांनाही लाभत रहावे ही प्रार्थना.

विसाव्या शतकातला हा अखेरचा दीपावली अंक.

आता आपण पुन्हा भेटणार आहोत ते १ जानेवारी २००१ रोजी.

त्यावेळी एकविसावे शतक सुरू झालेले असेल.

नव्या शतकारंभी काही नवे उपक्रम हाती घेण्याचा विचार आहे. या उपक्रमांनाही आपला प्रतिसाद लाभावा, ही प्रार्थना.

ही दीपावली आणि नूतन वर्ष आपणा सर्वांना आनंदमय आणि ज्ञान-विज्ञानमय होवो !

आता पुन्हा आपली भेट नव्या शतकात १ जानेवारी २००१ रोजी.

**गजानन क्षीरसागर**
**संपादक**



| संपादक | संपादन सहकार्य |
|---|---|
| **गजानन क्षीरसागर** | **अपूर्वा अ. क्षीरसागर** |

**मुद्रक प्रकाशक**
गजानन क्षीरसागर

**सल्लागार मंडळ**
प्रा. प्रभाकर सोवनी
निरंजन घाटे
द्वा. वा. केळकर
रमेश के. सहस्रबुद्धे
पु. ग. वैद्य

**मुद्रणस्थळ**
प्रिंटेक्स्ट
४६१/१, सदाशिव पेठ, पुणे ३०

**मुद्रण सहकार्य**
संजीव मुद्रणालय
४६९, सदाशिव, पुणे ३०.

**अक्षर जुळणी**
अभिषेक टाईपसेटर्स
१२४३, सदाशिव, पुणे ३०

प्रकाशनस्थळ : पत्रव्यवहार
**अनिरुद्ध साहित्य** : १४९३ क, सदाशिव, पुणे ४११ ०३०.
(टिळक स्मारक मंदिर चौक, व्हाईट हाऊसचे पिछाडीस.)
☎ दूरध्वनी : ४४७१००४

या अंकाचे मूल्य : ३५/- रुपये
वार्षिक वर्गणी : १५०/- रुपये
पंचवार्षिक वर्गणी : ६००/- रुपये


- **पंचवार्षिक वर्गणीदार व्हा आणि १५० रुपये वाचवा.**
- **वर्गणी मनीऑर्डर अथवा 'अनिरुद्ध साहित्य' या नावे डिमांड ड्राफ्टने पाठवावी.**
- **आपले सहकार्य आम्हाला बहुमोल वाटते; ते जरूर लाभावे.**


मराठी विज्ञान परिषदेने गौरविलेले शास्त्रीय मासिक




# विज्ञानयुग


संपादक
**गजानन क्षीरसागर**

**नोव्हेंबर-डिसेंबर २००० ☐ वर्ष ३३ ☐ अंक ३ व ४ ☐ क्रमांक ३८३-३८४**


## विज्ञानकथा विशेषांक : दीपावली २०००

### या दीपोत्सवी अंकातील विज्ञानकथा



**याशिवाय** : सारंग यावलकर यांची बोलकी व्यंगचित्रे

# टाइम मशीनची किमया

❑ जयंत नारळीकर

***भूतकाळात घडलेल्या घटनाक्रमात बदल घडवून आणला तर आजचे वर्तमान बदललेल्या भूतकाळाशी जुळणार नाही. हा ब्रह्मघोटाळा कसा दूर होणार ? त्यापेक्षा...***

आज दिवाळीच्या सुट्टीचा पहिलाच दिवस होता. आजचा दिवस तरी शाळेतून मिळालेल्या 'गृहपाठाकडे' लक्ष द्यायचे नाही, असा निर्धार करून लली आणि पिंट्या आपापली दप्तरे पलंगाखाली सारून अवांतर वाचन करीत होते. पिंट्या कुठले तरी इंग्रजी कॉमिक वाचत होता, तर लली 'चिंगी'चे पराक्रम वाचण्यात दंग होती. इतक्यात दाराची घंटा वाजली.

'पाहा कोण आलंय ते !' आईने स्वयंपाकघरातून फर्मावले. पण लली-पिंट्या कोणीच जागचे हालले नाहीत. आईच्या पहिल्या हाकेकडे दुर्लक्ष करायचे. दुसऱ्या हाकेला 'ओ' द्यायची, तर तिसऱ्या फर्मानालाच जागचे हलायचे हा त्यांचा अलिखित नियमच होता.

आणि आईलाही तो माहीत होता. तिने दुसरी हाक मारली.

'लले... पिंट्या... काय झोपलात काय? पाहा ना दार उघडून.'

'होय पाहते आई... 'थांब पाहतो' असे म्हणून दोघे भाऊ-बहीण एकमेकांना 'तू जा', 'तू जा' म्हणून खुणवू लागले.

'पिंट्या !' आईनेच निर्णय घेतला. तिचा निर्वाणीचा सूर ऐकून पिंट्याने दार उघडले. बाहेर कोणीच नव्हते... पण दाराशी पत्रे पडली होती.

'आई ग ! तो पोस्टमन होता... पत्रे टाकून गेलाय' पिंट्याने उचलली आणि त्यावरून नजर फिरवताच तो आनंदाने ओरडला, 'आई अरुणमामाचे पत्र आहे.'

पत्रांचा ढीग आईच्या हवाली करून त्याने ते पत्र सर्वात वर ठेवले. आईच्या नावे होते.

8, A IAT कॉलनी, पुणे
२० ऑक्टोबर

प्रिय सुलुताईस सा. न.

पत्र लिहिण्यास कारण की, मला आता कॅम्पसवर मोठे स्टाफ-क्वार्टर मिळाले आहे. नुकतेच सर्व सामान लागले. तेव्हा तुम्ही सर्वांनी पुण्याला ह्या सुट्टीत अवश्य येण्याचे करावे. जागा

भरपूर आहे. लली-पिंट्याना म्हणावे तुमची ती सगळी अफलातून टोळीच आणा.

केव्हा येता ते कळवा. थो. सा. न. ल.अ.आ.

तुझा अरुण

'पिप्पी ऽऽऽ'

आईने पत्र वाचून दाखवताच लली-पिंट्यांनी संयुक्त ललकारी ठोकली.

'केव्हा जायचं ?' .... पिंट्या.

'मी काही गरम फ्रॉक घेणार बरं कां... लली.

'सुंदर चंपीला पण बोलवू या... ' पिंट्या.

'आणि बाज्याला पण'... लली.

पिंट्या, लली, सुंदर, चंपी आणि तिसरा बाजीराव अशी ती अफलातून टोळी. पैकी सुंदर-चंपी आणि बाजीराव गारगोटीतले... खेडेवासी तर लली-पिंट्या मुंबई महानगरवासी. पण सुट्ट्यात एकत्र येऊन धमाल करायचे आणि वडिल माणसांच्या नाकीनऊ आणायचे. सडा फटिंग ब्रह्मचारी अरुणमामा ह्या टोळीला कसा तोंड देणार ?

'हे पाहा तुमचे कार्यक्रम ठरवण्यापूर्वी बाबांना विचारले पाहिजे... आम्हा दोघांना सुट्टी मिळेल असे नाही. आई, बाबा दोघे नोकऱ्या करीत असल्याने ही सबब नसून खरी अडचण होती. लली-पिंट्या क्षणभर खट्टू झाले. पण त्यांनी ह्या अडचणीवर तोडगे काढायला सुरुवात केली.

'तुम्ही आमच्याबरोबर शनिवार-रविवारपुरते या... पोचवायला आणि आणायला.' लली म्हणाली.

'आम्ही एकटेच जाऊ की... दोन वाजता सिंहगड एक्सप्रेसमध्ये बसलो की साडेसहाला पुण्याला.' पिंट्या उद्गारला.

'खरंच', लली म्हणाली, 'आणि आपण खरा सिंहगडही पाहणार ना?'

'तर काय ! आपण अख्खा गड चढणार.'

'अहो पुण्याला एकटे जाऊन गड सर करणारे ! आधी बैठकीची खोली आवरा', आईने फर्मान सोडले. बाबा आज लवकर म्हणजे दुपारच्या जेवणासाठी घरी येणार होते.. शनिवार असून त्यांना कधी कधी कामावर जावे लागे.

बाबांनी अनुकूल कौल द्यावा म्हणून लली-पिंट्यांनी बैठक आवरली आणि आईला पण जेवणाचे टेबल लावण्यात मदत केली.

बाबा आले.... आणि त्यांनी ललीच्या प्रस्तावाला मान्यता दिली. पण एका अटीवर. पुढच्या सात दिवसांत सगळे होमवर्क पुरे झाले तर पुढल्या शनिवारी सिंहगडने पुण्याला जाऊ.

लली-पिंट्या होमवर्क पुरे करायला धावले. पण त्यापूर्वी त्यांनी आपल्या टोळीतल्या



गारगोटीतल्या मेंबरांना पोस्टकार्ड टाकले.

○○○

सिंहगडच्या पायथ्याशी रम्य परिसरात असलेल्या इन्स्टिट्यूट ऑफ आर्मामेंट टेक्नॉलॉजी (थोडक्यात आय.ए.टी.) च्या प्रयोगशाळेत अरुणमामा एक शास्त्रज्ञ आहे हे लली-पिंट्यांना माहीत होते. पण तो नेमके कसले शोध लावतो याची त्यांना कल्पना नव्हती. मात्र सैन्याशी त्याचा संबंध येत असल्याने त्याचे संशोधन गुप्त स्वरूपाचे आहे हे त्यांना माहीत होते. तरी पण ह्यावेळी त्याची थोडी तरी माहिती काढायचीच असे दोघांनी ठरवले.

पुणे स्टेशनवर त्यांची गाडी पोचली, तेव्हा अरुणमामा वाटच पाहात होता. तो एक जीप घेऊन आला होता.

'काय ताई... तू आणि वसंतराव अशी धावती भेट का देतां ? थांबा ना आठवडाभर तरी' तो म्हणाला.

'अरुण... ही फक्त टेहळणीपुरती भेट समज ! आम्ही पुढे केव्हा तरी वेळ काढून येऊच,'' लली-पिंट्याचे बाबा उद्गारले.

'हे झाले राजकारणी लोकांचे उडवाउडवीचे उत्तर !' 'पुढे केव्हा तरी' हे तुमचे गेली दोन वर्षे ऐकतोय', अरुणमामा म्हणाला.

'मग मी सांगत्ये, रोखठोक उत्तर. मला वहिनी आण म्हणजे येते. केव्हा ते तूच सांग!' आई म्हणाली.

अरुणमामा लाजला. त्याला आणखी लाजवत वसंतराव म्हणाले, 'तू बरीच आहेस की ! त्याने तुला वहिनी आणली तर तू त्यांच्यात कशाला जाणार कबाबमें हड्डी बनून?'

अरुणमामाची सुटका लली-पिंट्यानेच केली. प्लॅटफॉर्मवर नजरेने शोध घेत घेत ते म्हणाले, 'मामा... गारगोटीची बस अजून नाही आली?'

'ती केव्हाच आली. तुझे दोस्त जीपमध्ये बसलेत. तुमची वाट पाहात...' अरुणमामाचे वाक्य पुरे व्हायच्या आत त्या दोघांनी प्लॅटफॉर्मवरून धूम ठोकली.

○○○

अफलातून टोळीची माहिती अशी. तीन वर्षांपूर्वी ती स्थापन झाली होती जेव्हा लली आणि पिंट्या आपल्या आजोळी गारगोटीला गेले होते. सुंदर आणि चंपी ही शेतकरी कुटुंबातली भावंडं तर बाजीराव हा पाटलाचा मुलगा. नाव बाजीराव (तिसरा बाजीराव त्याला म्हणत असत) पण स्वारी भयंकर भित्री होती. जरी ही पाच मुले सुट्टीत येऊन अनेक साहसांत भाग घेत असत, तरी प्रत्येक वेळी हे महाशय सर्वांत मागे असत. पण डोके वापरण्यात सर्वात पुढे, त्यामुळे अफलातून टोळीला आपले बेत आखताना तिसऱ्या बाजीरावाचा फायदा होई.

पिंट्या हा टोळीचा म्होरक्या... कुठल्याही साहसात तो सर्वांत पुढे. आजवर त्यांनी पुष्कळ धाडसात भाग घेऊन घरच्या मोठ्या मंडळींना जेरीला आणले होते. पण त्यांच्या धडपडीचा

शेवट सुखांत होत असल्यामुळे अद्याप टोळीवर बंदी आणली नव्हती.

आता पुण्यात आय.ए.टी. चे आवार पाहून सगळे खुश झाले. मोकळी जागा भरपूर, जवळच खडकवासल्याचे धरण, भोवताली डोंगर.... त्यात दुरून दिसणारा सिंहगड. तिसरा बाजीराव विशेष खूश.

'मी इकडे येणार म्हटल्यावर माझे बाबा म्हणाले, आपले पूर्वज ह्या भागात राहात होते... शिवाजी महाराजांच्या बरोबर खांद्याला खांदा लावून लढणारे विसाजी पाटील आमच्या घराण्याचे आदिपुरुष. तानाजीबरोबर सिंहगड काबीज करण्यात त्यांचा पण हातभार होता,' बाजीराव ऐटीत बोलत होता.

'हा बाज्या थापा मारतोय नाही का ग लले ?' चंपी म्हणाली.

'नाही तर काय ! पण जर खरोखर तशी हकीकत असेल तर मला वाटते शेलारमामाने दोर कापला नसता तर पळून जाण्यात पहिला नंबर असेल विसाजी पाटलांचा.'

ललीने अंधारात सोडलेला बाण लक्ष्यावर जाऊन लागला. बाजीरावच्या पणजीने सांगितलेली हकीगत अशीच होती. पण गोष्टीचा शेवट बाजीराव म्हणाला तसाच होता. शेलारमामाने दोर कापल्यावर विसाजी लढला होता.

'तुम्ही काही म्हणा, पण मी खरी घडलेली हकीगत सांगतोय' बाजीराव पोक्तपणे उद्गारला, 'म्हणून मला केव्हा गडावर जातो असे झाले.'

'पण मला आणखी एक ठिकाण पाहायचेय... अरुणमामाची प्रयोगशाळा.' पिंट्या म्हणाला.

'पण ती बाहेरच्यांना पाहू देत नाहीत ना?' सुंदरने विचारले.

'मामा परवानगी काढणार आहे', लली म्हणाली, 'नाही तर आपण काय शत्रूचे गुप्तहेर थोडेच आहोत?'

'गुप्तहेर ? बापरे ! तसला काही प्रकार असला तर आपण बाबा त्यापासून चार हात दूरच राहणार !' बाजीराव उद्गारला.

'घाबरली भित्री भागुबाई', चंपी म्हणाली.

'चंपे जरा डोकं वापर. आपण गुप्तहेर नाही, पण खरे गुप्तहेर आसपास असले तर ते आपल्याला पळवून नेतील आणि छळ करून आपण काय पाहिले ती सर्व माहिती काढून घेतील आपल्याकडून.' बाजीरावाचा खुलासा ऐकून पिंट्या जोरात हसला आणि बाजीरावाच्या पाठीवर बुक्की मारून म्हणाला, 'अफलातून टोळीचा कॅप्टन म्हणून मी तुला परवानगी देतो जर शत्रूने तुला पकडले तर तू छळ होऊ नये म्हणून सगळे काही पहिल्याच झटक्यात सांगून टाक! त्याने शत्रूची दिशाभूलच होईल.'

ooo



त्यांची सिंहगडावर स्वारी झाल्यावर दुसऱ्याच दिवशी अरुणमामा त्यांना प्रयोगशाळा दाखवायला घेऊन गेला.

प्रयोगशाळेत शिरण्यापूर्वी सर्वांना, अरुण मामाला देखील आपल्या प्रवेशपत्रिका दाखवाव्या लागल्या. अर्थात मुलांचे पासेस त्या भेटीपुरते होते तर अरुणमामाचा पास कायम स्वरूपाचा होता. त्यावर त्याचे छायाचित्र होते.

'मलादेखील हे कार्ड दरवर्षी मुदत वाढवून घ्यावे लागते आणि त्यातील छायाचित्र दर पाच वर्षांनी नवे लावावे लागते.' अरुणमामा म्हणाला.

'पण समजा तू दाढी वाढवलीस तर ?' ललीने विचारले.

'तर नवा दाढीवाला फोटो पाहिजे. मी जर त्या कार्डावरच्या फोटोसारखा नसेन दिसत तर मलासुद्धा आत प्रवेश नाही.'

अरुणमामा कशावर संशोधन करतो हे जरी अफलातून टोळीकरांच्या डोक्यावरून गेले तरी त्याच्या प्रयोगशाळेतली उपकरणे पाहून ते थक्क झाले. सीमेवर युद्ध सुरू झाले तर वापरायला, सुटसुटीत व अवघड जागेतून देखील प्रभावशाली ठरणारी शस्त्रास्त्रे बनवण्यात तो गुंतला आहे हे मात्र त्यांना कळले. अरुणमामा मोकळ्या मनाने माहिती पुरवत होता.

ते पाहता पाहता बाजीराव एका कोपऱ्यातल्या दालनाकडे जाऊ लागला. पण तेथे बंद दार असून त्यावर लाल रंगात धोकादर्शक कवटीचे चित्र होते. बाजीरावाने दार लोटण्यासाठी हात उचलला तेवढ्यात...

'हाँ ! बाजीराव तिकडे नाही जायचे.' अरुणमामा एकदम आवाज चढवून ओरडला.

बाजीरावाने हात मागे घेतला.

खोलीत शांतता पसरली आणि मुले थोडी थिजली. स्वतःला सावरून सौम्य स्वरात अरुणमामा म्हणाला.

'सॉरी ! मी ओरडायला नको होते. पण ती जागा खरोखरच टॉप सिक्रेट आहे. ते दार उघडायचे कसे ते फक्त मला माहीत.'

अरुणमामाने खिशातून एक लाल डायरी काढली आणि त्या दारासमोर जाऊन उभा राहिला. दारावर ० ते ९ व A ते Z अंक आणि अक्षरे असलेला एक 'की बोर्ड' होता. तो म्हणाला:

'हे दार उघडायचे असेल तर परवलीचे काही अंक आणि अक्षरे ठराविक क्रमाने दाबावी लागतात. तो क्रम मी ठरवतो आणि ह्या लाल डायरीत लिहितो. एरव्ही जर कोणी दाराला नुसता हात लावला तरी धोक्याची घंटा सिक्युरिटी सायरनवर वाजते आणि पहारेकरी दोन मिनिटांत हजर होतात.'

'पण की बोर्डला हात लावला तर सायरन वाजत नसेल' बाजीराव.

'जर चुकीचा क्रम वापरून बटणे दाबली तर वाजतो, एरव्ही नाही' असे म्हणून अरुणमामा

म्हणाला, 'चला आता कँटीनमध्ये जाऊ.'

कँटीन हे मुलांचे आवडते ठिकाण. नाहीतरी प्रयोगशाळेत ती आता कंटाळली होती. ती आनंदाने बाहेर पडली. जाता जाता पिंट्याने विचारले, 'मामा, जर तुला पूर्ण स्वातंत्र्य दिले तर तू कशावर प्रयोग करशील?'

मामा गंभीर झाला. किंचित विचार करून म्हणाला, 'मला अतिवेगवान रॉकेट बनवायला आवडेल... जे वापरून जवळजवळ प्रकाशाच्या वेगाने जाता येईल.'

'मी कुठेतरी वाचले की प्रकाशाच्या वेगाने आपण जाऊच शकत नाही' बाजीराव म्हणाला.

'शाबास ! प्रकाश वेगमर्यादा गाठता आली नाही तरी जर भरपूर इंधन असेल तर आपण त्या मर्यादेजवळ जाऊ शकू. अन् तसे झाले तर वेळ आणि अंतरे मोजण्याबाबतच्या आपल्या अनेक कल्पनांना तडे जातील. अल्बर्ट आईन्स्टाईन याने हा शोध लावला. त्याला सापेक्षतेचा सिद्धांत म्हणतात. समजा तू बाजीराव अशा यानातून गेलास आणि तुझ्या घड्याळाप्रमाणे तासाभरात परतलास तर इथे पृथ्वीवर वर्षेदेखील उलटलेले असेल.'

'हे कसे शक्य आहे ?' अफलातून टोळीवाले एकदम उद्गारले. 'आमची सर्वांची घड्याळे सारख्या वेगाने धावणार नाहीत का?'

'आईन्स्टाईनच्या सापेक्षतेच्या सिद्धांताप्रमाणे - त्याला थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी म्हणतात - जेव्हा दोन व्यक्ती परस्परांसापेक्ष वेगाने जात असतात तेव्हा त्यांच्या कालमापनात तसेच लांबी, अंतरे वगैरे मोजण्यात फरक असतो. लोकांना हे पटायला पुष्कळ वेळ लागला पण अखेर अनेक प्रयोगांती तो सिद्धांत मान्य झाला. मात्र त्याचे परिणाम बहुतांशी मूलकणांवर ... म्हणजे अणूच्या अतिसूक्ष्म घटकांवर तपासता आले.' अरुणमामा म्हणाला.

'आपल्यासारख्या माणसांवर का नाही?' सुंदरने विचारले.

'हे परिणाम दिसून यायला परस्पर सापेक्ष वेग पुष्कळ पाहिजे. आपण जेट विमानाने गेलो तरी आपला वेग ताशी हजार किलोमीटरपेक्षा कमीच असतो. त्या तुलनेत प्रकाशाचा वेग....'

'सेकंदाला तीन लाख किलोमीटर' बाजीराव उद्गारला.

'पाहा हा गारगोटीतला छोकरा तुम्हा मुंबईकरांवर ताण करतोय' लली-पिंट्यांना डिवचत अरुणमामा म्हणाला, 'आता पाहूया तुमच्यापैकी कोण एका तासात प्रकाश किती किलोमीटर जाईल ते सांगतो' कँटीनच्या टेबलाभोवती बसता बसता मामाने आव्हान फेकले.

ही बाजी पण बाजीरावानेच जिंकली. 'तासाला प्रकाशाचा वेग एक अब्ज आठ कोटी किलोमीटर.'

'शाबास ! तुला हा चॉकोलेटचा बार भेट!' अरुणमामाने एक कॅडबरी त्याला देत पुढे म्हटले, 'आपण हिशोब सोपा करण्यासाठी एक अब्ज धरू. म्हणजे प्रकाशाचा वेग जेट विमानापेक्षा दशलक्षपटीहून जास्त असतो. आईन्स्टाईनने भाकीत केलेले परिणाम पाहायला



वेगाचा हा मोठा पल्ला पार करावा लागतो. मोठ्या वेगाने मूलकण भिरकावणारी यंत्रे आज आपल्याकडे आहेत. ती प्रकाशाच्या वेगाच्या पुष्कळ जवळ जाऊ शकतात. (अशा यंत्रांना 'पार्टिकल अक्सेलरेटर' म्हणतात.) त्यांचा वापर करून सापेक्षतेचा सिद्धांत तपासून सिद्ध झाला आहे... तर मला शोध लावून असे इंधन हवे जे वापरून आपली यानेसुद्धा वेगाने जातील. पण हे माझे स्वप्न आहे. मला नाही वाटत आपण अजून त्या तंत्रज्ञानाच्या पातळीवर पोचलोय... किंवा पुढल्या पन्नास वर्षांत पोचू शकू.'

बाजीरावाचे डोके वेगाने काम करीत होते. तो म्हणाला, 'मामा, आपण असे यान तयार करून थोड्याच वेळात प्रवास करून एकदम भविष्यात पुढे उडी मारू शकू असे तुम्ही आता सांगितलेत. त्याकरिता प्रकाश वेगमर्यादेजवळ जावे लागेल. जर ही वेगमर्यादा ओलांडली तर ? मग आपण भूतकाळात पण जाऊ शकू ?'

इतर मुले ही कल्पना ऐकून हसायला लागली. पण अरुणमामा एकदम गंभीर झाला. 'आपण ही वेगमर्यादा गाठूच शकणार नाही. मग पार करण्याचा प्रश्नच कसा उद्भवेल? मूळ भारतीय शास्त्रज्ञ जॉर्ज सुदर्शन आणि इतरांनी अशी कल्पना मांडली आहे की, विश्वात टॅकिऑन नावाचे मूलकण असावेत जे नेहमी प्रकाश वेगमर्यादे पलिकडे असतात. त्यांना त्या मर्यादेखाली येता येत नाही.'

'मग झाले की ! आपण आपले रूपांतर टॅकिऑनमध्ये करून भूतकाळात जायचे, तेथे परत मूळ स्वरूपात रूपांतर करायचे आणि वेगाने जाणाऱ्या यानात बसून परत भविष्याकडे म्हणजे आजच्या काळात यायचे' बाजीराव म्हणाला.

'मी एक गोष्ट 'टाइम मशीन' म्हणून वाचली होती.' लली म्हणाली.

'होय ! मी पण. ती एच.जी. वेल्सनी लिहिली होती. त्यात एक यान होते. ज्यातून भूत आणि भविष्य दोन्हीकडे जाता येत होते.' - पिंट्या.

'मामा, तुमचे गुप्त संशोधन टाइम मशीनवर आहे का ?' चंपी.

'छट् ! मी आत्ताच सांगितले ना... अजून आपले तंत्रज्ञान भविष्याकडे जाण्याइतपतही प्रगत नाही. मग बाजीरावाची ही कल्पना ऐकायला रोचक असली तरी प्रत्यक्षात शक्य नाही.'

हे सांगून अरुणमामाने विषय एकदम बदलला आणि दुसऱ्या दिवशी कुठली ट्रीप करायची यावर चर्चा आरंभली.

○○○

अरुणमामाने एकदम विषय का बदलला?

बाजीराव ह्या प्रश्नावर डोके खाजवत होता. त्याला दाट शंका येत होती की, त्याला काहीतरी लपवायचे असेल. कदाचित त्याचे गुप्त संशोधन त्याच विषयावर असेल. नाही! असणारच. मनाची खात्री झाल्यावर त्याने ती शंका अफलातून टोळीवाल्यांपुढे मांडली. त्यांनी त्याला

मूर्खात काढले.

'तुझे काहीतरीच डोके चालते बाज्या' पिंट्या म्हणाला. 'अरुणमामा स्पष्ट म्हणाला आपले तंत्रज्ञान इथपर्यंत पोचलेले नाही.'

'आणि पुढली पन्नास वर्षे पोचणार नाही' - सुंदर.

'टाइम मशीन तर शक्यच नाही, असे तो म्हणाला.' - लली.

'आणि आपले संशोधन ह्या विषयावर नाही असे त्याने ठामपणे सांगितले नाही का?' - चंपी.

'ते सर्व आपली दिशाभूल करायला! पण मी म्हणतो ते खरे का खोटे ते तपासून पाहायला अवघड असले तरी अशक्य नाही. त्यासाठी एक साहस करावे लागेल!' बाजीरावाचे हे विधान ऐकून पिंट्या पोट धरून हसायलाच लागला.

'आज सूर्य पश्चिमेला उगवला, बरे का! स्वतः तिसरे बाजीराव साहस सुचवताहेत.'

बाकीचे पण त्या हशात सामील झाले, बाजीराव वगळता.

'बरं! ऐकू या तरी तुझी सूचना!' कॅप्टन ह्या नात्यानं कुठल्याही मेंबरची सूचना विचारात घेणे पिंट्याचे कर्तव्य होते.

'मी म्हणतो, आपण अरुणमामांच्या डायरीतून तो परवलीचा क्रम गुपचूप उतरून घेऊ. रात्री तो झोपल्यावर. मग प्रयोगशाळेत घुसून त्या गुप्त खोलीत जाऊ. जर टाइम मशीन असेल तर आपण त्यातून माझ्या पूर्वजाकडे, विसाजीराव पाटलांकडे जाऊन येऊ. पुन्हा दार बंद करून झोपू. सगळे रात्रीच्या रात्री गुपचूप होऊन जाईल' बाजीरावाने योजना मांडली.

त्यातला धाडसाचा भाग जरी टोळीला आवडला असला तरी तिचे एकंदर मत ह्याविरुद्ध होते. कारण अरुणमामा टाइम मशीन बनवत असेल ह्यावर बाजीराव वगळता कोणाचाच विश्वास नव्हता.

'योजना नामंजूर' पिंट्याने निर्णय दिला.

संध्याकाळी घरी परत येताना बाजीराव मनातल्या मनात पिंट्यावर आणि थोड्या प्रमाणात लली-चंपी-सुंदरवर चडफडत होता. आपली इतकी फर्स्टक्लास कल्पना त्यांनी अशी निकालात काढावी? केवढा मोठा चान्स गमावला त्यांनी. कारण अरुणमामाचे वर्तन विचारात घेता बाजीरावाची खात्रीच पटली होती की, त्या बंद दाराआड त्याने टाइम मशीनच लपवले होते आणि ते टाइम मशीन वापरून प्रत्यक्ष सिंहगड घेतानाचा प्रसंग पाहण्याचा मौका ह्या चौघांनी नाहक गमावला.

ह्या रागातून बाजीरावाच्या मनात एक वेगळेच धैर्य उत्पन्न झाले. ठीक आहे! जर ते चौघे येत नसतील तर आपण एकटे जाऊ.

एकटे?



अंधारातून प्रयोगशाळेत?

प्रयोगशाळेत 'त्या' धोक्याच्या दारापलीकडे?

दारापलीकडल्या त्या टाइम मशीनची जोखीम पत्करून?

रात्री झोपताना ह्या सर्व प्रश्नांना बाजीरावाने 'होय' असे उत्तर दिले. रात्री दोनला उठून हे धाडस करायचेच आणि आपण दुसऱ्या नाही तर पहिल्या बाजीरावाचे नाव घेतले हे जगाला दाखवायचे त्याने ठरवले.

○○○

रात्री जाग आल्यावर बाजीराव उठला. सर्वत्र सामसूम होते. 'ते' चौघे गाढ झोपेत होते. पलीकडच्या खोलीत डोकावून पाहता तेथे अरुणमामा झोपलेला होता. त्याचा कोट खुर्चीवर भिरकावलेला असून त्याच्या खिशातून 'ती' लाल डायरी डोकावत होती.

बाजीरावाने हळूच कोटातून डायरी काढली. आतली पाने चाळून त्याला एक अंकाक्षरांचा क्रम खाली रेघ मारलेला दिसला. तो त्याने एका कागदावर टिपून घेतला आणि बाहेरचे दार हळूच उघडून तो घराबाहेर पडला.

आज अंधाराची त्याला काही भीती वाटली नाही. सरळ तो प्रयोगशाळेच्या रोखाने निघाला. एकदा त्याला कसली तरी चाहूल लागली म्हणून त्याने वळून पाहिले... कोणीही त्याच्या मागावर नव्हते.... निदान अंधारात त्याला काही दिसले नाही.

पण चार आकृत्या त्याच्या पाठोपाठ येत होत्या.

प्रयोगशाळेत एक उघडी खिडकी त्याने सकाळी पाहिली होती ती आता पण उघडी होती. पहारेकऱ्याला (तो नाही तरी डुलक्याच घेत होता) चुकवून खिडकीतून आत जाणे सोपे होते. ते दार आता त्याच्या पुढे होते.

आत शिरल्यावर बरोबर घेतलेल्या बॅटरी टॉर्चने त्याने दारावरील बटणे नीट पाहून ठराविक क्रमाने दाबली. खरंच दार उघडेल का धोक्याची घंटा वाजेल?

त्याचा 'सस्पेन्स' फार वेळ टिकला नाही. ते दार सरकत सरकत भिंतीत लुप्त झाले. बाजीरावने टॉर्च लावून पाहिले.

त्याला अपेक्षित असलेले टाइम मशीन तिथे उभे होते.

एका गोल बशीवर दुसरी उलटी ठेवली तर जो आकार होईल त्या आकाराचे ते नक्कीच कसले तरी यान होते. प्रवेशद्वारातून तो आत शिरला.

एका बाजूला पॅनलवर सूचना लिहिल्या असून बटणे होती. बाजीराव त्या सूचना वाचण्यात गर्क असताना त्या चार आकृत्या पाठोपाठ यानात शिरल्या. क्षणभर स्वस्थ थांबून त्यांनी ठरल्याप्रमाणे जणू एकदम बाजीरावावर झडप टाकली.

'कसा पकडला!', ते चौघे एका स्वरात उद्गारले.

बाजीरावांची बोबडीच वळली. तरी कसाबसा टॉर्चचा प्रकाश त्याने त्या हल्लेखोरांवर

टाकला आणि मग आश्चर्याने ओरडला.

'तुम्ही !'

○○○

'होय आम्हीच.' पिंट्या म्हणाला, 'तुला काय वाटले तू असा आम्हाला चुकवून येऊ शकशील ?'

'पण तुम्ही तर गाढ झोपेत होता !' बाजीराव म्हणाला.

'तिघेजण फक्त. हा सुंदर झोपेचे सोंग घेऊन पडला होता.' चंपी म्हणाली.

'रात्री दहापासून आम्ही आळीपाळीने ही ड्यूटी तासभर केली. सुंदरची ड्यूटी संपता संपता तू उठलास.' लली म्हणाली.

'होय, पण तुम्ही माझी सूचना फेटाळून लावलीत आणि आता कसे...' बाजीरावाचे बोलणे तोडत पिंट्या म्हणाला, 'पण आम्हाला होती ना तुझी काळजी. तू काही तरी गोंधळ करून संकटात सापडलास तर आमची मदत तुला लागेल. नाही तरी अफलातून टोळी आजवर कधी फुटली नव्हती.'

ते सगळे आले याचे बाजीरावाला कौतुक वाटले आणि आनंदही झाला. नाही तरी त्या टाइम मशीनमध्ये शिरताना आपण एकटेच काय भलते साहस करतोय याची त्याला जाणीव झाली होती.

टाइम मशीनमध्ये ते पाचहीजण व्यवस्थित मावले. बाजीराव कंट्रोल पॅनल तपासून पाहात होता. तेथे दोन लिव्हर होते... लाल लिव्हरखाली 'भूतकाळ' तर हिरव्याखाली 'भविष्यकाळ' असे लिहिले होते. तसेच वर्ष, दिवस आणि महिना तसेच तास, मिनिटे आणि सेकंद हे एका अंकाच्या पॅनलसकट दिले होते. खाली लिहिले होते 'गन्तव्य वेळ.'

'म्हणजे ज्या वेळेत पोचायचंय ती' बाजीराव सुंदरच्या प्रश्नांकित चेहऱ्याकडे पाहात म्हणाला, 'मी तुम्हाला सिंहगड सर झाला त्या रात्रीच्या आदल्या रात्रीत नेतो.'

'पण तुला तारीख नक्की माहीत आहे ?' चंपाने विचारले.

'ती मी बाबांकडून ऐकलेली पाठ आहे' असे म्हणून त्याने सराईत विमान चालका- प्रमाणे पॅनलवरचे आकडे दाबले. त्याने दिलेली गंतव्य वेळेची माहिती एका टी.व्ही. मॉनिटरवर आली. तसेच 'निघायला तयार' असा संदेश फ्लॅश होऊ लागला.

'आता सीट बेल्ट लावून बसा' पिंट्याने ऑर्डर सोडली आणि स्वत: तिचे पालन केले. हॅण्डलजवळची सीट बाजीरावाने आधीच बळकावली होती.

'आता आपण निघालो' असे म्हणून बाजीरावाने लाल हँडल खाली केले. यान आवाज न करता गरागरा फिरू लागले आणि पाची प्रवासी चक्कर येऊन जागच्या जागी बेशुद्ध पडले.

○○○



ते शुद्धीवर आले तेव्हा त्यांना दिसले की यान स्थिर आहे. प्रत्येकाला प्रथम डोके गरगरतेय असे वाटत होते. पण हळू हळू सर्वांना 'नॉर्मल' वाटू लागले. आपण कुठे आले हे पाहायला त्यांनी हळूहळू यानाबाहेर पाऊल टाकले.

लांब अंधारातच टेकड्या दिसत होत्या... सिंहगडची टेकडी धूसर दिसत होती. पण आय.ए.टी.च्या इमारती नाहीशा झाल्या होत्या. जवळपास कुठलीच वसाहत नव्हती. दुरून कुठून तरी गाण्याचे व ढोलक्याचे आवाज येत होते. एकंदरीतच विजेचे दिवे नसल्याने काळोख फार जाणवत होता.

'आपण कुठे आलो रे?' सुंदरचा हात पकडत चंपीने विचारले.

'आपण होतो तिथेच आहोत... फक्त भूतकाळात जवळजवळ साडेतीन शतके गेलोय.... जर बाज्याने भरलेली माहिती बरोबर असेल तर' सुंदर म्हणाला.

बाजीराव आसपासची टेहळणी करीत होता. थोड्या वेळाने तो म्हणाला, 'आपण त्या गाण्याच्या दिशेने जाऊ. तिथे विसाजी पाटलांच्या लग्नाची पूर्वतयारी चालू आहे.'

'माहितगार माणसाप्रमाणेच बोलतो आहेस तू' पिंट्या म्हणाला.

'मी ऐकलेल्या गोष्टीनुसार तानाजीच्या रायबाचं आणि विसाजीचं ही लग्न एकाच मुहूर्तावर ठरली होती. परंतु रायबाचं लग्न कोंडाणा घेतल्यावरच करायचं ठरलं तसेच विसाजीचंही. आमचं गाव ह्याच भागात होते.... पाहूया माझा अंदाज बरोबर आहे का.'

सुमारे तासभार चालल्यानंतर ती टोळी नाचगाण्याच्या ठिकाणी आली. तमाशासारखे नाचगाणे ढोलक्याच्या साथीवर चालू होते. एका लोडाला टेकून एक तरुण ऐटीत बसला होता. इतर काही प्रतिष्ठित मंडळी त्याच्या दोन्ही बाजूला बसून नाचाला दाद देत होती. उलट बाजूला खेडुतांची गर्दी होती.

अफलातून टोळी त्या खेडुतांत सामील झाली.

काही वेळाने बाजीरावाने एका खेडुताला विचारले, 'लगीन हाय का कोनाचं ?'

'नवा दिसतूस इकडं' त्याच्याकडे पाहात खेडूत म्हणाला. 'विसाजी पाटलाचं लगीन ठरलुया त्याचा ह्यो तमाशा हाय.'

बाजीरावाने समाधानाने मान डोलावली. तो मागे वळला. इतक्यात तो खेडूत त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, 'कुठून आलास त्वा ? अन् हे चंगीभंगी कपडे कुठले ? का टोपीकराने दिले ?'

बाजीरावाला कल्पना सुचली. तो म्हणाला, 'आम्ही पाच मुले टोपीकराला रस्ता दाखवीत व्हतो. पन पुने जवळ आल्यावर त्येनी आम्हाला हाकलूनशान दिले. आता आम्ही कुठं जाणार हो,' त्याचा सूर ठराविक प्रमाणात रडवा झाला होता.

खेडुताला दया आली. तो म्हणाला, 'चला तुमाला पाटलांकडे नेतो. मोठा दिलदार हाय

तो' असे म्हणून त्याने हात पकडून बाजीरावाला मुख्य बैठकीकडे नेले. पिंट्या-सुंदर-चंपी-लली पण पाठोपाठ आल्या.

विसाजीपुढे दंडवत करून खेडूत म्हणाला, 'ही प्वारं आपल्या आसऱ्याला आलीत पाटील. टोपीकरांकडे व्हती त्यांनी रस्त्यावर सोडून दिल्यात.'

विसाजीने टोळीकरांकडे पाहिले. 'नावं काय तुमची ?'

'मी पिंट्या.'

'मी लली', पिंट्याची बहीण.'

'मस्नी सुंदर म्हनत्यात आन ही माजी भैन चंपी.,'

'अन् मी बाजीराव.'

'सुंदर आन् चंपी ठीक. पन् पिंट्या अन् लली ही कसली नावे ? टोपीकराने दिलीत वाटते... अन् बाजीराव हे नाव पन कोनावरून ठेवले ? त्यो बदमाश बाजी घोरपडे तर नाही? दुसरे बाजी देशपांडे अन् फासलकर देवमाणसे. पन् रावाची शेपूट कशापायी ह्या लहान वयात ?' विसाजीने विचारले.

'बाजीराव पेशवे होऊन गेले. त्यांच्यावरून हे नाव ठेवलं याचे. पण कुठं तो मर्द मराठा बाजीराव पेशवा अन् कुठे ही भित्री भागुबाई !' पिंट्या म्हणाला.

'तू मऱ्हाटी बोलतोस मुला तर नीट बोलना... अन् हा पेशवा बाजीराव कोन? मी नाय ऐकली त्येची मर्दुमकी ?' - विसाजी.

मुलांच्या लक्षात आले की, बाजीराव पेशवा अजून जन्माला यायचा होता. एकदम बाजीरावाला मोठी कल्पना सुचली. तो उत्तरला.

'त्यो पेशवा अजून जन्मला नाय ! सत्तर वर्सांनी तो मर्दुमकी गाजवणार' पिंट्याने 'हा काय मूर्खपणा' म्हणून बाजीरावाच्या पाठीवर चापट मारली.

'सत्तर वर्षांनी काय होणार त्यो तू आत्ता सांगुतयास? थापा की काय?' विसाजी म्हणाला.

'नाय पाटील. आम्ही टोपीकरांकडे होतो तेव्हा तेथे एक त्यांचा पाद्री आला. त्याने मला पुढचे पाहायची दृष्टी दिली.'

'थापा ! तुला बदडून काढतो म्हंजे येशील ताळ्यावर. सांग उद्या माजे लगीन होणार की नाय?' विसाजी हसत म्हणाला.

'नाय होणार. तुमचे नाय अन् रायबाचे बी नाय. उद्या तानाजीरावांना महाराज जोखमीचे काम देणार....'

अन् रायबाचे लग्न पोस्टपोन होणार !' पिंट्याने मध्येच तोंड खुपसले.

'पोटपोन मंजे काय ? तू कसली बोली बोलतुयास ?'

'टोपीकरांनी त्याला शिकविले' बाजीराव म्हणाला, 'उद्या पाहाच माजे म्हनने खरं ठरतुया की नाय. तानाजीरावांना महाराज कोंदाना सर करण्यास्नी जुंपनार. अन् मग तुमी पन जाल त्यांच्यासंगं.'

'कोंदाना किल्ला? त्यो तर अभेद्य हाय. त्यो कसा घ्यायला सांगनार महाराज?'

'आईसाहेबांना दिलेला शबद पाळायला.'

विसाजी आसपासच्या प्रतिष्ठितांकडे वळून म्हणाला, 'ऐकलेत ह्या प्वाराचे बोल... ठीक हाय. उद्या सूर्यास्तापर्यंत जर तू म्हनतोस ते झालं नाय तर तुज्या पाठीचं चामडं उधळील हा विसाजी.'

○○○

तो दिवस ती पोरं नजरकैदेत असल्यासारखी होती. बाजीराव तेवढा शांत होता... बाकीचे दोघे त्याच्या आगाऊपणाबद्दल चडफडत होते. समजा तानाजीकडून निरोप आला नाही तर....

पण उनं उतरणीच्या सुमारास खुद्द तानाजीच एका छोट्या सैन्यासह तेथे हजर झाला.

तानाजीने दिलेली माहिती तंतोतंत बाजीरावाच्या वर्णनाशी जुळत होती. विसाजी त्याला घेऊन आला.

'तानाजीराव त्यो पोरगा बघा. काल रात्री त्याने हे सर्व घडणार असे आमाला सांगितले.' तो म्हणाला.

'त्ये कसे शक्य हाय ? काल रात्री तर महाराजांनी मला बोलावले बी नव्हते.' तानाजी म्हणाला.

'त्येच तर सांगतुया म्या तुमाला. ह्या पोराला पुढचं दिसतं. तर सांग आता आमची रात्रीची मोहीम फत्ते होनार की नाई ?' विसाजीने विचारले.

बाजीरावाच्या डोक्यात एक अजब विचार आला. आपण इतिहास बदलू शकू का ? तो म्हणाला.

'तानाजीराव तुमी घोरपड लावून आडबाजूने किल्ला चढणार व्हय ना ?'

'तुला कसे कळले ?' तानाजीने चकित होऊन विचारले. कारण किल्ला चढण्याची ही कल्पना त्याने अद्याप कोणाजवळ बोलून दाखवली नव्हती. शेलारमामालाही माहीत नव्हते.

'ह्यो पोरगा अचाट हाय हे मी उगाच म्हनतो का ?' विसाजी कौतुकाने म्हणाला. तो आता स्वतःला बाजीरावाचा शोध लावणारा समजत होता.

'तर तुमी व्यवस्थित वर चढाल' बाजीराव म्हणाला. पुढचे शब्द तो अतिशय सावधगिरीने बोलत होता. 'पन पुढेच धोका आहे. सुभेदार उदयभान पार बलदंड हाय... त्याशी एकटे लढू नका... नाय तर गडापायी सिंह गमावल्याचे दुःख महाराजांचे माथी येईल.'

'म्हनजे मी लढाईत कामास येनार? त्यात काय ? शूराला त्येच मरण हवे असत्ये' तानाजी विचलित न होता उद्गारला.

'पन तानाजीराव, स्वराज्याचे मोठे काम त्यात महाराजांना तुमचा पुढे पण उपयोग होईल. जिता सिंह मेलेल्या सिंहापेक्षा जास्त उपयोगी नव्हं का?' बाजीराव म्हणाला.

'छोकरा बरोबर म्हनतोय ! तानाजीराव हा विसाजी तुमच्यामागे सावलीसारखा राहील.... पाहू या उदेभान काय करतो ते.'

'ठीक आहे विसाजी... पण लक्षात ठेव. मला दगा होणार आसंल तरच त्वा आमच्या लढाईत पडायचंस.' तानाजीने निक्षून सांगितले.

○○○

सिंहगडावर भगवा झेंडा फडफडताना जसा शिवाजी महाराज आणि जिजामातासाहेबांनी पाहिला तसाच विसाजीच्या गावातून अफलातून टोळीने पण. मोहीम फत्ते झाली खरी. गड आला, पण सिंहाचे काय झाले ?

प्रश्नाचे उत्तर दुसऱ्या दिवशी मध्यान्हीच्या सुमारास मिळाले. गडावरून मावळ्यांची एक तुकडी विजयोल्लास दर्शवीत गावात आली. पण तुकडीच्या म्होरक्याचे तोंड काळवंडलेले होते आणि तो म्होरक्या दुसरा तिसरा कोणी नसून होता तानाजी मालुसरे.

गावकऱ्यांनी त्यांचे स्वागत केले. पण काही तरी अनिष्ट घडले याची त्यांना कल्पना आली.

'ती पोरं कुठं हायत?' तानाजीने विचारले.

बाजीरावास पुढे करून अफलातून टोळी त्याच्यासमोर उभी राहिली. आपल्या सावधगिरीच्या सूचनेमुळे तानाजी जिवंत आहे याचे बाजीरावाला समाधान वाटत होते. पण विसाजी पाटील कुठे होता ?

'मुलांनो ! विशेष करून बाजीराव... तुझ्यामुळे मी वाचलो. त्याबद्दल तुझे खूप आभार.... पण फार मोठी किंमत मोजावी लागली मला..... विसाजी.... विसाजी पाटील- माझा तरुण दोस्त आज नाही - माझ्यावर दग्याने घातलेला वार स्वतःवर घेऊन तो स्वर्गात गेला. वार करणारा उदेभान.... त्याला मी कापून काढला पन् .... त्याने माझा विसाजी मला परत कसा मिळनार ?'

तो मर्द मराठा अक्षरशः रडू लागला. विसाजी पाटलाचे सारे गाव त्या शोकात सामील झाले.

बाजीराव सुन्न उभा होता. त्याला कालची विसाजीची उमेदीने भरलेली आकृती दिसत होती आणि त्याला कारण अभावितपणे बाजीरावच होता. शिवाय त्याच्याचमुळे त्याच्या घराण्याच्या मूळ पुरुषाचा अंत झाला होता.

○○○

'चल बाज्या .... आता परत जाऊ !' पिंट्याने त्याच्या खांद्यावर हात टाकून त्याला टाइम मशीनच्या दिशेने वळवले. बाजीराव एका अज्ञात कल्पनेने अस्वस्थ होता.



टाइम मशीन संथपणे उभे होते. भविष्यात पुढे जाण्यासाठी. योग्य तारीख आणि वेळ पॅनलवर मांडल्यावर हिरवे हॅण्डल फिरवणार इतक्यात बाजीरावाला ज्या कल्पनेने अस्वस्थ केले होते ती आता त्याच्या अंतर्मनातून पुढे आली.

जर लग्न न होताच त्याच्या घराण्याचा मूळ पुरुष मेला तर त्याचा वंशवृक्ष वाढला कसा ? आणि आज त्याचा वंशज बाजीराव अस्तित्वात तरी कसा आला ?

थोडक्यात, टाइम मशीनमधून भूतकाळात जाऊन त्याने जी ढवळाढवळ केली होती त्यामुळे आजचे वर्तमान त्या बदललेल्या भूतकाळाशी मुळीच जुळत नव्हते. हा ब्रह्मघोटाळा कसा दूर होणार ?

यान अजून गरगर फिरायचे होते. कारण अजून हिरवे हॅण्डल त्याने हालवले नव्हते. पण त्याचे डोके गरगरायला लागले.

'हात खाली ओढ, बाज्या.... आपल्याला निघाले पाहिजे.' पिंट्याचा आवाज त्याच्या कानी आला.

'हात खाली ओढ.'

'हात हालव.'

इतरांनी गिल्ला केला.

'बाज्या ऊठ !' कसले स्वप्न पाहतोस?'

अरुणमामाच्या शब्दांनी बाजीरावाला जाग आली.... म्हणजे ते टाईम मशीन खरे नव्हते....

○○○

'आता तुम्हाला पटेल टाइम मशीन प्रत्यक्षात का बनवता येणार नाही' बाजीरावाची स्वप्नगाथा ऐकून अरुणमामा म्हणाला, 'कारण मग कोणीही भूतकालात जाऊन बाज्याने केली त्याप्रमाणे घटनाचक्राशी ढवळाढवळ करेल आणि ज्या कार्यकारणभावामुळे सृष्टीचे व्यापार चालतात तोच नाहीसा होईल. काल असे झाले म्हणून आज अमूक घडले हे आपण म्हणू शकतो तसे म्हणता येणार नाही...

'माझा गुप्त शोध कशावर आहे ते तुम्हाला कळले नसले तरी बाजीरावाला लागलेला हा शोध नक्कीच 'टॉप' आहे.

◆◆◆

(श्रीविद्या प्रकाशन प्रकाशित, लेखकांच्या 'टाइम मशीनची किमया' या कथासंग्रहातून साभार पुनर्मुद्रण)

**ही दीपावली विज्ञान जागरणाची होवो !**
**लक्ष लक्ष विज्ञानदीपांच्या प्रकाशाने भारत बलशाली व्हावा**
**आणि जगाचा कानाकोपरा या प्रकाशाने उजळावा हीच शुभेच्छा !**




## विचारवंतांनी व्यक्त केलेल्या साधक बाधक मनोगतांचा आकाशानंद यांनी केलेला पद्यानुवाद

**महात्मा गांधी**
राजकारणात तत्त्वनिष्ठा असावी -
विज्ञानाने विश्वबंधुत्व मान्य करावे -
उद्योग, व्यापार-सरळ स्वच्छ असावा -
विज्ञानाने जगाला जगवावे, मारणे टाळावे !

**पंडित नेहरू**
धर्माचा संबंध कर्मकांडांशी किंवा
विचारप्रणालींशी नाही,
त्याचे दृढ नाते केवळ उच्च अशा
आदर्शांशीच आहे -
विज्ञान आणि धर्म यांत कोणताही
विरोध मुळीच नाही,
धर्म आणि विज्ञान यांचा समन्वय
भारताला साधायचा आहे !

**प्रेसिडेंट आयसेनहॉवर**
विज्ञाननिष्ठ देश अण्वस्त्रांची निर्मिती करतो -
म्हणजे केवळ पैसाच खर्च करतो
हा समज चुकीचा
तो अपव्यय करतो
कष्टकरी लोकांच्या घामाचा
आणि दीप विझवतो
भावी पिढ्यांच्या आशांचा !

**भारतरत्न अब्दुल कलाम**
व्यक्तीची जडण घडण संस्कार करतात,
स्वदेशी विज्ञानाची संकल्पना मी साकारली -
अग्नी, पृथ्वी, आकाश, त्रिशूळ, नाग क्षेपणास्त्रे-
संपूर्णतः स्वदेशीची कास धरून निर्माण केली !

**डॉ. रघुनाथ माशेलकर**
विज्ञानविकास-प्रकल्प । सतत चालू ठेवावेत,
ऱ्हास करणारे प्रकल्प मात्र । त्वरित थांबवावेत
देशाने पर्यावरणाकडे दुर्लक्ष मुळीच करू नये
निसर्ग संरक्षणाची कामे विज्ञानाने सुरू ठेवावीत






**शंकराचार्य जयेंद्र सरस्वती**
आधुनिक तंत्रज्ञानाने जग जवळ आले आहे,
विज्ञानाने सर्वत्र भरपूर प्रगती केली आहे,
तरीही धर्मप्रचारासाठी धर्मपीठे हवीतच -
त्यांचे स्थान अबाधित रहायला हवे आहे !

**डॉ. जयंत नारळीकर**
गणेशमूर्ती दुग्ध प्राशन करते -
यात कसलीच कमाल नाही,
पण वार्ता क्षणार्धात जगात पसरते,
यात मात्र विज्ञानाची कमाल आहे !

**शॉपेनहॉवर**
विश्वाच्या मुळाशी काय असेल ?
एकता, फक्त अभिन्नता आहे,
पण विज्ञानाला याची जाणीव नाही -
त्यामुळे क्रांतीची अपेक्षा व्यर्थ आहे !

**भक्तिवेदान्त स्वामी प्रभुपद**
कृष्ण सर्वश्रेष्ठ वैज्ञानिक आहे -
कारण त्याला कार्यकारण भाव समजतो -
चमत्कारांवर विश्वास अज्ञानी ठेवतात,
त्यांना प्रकाशझोतच सूर्य भासतो !

**प्रो. थॉमस आईस्नर**
वैश्विक संहार म्हणजे निसर्गाचे एक सुंदर पान
निखळणे नव्हे
तर चिरकाल टिकू शकणाऱ्या जैव विविधतेतील
सातत्याचा नाश आहे
विज्ञानामुळे अक्षय टिकू शकणाऱ्या महत्त्वपूर्ण
अशा अनेक परिसंस्थांतील -
जननिक वैविध्यांची, चमत्कृतीपूर्ण महत्त्वपूर्ण
विविध रसांची ऱ्हास प्रक्रिया आहे

**साने गुरुजी**
मी विज्ञानाचे स्वागतच करतो,
तथापि नियोजनाचा केंद्रबिंदू मात्र -
सामान्य माणूसच असला पाहिजे,
त्यासाठी वापरले जावे विज्ञानाचे तंत्र !

**आल्बर्ट आईन्स्टीन**
एखाद्या पदार्थाची अर्धा पौंड शक्ती -
अनियंत्रित केली तर ती समतोल होते -
सात लाख टनाच्या विस्फोटन शक्ती एवढी !
माझ्या सापेक्षता सिद्धांताची हीच व्याख्या होते!



## 'विज्ञानयुग' ला तुमचे हे सहकार्य हवे

गेली बत्तीस वर्षे नियमितपणे प्रकाशित होत असलेल्या या मासिकाच्या वाटचालीत तुमचा सहभाग आम्हाला हवा आहे. या मासिकासाठी आपण खालीलप्रमाणे आपल्या आवडीनुसार सहकार्य करू शकाल.

❒ **पंचवर्षिक वर्गणीदार व्हा : 'विज्ञानयुग'** ची पंचवार्षिक वर्गणी रु. ६००/- एक रकमी भरून विज्ञानाचा हा ठेवा घरपोच मिळवा.

❒ **'विज्ञानयुग' चे प्रसारक व्हा. :**
'विज्ञानयुग' ची माहिती आपल्या मित्रपरिवाराला कळवा. तुमच्याकडे येणारे अंक त्यांना दाखवा आणि या मासिकाचे वर्गणीदार होण्यासाठी त्यांना विनंती करा. अशा मित्रपरिवाराची नावे व पत्ते आम्हाला कळविल्यास आम्ही देखील आपला उल्लेख करून त्यांचेशी पत्रव्यवहार करू.

❒ **आपणास लेखन करावेसे वाटते ?**
**'विज्ञानयुग'** मधे कोणत्याही शास्त्रीय विषयावरील सोप्या मराठीत लिहिलेले लेखन आवर्जून प्रकाशित केले जाते. आपणास लेखनाची आवड असल्यास आपले शास्त्रीय लेखन 'विज्ञानयुग' कडे जरूर पाठवा. पसंतीनुसार ते अवश्य प्रकाशित केले जाईल.

❒ **आपणास शास्त्रीय प्रयोगांची आवड आहे ?**
आपण स्वतः काही शास्त्रीय प्रयोग केलेले असतील तर त्यांची माहिती आकृतीसह आमचेकडे पाठवा. योग्य प्रयोगांना अवश्य प्रसिद्ध देऊ.

❒ **विज्ञान दृष्टिकोन** समृद्ध करण्यासाठी आपण काही विशेष उपक्रम करीत असाल तर त्याची माहिती आम्हाला जरूर कळवा.

❒ **'विज्ञानयुग' चे चिकित्सक वाचक व्हा.**
'विज्ञानयुग' चे अंक बारकाव्याने वाचा. अंकात आणखी काय यायला हवे याच्या सूचना पाठवा.

**'विज्ञानयुग' हे आपलेच मासिक आहे,**
**तुमचे सहकार्य आम्हाला खूप मोलाचे ठरेल.**



# अस्तित्व

❒ **डॉ. संजय ढोले**

***संपूर्ण पांढऱ्या वस्त्रातला केतनचा देह केतकीनं पाहिला त्याच्या कॉटशेजारीच तो यंत्रमानव उभा होता. डॉ. शिरीषांचा हा प्रयोग यशस्वी व्हायलाच हवा असे तिला मनोमन वाटत राहिलं......***

केतकीनं हळूच त्याच्या केसातनं बोटं फिरवली आणि त्याची थंड व केविलवाणी नजर बघून तिचे मन हेलावून गेलं. नजरेतले भाव तिला सहज कळले. तशी तिनं आपली नजर वळवून समोरील खिडकीतनं आसमंतात भिरकावली आणि शून्यातलं भावविश्व ती शोधीत राहिली. केतकीनं हळूच त्याचा हात दाबला. संवेदनाहिन ... तिला सर्व माहित असतांनाही तिनं तो दाबला. तिला त्याला धीर द्यायचा होता.

आजपर्यंत ती हेच करीत आली होती, की यातनं स्वतःलाच धीर देत आली होती?... तिलाच कळत नव्हतं. मन व्याकुळ होत होतं. कंठ दाटून येत होता. हा जीवनाचा एक भागच झाला होता. निपचीत पडलेल्या त्याच्या देहावरनं तिनं हलकेच नजर फिरविली. आणि त्याचा चेहरा ओंजळीत घेऊन प्रेमानं न्याहाळला. तोही संवेदनाहिन नजरेनं पहात राहिला. मनात प्रचंड कोलाहल घेऊन तिच्यापर्यंत आपले भाव पोचवण्याचा प्रयत्न करीत राहिला. पण ते केवळ अशक्य होतं. तो फक्त विचार करू शकत होता. बाकी सर्व त्याचं असूनही नसल्यासारखं होतं. म्हणून केतकी जवळ असूनही आता तो कित्येक प्रकाशवर्षं दूर होता! त्याच्या मनातील द्वंद्व केतकी जाणत होती. पण त्यासाठी ती काहीच करू शकत नव्हती. तिनं जे जे शक्य असेल ते सर्व केलं. आयुष्यही पणाला लावलं. विज्ञानाच्या परिसीमाही गाठल्या. पण तो दूर होत गेला. .. लांब अगदी क्षितिजापलीकडे. आज हॉस्पिटलमध्ये येऊन सहा महिने होतील.... पण त्याच्या परिस्थितीत काहीही बदल झाला नव्हता. तिला तो दिवस आजही जसाच्या तसा आठवत होता... अपघाताचा .. अंगावर काटा उभा करणारा आणि आयुष्यालाच कलाटणी देणारा.

.... उमद्या केतननं नको म्हणत असतांनाही लग्नाच्या वाढदिवसानिमित्तानं महाबळेश्वरला जाण्याची योजना आखली होती. लग्नाला दोन वर्षं पूर्ण झालेली. रात्रीचेच दोघे निघाले. ड्रायव्हिंगचं वेड असलेला केतन भरधाव वाऱ्यासारखा निघाला होता. शेजारी केतकीच्या

अस्तित्वानं व बाहेरील चांदण्यांच्या साक्षीनं तो अजून उल्हासित झाला होता. मनात ठरलेल्या वेळी त्याला महाबळेश्वर गाठायचं होतं. पण रस्त्यातच एका वळणावर, समोरून अचानक येणाऱ्या मोटारीच्या प्रखर दिव्यांनी त्याचा अंदाज चुकवला व पुढे एका भयावह प्रवासाला सुरूवात झाली. अपघात झाला. केतकी आश्चर्यकारकरित्या वाचली, तर केतनच्या डोक्याला जबर इजा झाल्यानं तो तत्काळ बेशुद्धावस्थेत गेला. नजीकच्या लोकांनी धावपळ करून दोघांनाही पुण्याच्या हॉस्पिटलमधे दाखल केलं. केतकी तत्काळ बरी झाली पण केतन मात्र बेशुद्धावस्थेतून एका वेगळ्याच विश्वात येऊन पडला होता. मार लागल्याने त्याच्या मेंदूतील मज्जासंस्था व स्नायूंमधे बिघाड झाल्याने, त्याचं सर्वांग पक्षाघातानं ग्रासलं गेलं. डॉक्टरांनी अथक परिश्रम केले. अनेक शस्त्रक्रिया केल्या पण यश आले नाही. केतनचं सगळं शरीर लुळं पांगळं झालं. वाचाही गेली. फक्त अस्तित्व टिकलं एवढंच.

आज सहा महिने होऊन गेलेत. केतकीनं दीर्घ श्वास सोडून पुनश्च केतनकडे पाहिलं. ऐन तारुण्यात केतनच्या वाट्याला आलेलं दुःख पाहून तिचं मन कासावीस झालं. अंधकारमय भविष्य. आता फक्त तो साथीला असल्याचा भास. पण तो कसा का असेना, त्याचं अस्तित्वच तिला पुढील भविष्य काढायला पुरेसं होतं. तेवढ्यात नेहमीची कामे करणाऱ्या शांताबाईंनी प्रवेश केला. खोली झाडून, पुसून घेत म्हणाल्या.

''चला, बाई ऽ ऽ... साहेबांना उचलायला मदत करा !''

केतकी यंत्रवत् उठली. तिलाही याची सवय झाली होती. मन हळूहळू सर्वच स्वीकारत होतं. आत याच शांताबाई बघा ना !... अपघात झाला त्यावेळी किती आपुलकीनं बोलत होत्या. मायेनं धीर देत होत्या. तुमचे यजमान नक्की बरे होतील म्हणून आशादायी बोलत होत्या. पण कालांतराने सहानुभूतीनं बोलणं कमी झालं. - नेहमीचंच झाल्यानं, कधी कधी त्या वैतागूही लागल्या. केतकीला याचं आश्चर्य वाटलं होतं. माणसाचं मन, भावना किती लवकर बोथट होऊ शकतात याची प्रचीती तिला आली. केतनच्या बाबतीत आपलंही मन असंच बोथट होऊन जाईल का ? ... की झालं आहे?.... कारण हल्ली पूर्वी येत असे तसा उमाळा कधी आलाच नाही... नेहमीचंच झाल्याने तिनेही हे स्विकारलं होतं का? यंत्रासारखं तीही आता केतनच्या सर्व मूलभूत गरजा आटोपू लागली, कधी कधी कंटाळाही येत होता... केतनवर तिचं प्रेम होतं... पण त्याच्या या परिस्थितीने त्यात फरक पडला होता का ? ... मानवी मनाच्या विचित्र गाभाऱ्यात तिचंही मन लंबकासारखं दोलायमान झालं..... शांताबाईंच्याच आवाजानं ती भानावर आली.

''बाई ऽ ऽ....''

''हं !'' केतकीचा हुंकार.

''एक सांगते, पण राग मानू नका.''

केतकीनं त्यावर फक्त शांताबाईंकडे पाहिलं.



''साहेबांना तुम्ही घरी घेऊन जा.... काही उपयोग नाही बाई. कशाला हॉस्पिटलचं बिल भरताय. जे नशिबाला आलं ते स्विकारावं बाई माणसानं. मी सहज बोलले. मनावर नका घेऊ. निघते मी.''

शांताबाई निघून गेल्या. पण केतकी जाणाऱ्या शांताबाईंना अजूनही धुंडाळीत राहिली. शांताबाईही काही खोटं बोलल्या नव्हत्या. पुढे काय ? या कात्रीत तिचं मन सापडलंच होतं. मार्ग काढण्याचा प्रयत्न करत होतं. पण मार्ग सापडला नव्हता. केतनकडे पाहून तिचं मन पुन्हा कळवळलं. अगोदर जो उमाळा येत होता तो आता येत नव्हता. पुढं येऊ घातलेल्या प्रश्नांनी तिला व्यावहारिक बनवलं होतं. केतकी उठली. केतनच्या अंगावरील पांघरूण नीट करीत तिनं पुन्हा त्याच्या केसातनं हात फिरविला. यंत्रासारखाच ... आणि खिडकीपाशी येऊन ती दूरवर पाहत राहिली. बराच वेळ.

डॉक्टर आत आले तरी केतकी आपली शून्यातच होती. डॉ. सिनकर, प्रसिद्ध न्यूरोसर्जन, केतनची केस तेच हाताळीत होते. ते व त्यांच्या सोबत आलेल्या व्यक्तीची चाहूल केतकीच्या गावीही नव्हती.

एक उदासीन शांतता त्या खोलीत वावरत होती. या वातावरणाला भेदत जाणारा स्वर डॉ. सिनकरांच्या तोंडून बाहेर पडला....

''केतकी !''

केतकीनं भानावर येऊन, आवाजाच्या दिशेने वळून पाहिलं. डॉ. सिनकरांना पहाताच ती झटकन् वळून सामोरी होत म्हणाली.

''काय डॉक्टर!''.... पुढे केतनजवळ जात म्हणाली. ''आत्ताच त्यांचा डोळा लागलाय.''

''असू दे. मी केलंय् चेकअप्.'' थोडा वेळ थांबत पुढे ते म्हणाले,

''केतकी !.... खरं तर मला तुलाच भेटायचं होतं.''

केतकी गोंधळली पण क्षणात स्वतःला सावरीत म्हणाली.

''काही काम होतं का डॉक्टर ?....'' आणि प्रथमच शेजारी उभ्या असलेल्या तरुणाकडे तिचे ओझरतं लक्ष गेलं. नैराश्य तिच्या चेहऱ्यावर पसरून गेलं.

''केतकी ! ... हे डॉ. शिरीष घाटपांडे. प्रसिद्ध शास्त्रज्ञ, न्यूरोबायोलॉजीस्ट.''

समोरच्या तिशीतल्या उमद्या तरुणाकडे पाहून हलकेसे स्मित करीत, हात जोडीत ती म्हणाली, ''नमस्कार !''

डॉ. शिरीषनंही निरागस स्मित करीत हात जोडले होते. केतकी गोंधळली. क्षणभर केतनच उभा असल्याची जाणीव तिला झाली. ती ओशाळली आणि डॉ. सिनकरांकडे पहात म्हणाली.

''डॉक्टर.... आपण काही तरी सांगत होतात !''

''हो ! ... तुला वेळ असेल तर मला तुझ्याशी महत्वाचं बोलायचंय्.''

''महत्वाचं'' शब्दानं केतकीचं हृदय धडधडलं. काळजीच्या स्वरातच ती उत्तरली.

''आहे ना ! ... बोला आपण.'' तिचं मन आता काहीही ऐकायला तयार होतं.

''माझ्या केबीनमध्ये बसूयात ?'' डॉ. सिनकरांचा प्रश्न.

केतकीनं होकार देताच, तिघेही खोलीतनं बाहेर पडले होते. डॉ. सिनकरांच्या केबीनमधे स्थानपन्न होतानाच, डॉ. सिनकर म्हणाले,

''बैस केतकी ! ... बसा डॉ. शिरीष.''

केतकी एक खुर्ची ओढीत बसली. शेजारच्याच खुर्चीत डॉ. शिरीष बसले होते.

''केतकी !... केतनची परिस्थिती तुला माहितच आहे. गेले सहा महिने आपण प्रयत्न करीत होतो आणि आहोत. वैद्यकीय शास्त्राला जे जे शक्य होतं ... ते आपण केलं. या अघाततनं तो बाहेर पडेल असे मला वाटत नाही.'' डॉ. सिनकरांनी सुरुवात केली होती. केतकीनं त्यावर फक्त डॉक्टरांकडं पाहिलं आणि उत्तरली.

''ठीक आहे डॉक्टर... मी केतनला लवकरच घरी शिफ्ट करीन.''

केतकीनं आपल्या म्हणण्याचा अर्थ वेगळाच लावलेला पाहून डॉ. सिनकर तत्काळ म्हणाले,

''तसं नाही केतकी. प्रश्न सोडून जाण्याचा नाहीये. या विषयीच मला काहीतरी सांगायचंय् आणि मुख्यतः ही चालना डॉ. शिरीषांमुळे मिळाल्याने तुझ्याशी बोलायचंय्. जे घडलंय त्या मागच्या कारणांची मीमांसा करायचीय.'' केतकीनं दीर्घ श्वास सोडला आणि ती डॉक्टरांकडे पहात राहिली. डॉ. सिनकर म्हणाले, ''केतकी, अपघातामधे अशा गोष्टी घडतच असतात. शंभर हजारातनं एखाद्याच्या वाटेला असं जगणं येतं. हा अपघात असा असतो - की माणूस विचार करण्यापलीकडे काहीच करू शकत नाही. मेंदूतील जडण घडणच अशी आहे की प्राप्त परिस्थितीत विज्ञानालाही मर्यादा येऊ लागतात. मस्तिष्क स्तंभातील प्रेरक केंद्रांच्या कोशिकांपासून तसेच मेरू रज्जूच्या वर पासून खालपर्यंतच्या भागातील प्रेरक कोशिकांपासून निघणारे तंतू स्नायूंपर्यंत जातात... आणि धड, हात पाय यांच्या स्नायूंपर्यंत पोहचतात. शिवाय प्रेरक स्नायूंपर्यंत तंतू जातात. त्यामुळे मेंदूतील दोन्ही भागात आघात किंवा विकृती निर्माण झाल्यास सर्वांग लुळं पांगळं होण्याची शक्यता असते... आणि केतन हा नेमका त्याचाच बळी ठरलेला आहे. त्याच्या प्रमस्तिष्काच्या दोन्ही बाजूंना इजा होऊन, स्नायूंच्या क्रियाशीलतेत बिघाड झाल्याने तो लुळा व दुर्बळ झाला... ऑपरेशन्सनी व आधुनिक उपचारपद्धतींनी काही अंशी दुर्बळपणा घालण्याचा प्रयत्न मी केला पण तोही असफल ठरला. केतकी, नाऊ देअर इज् नो वे.''

केतकी स्तब्ध होती. तिने एक आवंढा गिळला. कदाचित आता तिचा कंठ दाटून आला असावा. डॉ. शिरीषांकडे पहात तिचे डोळे भरून आले. त्यामुळे डॉ. शिरीषही क्षणभर गोंधळले. केतकी रुद्ध आवाजात म्हणाली, ''डॉक्टर, तुम्ही प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण नशिबानंच साथ दिली नाही. मला हे स्वीकारायलाच हवं.'' केतकी पुढं बोलूच शकली नाही.



''केतकी ! ... हॅव पेशन्स ... काहीतरी मार्ग निघेल. म्हणूनच तर डॉ. शिरीष आज योगायोगानं येथे आलेत.''

डॉ. शिरीषांचं नाव निघताच केतकीनं पुन्हा आशेनं त्यांच्याकडे पाहिलं. डॉ. शिरीषनंही तिला सहानुभूतीपूर्ण प्रतिसाद दिला.

''केतकी. मी जे काही सांगणार आहे. त्याचा निर्णय तुला घ्यायचाय.''

''कुठला डॉक्टर ?'' प्रथमच केतकीचा खुललेला स्वर.

''केतकी, मी मगाशीच ओळख करून दिलीय की डॉ. शिरीष हे नामवंत शास्त्रज्ञ आहेत. नुकतेच अमेरिकेहून भारतभेटीवर आलेले आहेत. या लहान वयात त्यांनी प्रगतीच्या परिसीमा गाठल्या. त्यांनीच निर्माण केलेल्या युक्त्यांचा प्रयोग त्यांना करायचाय्...'' डॉ. सिनकरांनी सांगितलं.

''कुठला प्रयोग ?'' केतकीचा पुनश्च प्रश्न.

डॉ. सिनकरांनी, डॉ. शिरीषांकडे पाहिलं. डॉ. शिरीष खुर्चीतच सावरून बसत म्हणाले, ''मॅडम, हा प्रयोग म्हणजे दुर्बल घटकांना स्वावलंबी करण्याचा प्रयत्न आहे. मानवी विचारांवर चालणारी यंत्रणाच मी निर्माण केलीय्. मेंदूत उठणाऱ्या तरंगांवर आधारित व त्याला प्रतिसाद देणारी ही यंत्रणा. त्यामुळे केतनसारख्या रुग्णांना स्वावलंबनाचा मार्ग मोकळा होईल. त्यासाठी कुणावर अवलंबून राहण्याची त्यांना आवश्यकता भासणार नाही.''

''प्रयोगाचं स्वरूप कसं असेल ... सर!'' काय बोलावं या गोंधळात तिनं शिरीषला सर म्हणून संबोधलं होतं.

शिरीष तिच्या या गोंधळाला मार्ग दाखवीत उत्तरला, ''शिरीषच म्हणा मला हवं तर.''

डॉ. सिनकरांनी स्मित केलं होतं. डॉ. शिरीष पुढे म्हणाले, ''मानवी मेंदूतच या यंत्रणेचं रोपण करायचं असल्याने, त्यासाठी केतनवर एक मोठी शस्त्रक्रिया करावी लागेल. सुदैवाने डॉ. सिनकर स्वतः या शस्त्रक्रियेसाठी तयार आहेत. या प्रयोगासाठी त्यांनीच केतनचं नाव मला सुचविलंय्.''

पुढे डॉ. शिरीष बराच वेळ बोलत राहिले. विविध शास्त्रीय विश्लेषणं देत राहिले. त्यांच्या परिणामांची मीमांसा करीत राहिले... केतकी ऐकत होती.... विज्ञानाच्या या महत्वाच्या प्रयोगाला प्रतिसाद द्यावा की नाही म्हणून ती विचार करीत राहिली. डॉ. सिनकरही मधेमधे केतकीला आधार देत होते. विज्ञानाचा हा प्रयोग यशस्वी झाला तर तो मानवाला कसा वरदान ठरणार आहे हे पटवून देत होते. शेवटी डॉ. सिनकर म्हणाले, ''केतकी, शेवटी हा प्रयोग असल्याने, त्यासाठी तुझा होकार महत्वाचा आहे.''

केतकी स्तब्ध होती. मनात पुन्हा वादळ उठलं. प्रयोग असफल ठरला तर ! असाही विचार मनात डोकावून गेला. पण अखेर तिनं निर्णय घेतला होता.

''डॉक्टर ! .. मी तयार आहे. केतनचं जीवन सुसह्य होण्यासाठी मी काहीही करायला

तयार आहे. तुम्ही हा प्रयोग करू शकता...''

डॉ. सिनकरांना आनंद झाला होता. डॉ. शिरीष केतकीकडे पहात राहिले व तिच्या मनाचा ठाव घेत राहिले.

केबीनमधनं बाहेर पडतांना केतकीचा चेहरा समाधानानं उजळून निघाला होता. मनात गोंधळ असला तरी, विज्ञान नवीन काहीतरी करू पहातंय् म्हणून तिच्या चेहऱ्यावर समाधान होतं. तशीच ती केतन होता त्या खोलीत आली. केतन जागा झाला होता. त्याचे अस्थिर डोळे लकलकत होते. चेहरा एखाद्या निरागस बालकाप्रमाणे दिसत होता. केतकीनं पुन्हा मायेनं त्याला न्याहाळलं. तोंडात पाण्याचे थेंब सोडताच, केतननं लहान मुलासारखी ओठावरून जीभ फिरवली. त्याच्या डोळ्यात केतकी विषयीची कृतज्ञता दाटून आली. केतकीनं त्याचं डोकं मांडीवर घेत, केसातनं हात फिरवला आणि आजच्या चर्चेचाच ती विचार करीत राहिली.

दिवस जाऊ लागले. केतनच्या चाचण्यांना सुरुवात झाली होती. शस्त्रक्रियेपूर्वी अनेक चाचण्यांमधनं केतनला जावं लागत होतं. संवेदना नसल्याने त्याला कुठलाच त्रास होत नव्हता. केतकी प्रत्येक वेळी सावलीसारखी त्याच्या जवळ होती. आतापर्यंतचा तिचाही प्रवास जीवघेणाच ठरला होता. अपघातानं ती वाचली होती, पण नंतरच्या असंख्य वेदनांना एकटीनंच सामोरी गेली होती. तिचं भावविश्व पार उध्वस्त झालं होतं.

आवश्यक तेवढ्या सर्व चाचण्या पूर्ण झाल्या होत्या. प्रयोगाची तारीखही ठरली होती. चार-पाच दिवसांचा अवधी उरला होता. केतकी बऱ्यापैकी निवांत झाली होती. आज कधी नव्हे ती कॉरिडॉरमध्ये येऊन उभी होती. वाऱ्याची थंड झुळूक चेहऱ्यावर येत असल्याने, तिला आल्हाददायक वाटत होतं. डॉ. शिरीष मध्येच तिच्या मनात डोकावून जात होते. त्यामुळे त्याविषयीचा आत्मविश्वास अधिकच बळकट होत असे.... बराच वेळ ती उभी होती.

''मॅडम् ऽ ऽ ...''

मागून आलेल्या आवाजानं ती दचकली व मागे वळून पाहिलं. डॉ. शिरीष स्मित हास्य करीत उभे असलेले पहाताच ती सावरली.... आणि तेवढ्याच स्मित हास्यानं प्रतिसाद देत उत्तरली, ''डॉ. शिरीष !.... आपण?''

''हो मीच ! ... का ? मी येऊ नये का?''

''नाही, तसं नाही...'' केतकी ओशाळत म्हणाली होती....

''मॅडम् , बरेच दिवस तुम्हाला भेटावं म्हणून मनात होतं. पण निवांत वेळच मिळत नव्हता. आज तो अशा वेळी मिळाला... एक विचारू ?''

केतकीनं, डॉ. शिरीषांकडे पाहिलं.... हळूच स्मित करीत तिनं मान डोलावली, ''विचारा ना !''

''मला अजूनही वाटतंय की तुमच्या मनात या प्रयोगाविषयी गोंधळ आहे, संभ्रम आहे... असं का वाटतंय् याची कारणमीमांसा मला अजूनही करता येत नाहीये. म्हणूनच मी तुम्हाला



या विषयी पुन्हा भेटून सविस्तर सांगण्याचा निर्णय घेतलाय्...'' डॉ. शिरीष मनातलं बोलले होते.

''तसं नाही डॉ. शिरीष. माझा आपणावर पूर्ण विश्वास आहे...''

''तरीही मागील चर्चेत मला हे सारखं जाणवत राहिलं, की हा निर्णय आपण भावनेच्या भरात घेतलाय म्हणून. त्यावेळी मी फारसं बोललो नाही. कारण आपल्याच संशोधनाबद्दल आपणच फारसं बोलणं बरं नव्हे. पण त्याविषयी मी तुम्हाला थोडक्यात सांगण्याचं ठरवलंय्. त्यानं पुन्हा निर्णय घेण्याचं बळ आपणास मिळेल.'' डॉ. शिरीषांचा स्वर गंभीर होता. केतकीनं डॉ. शिरीषांकडे स्नेहपूर्वक पाहिलं. तिला हा तरूण अतिशय बुद्धिमान असल्याची पूर्ण प्रचीती आली. हे खरंच होतं की ती आजही संभ्रमावस्थेत होती. परिणामांविषयीची अथवा डॉ. शिरीषांच्या संशोधनाविषयीची फारशी माहिती तिला नव्हतीच. डॉ. शिरीष म्हणाले,

''मॅडम ऽ ऽ ... मी लहान होतो. कळावं असंच माझं वय होतं. आमचे आजोबा गंभीर पक्षाघातानं आजारी पडले. अचानक आलेल्या आरिष्टानं व घरातील कर्ती व्यक्ति अशी पांगळी झालेली बघून सारेच हबकून गेले होते. मला आजही आठवतंय. पुढे बरेच दिवस ओढाताणीत गेले होते. आजोबांची परिस्थिती खूपच खालावली होती. सगळंच अंग लुळं पडल्याने घरातील ओढाताण अपरिहार्य होती. पूर्वी जो दुःखाचा डोंगर कोसळला होता, तो आता ओसरू लागला होता. घरातील लोकच आता त्यांचं करायला टाळाटाळ करू लागले. त्यामुळे आजोबांची स्थिती अजूनच दयनीय होत गेली. परावलंबी जीवन वाट्याला आल्याने तेही खचले होते. आजोबांच्या संवेदनाहीन देहापेक्षा, आप्तांच्या त्यांच्याविषयी होत जाणाऱ्या बोथट संवेदनाच मला जास्त झोंबून गेल्या. पुढे ते कधी मरतात याचीच सर्वजण वाट पहात होते. माणसामाणसातील, भावबंधातील हे स्थित्यंतर विलक्षण होतं. ज्या माणसानं तुमच्यासाठी आयुष्य वेचलं, त्याच्याच मरणाची वाट पहाणं कृतघ्नताच नव्हती काय? ... पुढे आजोबा नशिबानं गेले; तो प्रसंग मात्र माझ्या मनावर कायमचाच ठसा उमटवून गेला. अशा परिस्थितीत अगदी आई, वडिल, मुलगा, प्रियकर कसे वागतील काहीच सांगता येत नाही. पुढे मी मोठा झालो. खूप शिकलो. परदेशात गेलो. पण मनात कुठतरी आजोबांची होणारी घुसमट तशीच राहिली.''

डॉ. शिरीष क्षणभर थांबले. आजोबांची प्रतिकृती त्यांच्या डोळ्यासमोर आली असावी. केतकीही त्यांच्या या विलक्षण भावविश्वाचा शोध घेऊ पहात होती. डॉ. शिरीष पुढे म्हणाले...

''अनुषंगाने मला अशाच विषयात रुची निर्माण झाल्याने, संशोधनाची संधी चालून आली. त्या दृष्टीने विचार करून मानवी विचार तरंगांना संवेदन असतील असे अतिसूक्ष्म अग्र मी तयार केले. साधारण $१०^{-८}$ सें.मी. एवढे आणि त्या अग्रात मेंदूत निर्माण होणाऱ्या क्रियाशीलतेचा आलेख तयार होऊन, त्या आलेखाचं एका इलेक्ट्रॉनिक युक्तीद्वारे विद्युत संदेशात रूपांतर करून, बाहेर असलेल्या यंत्रमानवाशी लांबून जोडली. अशा बऱ्याच चेतना पेशीकांपासून

निघालेल्या संदेशांची नोंद करण्यात मला यश मिळालं... आणि त्यांचं पृथक्करण करून, यंत्रमानव या संदेशांनुसारच हालचाल करतात हे सिद्ध केलं....''

केतकी अवाक् होऊन पहात होती. शिरीषांच्या संशोधनाचा एवढा मोठा आवाका असेल याची तिला जाणीवच नव्हती. डॉ. शिरीष नुसतेच शास्त्रज्ञ नव्हते तर ते एक माणूस म्हणूनही सद्‌गृहस्थ होते. त्यासाठीच त्यांनी स्वतःचं आयुष्य वेचलं होतं. या संवादात प्रथमच केतकीनं विचारलं.

''म्हणजे, आपण जे विचार करू त्यानुसाराच तो यंत्रमानव काम करेल ?''

''होय!... तसाच.... आणि हवं ते तुम्ही त्याच्याकडून करून घेऊ शकाल. काही प्राण्यांवर त्यांच्या विचार शक्तीप्रमाणे हे प्रयोग यशस्वी झालेत. फक्त मानवावरचा प्रयोग अजून व्हायचाय्. त्यासाठीच तुमच्या यजमानांची निवड मला योग्य वाटली. आणि मला विश्वास आहे, हा प्रयोग यशस्वी होईल. निश्चितपणे. केतकी, ... शेवटी आपण मानव आहोत. नियमित तीच तीच गोष्ट पाहून आपल्याही भावना, संवेदना बोथट होत जातात. कंटाळा यायला लागतो. मला तुमच्या केतन विषयीच्या प्रेमाचा मुळीच अपमान करायचा नाहीये. पण हे मानवी चक्रच असे आहे की तो अशा परिस्थितीमुळे हे सर्व विसरतो. म्हणूनच माझं हे संशोधन अशा रुग्णांना स्वावलंबी बनवण्यासाठी मदत करणार आहे आणि ते वैद्यकशास्त्राला योगदान ठरावं अशी माझी इच्छा आहे. तुम्हाला स्वतःला रुग्णाच्या भावनेचा विचार करावा लागणार नाही. सगळी कामे तो रुग्ण स्वतः यंत्रमानवाकडून करवून घेईल... अगदी मूलभूत गरजांपासूनची कामे ... रुग्णालाही आपण कुणावर अवलंबून नसल्याची भावना उत्पन्न होईल... वैफल्यातून बाहेर येण्यास त्यास मदतच होईल. शिवाय किळसवाणी कामे तुम्हाला करावी न लागल्याने तुम्हीही उत्साहित राहाल.... घरातलं वातावरण उल्हसित राहण्यास मदत होईल... केतकी... मला वाटतं निर्णय अजूनही तुमच्या हातात आहे.''

''डॉ. शिरीष ऽ ऽ... आता कुठलीही संभ्रमावस्था नाही... आपल्या प्रयोगाला थोडासा का होईना माझा हातभार लागल्यास मी माझं भाग्य समजेन.'' केतकी कृतज्ञतेने पहात म्हणाली होती.

''पण यात प्रयोग अयशस्वी होण्याचीही तेवढीच शक्यता आहे...'' डॉ. शिरीषांनी पुन्हा जाणीव करून दिली.

''असू देत ! ... केतनने त्यासाठी बलिदान दिलं असं मी समजेन... आणि डॉ. शिरीष मला पूर्ण विश्वास आहे की आपण यात यशस्वी व्हाल....'

डॉ. शिरीष निरोप घेऊन पाठमोरे झाले होते. केतकी तिथंच स्तब्ध उभी होती. समाधानानं. एक मोठा बुद्धिमान शास्त्रज्ञ आणि तेवढाच एक मोठा माणूस जाताना ती पहात होती. कृतज्ञतेने तिच्या डोळ्यांच्या कडा ओलावल्या होत्या. डॉ. शिरीषांनी केतकीच्या मनातील मरगळ सहज काढली होती... आणि मनाच्या संवेदना बोथट व्हायला ती स्वतःही अपवाद नव्हती. अतिशय प्रिय व्यक्तीही अशा वेळी नकोशी होते या डॉ. शिरीषांच्या म्हणण्याशी ती पूर्णपणे सहमत होती.

केतकी वेगळ्याच उत्साहात खोलीत आली होती. केतनला पुन्हा हवं नको ते करून, त्याला मायेनं निरखीत राहिली. केतनचं नुसतं अस्तित्व तिला हवं होतं. त्या अस्तित्वानंही तिला बळ येणार होतं. पुढील आयुष्य जगण्याची दिशा मिळणार होती. ... आणि संपूर्ण आयुष्य या आधारावरच तारून नेणार होती.

शस्त्रक्रियेचा दिवस येऊन ठेपला. शस्त्रक्रिया आणि संशोधनात्मक प्रयोगाला सुरुवात झाली. मोठा ताफा यावेळी डॉ. शिरीष व डॉ. सिनकरांसोबत होता. यावेळी सारी सूत्रं डॉ. शिरीषांकडे होती. केतकी व तिचे काही आप्त, मित्र बाहेर अखंडपणे क्षणाक्षणाची वाट पहात होते. केतकी शांत पण मनातून धास्तावलेली होती. ज्यांना जाणीवा, संवेदना असतात त्यांना किती त्रास होतो याचा प्रत्यय तिला येत होता... बराच वेळ झाला.... आठ-नऊ तास निघून गेले आणि एका वेगळ्याच उत्साहाने डॉ. शिरीष व डॉ. सिनकर बाहेर आले होते. केतकी वाऱ्यासारखी झेपावली होती. तिच्यापाठोपाठ सारेच धावले होते. आतुरतेनं तिनं विचारलं, ''डॉक्टर... कसं झालं ?''

डॉ. सिनकरांनी तिच्या पाठीवर हात ठेवत म्हटलं..

''उत्तम.. शस्त्रक्रिया आणि डॉ. शिरीषांचं अग्रांचं रोपणही यशस्वी झालेलं आहे.''

''मॅडम, मी आशावादी आहे. केतन वुईल डेफिनेटली गीव अस दि रिस्पॉन्स ... किमान अठ्ठेचाळीस तासांच्या आत त्यानं शुद्धीवर येणं अपेक्षित आहे...'

डॉ. शिरीषांचे डोळे किंचित जडावल्यासारखे जाणवत होते. अथक आठ-नऊ तासांच्या शस्त्रक्रियेनंतर थकवाही जाणवायला लागला होता. डॉ. सिनकरांसोबतच पुढे ते हॉस्पिटलच्या विश्राम गृहाकडे निघाले होते.

केतकीनं आय.सी.यू. त डोकावून पाहिलं. केतनचा संपूर्ण पांढऱ्या वस्त्रांतला देहच तिच्या दृष्टीस पडला होता. आजूबाजूला डॉ. शिरीषांची यंत्रणा तयार होती. तीन-चार फुटी यंत्रमानव त्याच्या समोरच उभा होता. एका यंत्राने केतनच्या मेंदूत प्रवेश केला होता. त्यानंच केतनच्या जीवनाला कलाटणी मिळणार होती.

दोन रात्री केतकीनं तशाच जागून काढल्या. केतनच्या शेजारी. यावेळी तिचा सहजच डोळा लागला होता. पण केतनच्या शुद्धीवर आल्यावर झालेल्या धावपळीनं तीही जागी झाली होती. केतन शुद्धीवर आलेला कळताच सर्वच धावत पळत आले होते. डॉ. शिरीष, डॉ. सिनकर आवेगाने त्याच्या खोलीत दाखल झाले होते. डॉ. शिरीषांच्या चेहऱ्यावर उत्सुकता, आतुरता होती. कारण केतनच्या हालचालींवरच त्यांच्या प्रयोगाच्या परिणामांची नोंद होणार होती.

केतनने हळूच डोळे उघडले. समोर केतकीला पहाताच त्याच्या चेहऱ्यावर स्मितरेषा उमटून गेली. केतकी हर्षभरीत नजरेनं त्याला पहातच राहिली. सहा महिन्यांनंतर प्रथमच त्याच्या चेहऱ्यावर हास्य रेषा ती पहात होती. मेंदूत कळ उठल्याने त्याच्या चेहऱ्यावर वेदना उमटून गेल्या. प्रयोगाच्या दृष्टीने ही चांगली लक्षणे असल्याचं डॉ. शिरीषांनी सांगितलं. केतन पुन्हा पूर्ववत झाला.

डॉ. शिरीष व डॉ. सिनकर केतनची विचारप्रणाली कार्यन्वीत होण्याची वाट पाहत होते. तेवढ्यात यंत्र-मानवाची हालचाल त्यांना जाणवली. सर्वांनीच त्याकडे आश्चर्याने पाहिलं. हळूहळू यंत्रमानव टेबलाकडे गेला त्यानं ग्लासमधे पाणी ओतलं आणि केतनजवळ येऊन त्यानं त्याला पाणी पाजलं. केतनही आश्चर्यानं पहातच राहिला. पाणी हवंय हा फक्त त्याने विचारच केला होता.... आणि या यंत्रानं त्याला पाणी आणून दिलं होतं. केतकीही या प्रयोगाच्या परिणामाकडे पहातच राहिली होती. डॉ. शिरीषनी अत्यानंदाने डॉ. सिनकरांना आलिंगन दिलं होतं. डॉ. सिनकर म्हणाले,

''शिरीष !... काँग्रॅच्युलेशन्स्... तुझा प्रयोग यशस्वी झाला. विज्ञानात नवीन पर्व सुरू करणारं तुझं संशोधन आबालवृद्धांना निश्चितच उपयुक्त ठरणार आहे. आय एम प्राउड ऑफ यू...'' डॉ. सिनकरांनी डॉ. शिरीषांच्या पाठीवर हात ठेवला होता. डॉ. शिरीष त्यांच्या या आपुलकीने प्रोत्साहित झाले होते.

केतकी नतमस्तक झाली होती. कुठल्या शब्दात भावना व्यक्त कराव्यात हेच तिला सुचत नव्हतं. डॉ. शिरीषांनी तिची घालमेल ओळखली होती. तिला समजून घेत ते म्हणाले....

''केतकी, तुमच्या शुभेच्छा कामी आल्या. केतन आता तुमच्यावरही अवलंबून नाहीत. ते स्वतंत्र आहेत. हे निर्जीव यंत्र त्यांच्या नेहमीच साथीला असेल.''

पुढे डॉ. शिरीषांनी बरेच प्रयोग केले. त्याचे परिणामही मिळाले. यंत्रणेत अजून सुधारणा घडवून त्यांनी तिचा बिनचूकपणा वाढवला. त्या रात्रभर डॉ. शिरीष, डॉ. सिनकर केतनवर विविध प्रयोग करण्यात गुंतले होते.... केतकी मात्र उत्सुकतेने या सर्व प्रकाराकडे पहात होती.

केतनमधे पूर्वीपेक्षा बरीच सुधारणा झाली होती. एव्हाना समोरील यंत्रमानव आपल्या विचारांनुसार वागतोय हे त्याच्या लक्षात आलं होतं. एकटा असतानाही तो आता यंत्रमानवाकडून हवं ते करून घेऊ लागला. त्याला गंमतही वाटत होती. जेवण्या खाण्यापासून यंत्रमानव त्याचं सर्व काही करू लागला.

केतकी आता निवांत झाली होती. दहा-बारा दिवसांचा अवधी निघून गेला होता. यंत्रमानवाच्या सहाय्याने केतन स्वावलंबी झाल्याचं तिला समाधान होतं. यापुढे तिला त्याचं काहीच करावं लागणार नव्हतं. आता केतनला घरी नेण्याचं तिच्या मनात घोळत होतं.

केतनला उद्याच घरी नेण्याचं ठरल्याने, आवराआवरी करून केतकी बाहेर पडली होती. केतन शांतपणे पहुडला होता. शेजारीच त्याचा यंत्रमानवही होता. संध्याकाळचं आल्हाददायक वातावरण होतं. सहा महिन्यांच्या ओढाताणीत तिला आज प्रथमच बरं वाटत होतं. फेरफटका मारून ती खोलीकडे आली. केतन झोपलेला पाहून ती बाहेरच वेटींग रूममध्ये सोफ्यात बसली. बसताच तिचा डोळा लागला.

रात्रीचं शांत वातावरण. राऊंडला गेलेली नर्स धावत पळत 'डॉक्टर, डॉक्टर' करत ओरडत निघाली. त्या आवाजाने केतकी खडबडून जागी झाली आणि खोलीकडे धावली. डॉ. शिरीष व डॉ. सिनकर तेथे येऊन ठेपले. सुन्न झाले... केतनचा देह रक्ताच्या थारोळ्यात पडला होता. यंत्रमानवाचे हात रक्ताने माखले होते.

केतकी आवेगानं केतनच्या देहाजवळ येऊन बिलगली व रडू लागली. हाही अपघातच की वैज्ञानिक अपघात. हे कोडंच तिथं उपस्थितांना पडलं होतं. डॉ. शिरीष हादरले होते. संशोधनाची ही परिणती त्यांनी कधीच अपेक्षिली नव्हती. मग हे असं का घडलं !

डॉ. सिनकरांनी केतनचा ताबा घेतला होता. दीर्घ श्वास घेत ते म्हणाले,

''शिरीष, ही इज् डेड... रोबोट हॅज किल्ड हिम....!''

डॉ. शिरीषांना काहीच सुचत नव्हतं. हे असं का ? याचा पाठपुरावा ते त्याही परिस्थितीत सुन्नपणे करीत होते... आणि अचानक त्यांच्या डोक्यात प्रकाश पडला.

''डॉ. सिनकर !... यंत्रमानवानं केतनच्याच आज्ञेचं पालन केलेलं आहे...''

''काय ?'' डॉ. सिनकरांसोबत सर्वच आश्चर्याने पहातच राहिले. केतकीही अविश्वासाने डॉ. शिरीषांकडे पहात होती.

डॉ. शिरीष त्यावर उत्तरले.

''होय. दिस् इज् ट्रू... केतननी आत्महत्या केलीय. मानवासाठी उपयुक्त संशोधन करीत असताना .... मी माणसाला वैयक्तिक विचारस्वातंत्र्य असते हे पूर्णपणे विसरून गेलो. रुग्ण असाही विचार करू शकेल असा माझ्या डोक्यात विचारच आला नाही... आणि निराशेच्या आधीन झालेला रुग्ण असाच विचार करेल... त्या जागी मी असतो तर कदाचित असंच केलं असतं. माझ्या संशोधनानं त्याला हेच अधिक सुसह्य झालं. ... खरं तर संशोधनाची ही प्रतिकुलताच आहे...'' डॉ. शिरीष निराश झाले होते... डॉ. सिनकर प्रसंगावधान राखून म्हणाले.

''नाही ! शिरीष... तुझं संशोधन उपयुक्तच आहे. अशातही जिद्दीनं जगणारे आहेत. किमान त्यांच्यासाठी तरी ते आहे. वैचारिक स्वातंत्र्य म्हणशील तर ते आपणा सर्वांनाच आहे. आपणही असं करू शकतो. केतकीच बघ... किती जिद्दीनं ती पुढं आली. नाहीतर नशिबाला दोष देत तीही असं करू शकली असती. स्वतःची सुटका तिनं कधीच करून घेतली असती. धडधाकट असतानाही आत्महत्या करणारे आहेतच. नैराश्यापोटी निसर्गात अशा गोष्टी घडतातच... केतनच्या मनातही असले विचार येणं साहजिकच होतं.... वैफल्यग्रस्त माणूस अजून काय करू शकतो ? पत्नी तरुण असतांना एका दुर्बळ पतीच्या मनात असे विचार येणं

स्वाभाविक आहे. आणि केतनसारख्या संवेदनशील माणसाच्या मनात ते येणारच. केतकीवर त्याचं अपार प्रेम असल्यानंच त्यानं हा विचार केला असावा....''

डॉ. सिनकरांनी समजावलं होतं. केतकीच्या डोळ्यातून अश्रू वाहत होते. डॉ. शिरीष धिम्या पावलानं तिच्याजवळ गेले आणि त्यांनी केतकीच्या खांद्यावर हात ठेवला. तशी केतकी आवेगाने मागे वळून, नकळत डॉ. शिरीषांना बिलगली. यावेळी कुणाचा तरी तिला आधार हवा होता... स्वतःचा अस्तित्वहीन चेहरा दिसल्यानं बांध फुटावा तशी ती रडत राहिली. डॉ. शिरीष सुन्नपणे पहात राहिले. हळूच तिला आपल्या कवेत घेऊन ते थोपटत राहिले. डॉ. सिनकरांनाही तशा परिस्थितीत आपल्या भावना आवरणं अशक्य झालं होतं.






**'हा निकामी झालाय, याला चार्ज करून द्या !'**

**व्यंगचित्र : सारंग यावलकर**

**ही दीपावली आणि नूतन वर्ष आपणांस आनंदाची व भरभराटीची जावोत !**



# "दीपंकर, तू आता चतुर बन"

❐ **सुधा रिसबुड**

***'नुसती स्वाभिमानाची ढाल पांघरून काय होणार ? भविष्यातील मानवाच्या कल्याणासाठी तुला एवढा त्याग करायलाच हवा. म्हणूनच -***

विश्वातील ती फार प्रतिष्ठित स्पर्धा मानली जायची. त्या स्पर्धेत भाग घेणे, म्हणजेच बुद्धिमत्तेची झलक दाखवणे असे मानले जायचे. कारण त्या वैश्विक प्रज्ञा परिषदेत भाग घेण्यासाठी आवश्यक असणारा बुध्यांक फार वरच्या दर्जाचा होता. अनेक ग्रहमालिकेतील साम्राज्यांतर्फे, गणराज्यांतर्फे, सभासदांतर्फे, स्पर्धेत भाग घेण्यासाठी अर्ज केले जायचे. पण बहुतेक स्पर्धक हे प्रज्ञा स्पर्धेच्या पहिल्या किंवा दुसऱ्या फेरीतच बाद व्हायचे. अनेक ग्रहांवर या स्पर्धेत भाग घेण्यासाठी पात्र होण्याकरता प्रशिक्षण दिले जायचे. अत्यंत कठोर परीक्षणातून, प्रशिक्षण संपल्यानंतरच स्पर्धकांना वैश्विक प्रज्ञा स्पर्धेत भाग घेण्याची अनुमती मिळायची.

साहजिकच ह्या स्पर्धेला विश्वातील अनेक मान्यताप्राप्त साम्राज्यांतून स्पर्धक यायचे. काही स्पर्धक हे विद्युत चुंबकीय लहरींच्या साम्राज्यातून यायचे. त्यांनी कोणताही जड देह धारण केलेला नव्हता. खरं म्हणजे त्यांना शरीरच नव्हते ! त्या होत्या विद्युत चुंबकीय लहरी ! काही सेंटी मीटर लांबीच्या होत्या, तर काही कित्येक किलोमीटर लांबीच्या. आपल्या तालबद्ध गतीतून त्या एकमेकांशी संवाद साधायच्या. त्यांचा संवाद साधण्याचा वेग हा त्यांच्या स्वतःच्या वेगाइतकाच असायचा. कोणत्याही माध्यमाचा अडथळा त्यांना वाटत नसे. एकमेकांत संवाद साधण्याच्या, त्यांच्या प्रचंड वेगामुळे, ह्या लहरी ऊर्फ विद्युत चुंबकीय साम्राज्यातील स्पर्धक हे बुद्धिमान मानले जायचे. कारण अत्यंत वेगाने, एकमेकांशी संपर्क प्रस्थापित करणे, हे बुद्धिमत्तेचे द्योतक समजले जायचे.

काही स्पर्धक हे बायोचिप्सच्या साम्राज्यातून आले होते. अनेक सहस्रकांपूर्वी, त्यांनी आपले सिलिकॉनचे शरीर टाकून कार्बनी संयुगांचा देह धारण केला होता. आकाराने अत्यंत सूक्ष्म असलेले हे सजीव प्राणी आपापसात संपर्क साधण्यात अत्यंत निष्णात होते. अत्यंत वेगाने ते आपले संदेश इतरांना कळवू शकत. फार पूर्वी प्राथमिक अवस्थेत त्यांचे कार्य मानवी

मेंदूच्या पेशीप्रमाणे होते. हजारो वर्षांच्या उत्क्रांतीनंतर, त्यांनी त्यांची कार्यपद्धतीच बदलली होती. मानवी मेंदूतून व्यक्त होणाऱ्या भावना, विचार, त्यांची क्षमता, ह्यापेक्षा कितीतरी अधिक पटीने क्षमता, बायोचिप्सनी स्वतःमध्ये सामावून घेतली होती.

पृथ्वीच्या सर्वात जवळच्या, मंगळावरील स्पर्धक हे रोबोच्या पिढीतील अत्यंत पुढारलेले, उत्क्रांत झालेले स्पर्धक होते. त्यांनी धातूंचे देह धारण केले होते, पण त्यांची कार्यपद्धती अत्यंत अचूक होती. धातूरूपी देहांचा कुठेही अडथळा त्यांना जाणवत नसे कारण त्या धातूंच्या देहाचे नियंत्रण व लागणारी शक्ति ही अत्यंत कुशलतेने निर्माण केलेल्या ऑप्टिक फायबर मधून मिळायची. ऑप्टिक फायबर मधून होणाऱ्या संदेशवहनामुळे, त्यांच्यामध्ये शक्तिप्रवाहाचा नाश होत नसे.

विषाणूंपासून उत्क्रांत झालेले स्पर्धकही ह्या स्पर्धांकरता यायचे. आपलीच प्रतिमा क्षणार्धात किंबहुना त्यापेक्षाही अत्यंत कमी वेळात तयार करून, हवे असलेले संदेश, एकमेकांपर्यंत पोहोचवायचे. जगण्यासाठी लागणाऱ्या त्यांच्या गरजा अत्यंत थोड्या होत्या. फार पूर्वी म्हणजे काही सहस्त्रकांपूर्वी, ते अन्य शरीरात शिरकाव करून, नंतरच आपल्या प्रतिमा निर्माण करत असत. पण आता हजारो वर्षांच्या उत्क्रांतीनंतर, ते अन्य शरीरांशिवाय आपल्या प्रतिमा निर्माण करू लागले होते.

स्पर्धेकरता येणारे, काही ग्रहांवरील सजीव हे महाकाय होते. लोखंडाच्या संयुगापासून त्यांनी देह निर्माण केले होते. त्यांची संदेशवहन पद्धत ही पृथ्वीवरील माणसाच्या केवळ आकलनापलीकडे होती. कोणत्याही माध्यमाशिवाय, लहरीशिवाय, उर्जेशिवाय ते एकमेकांशी संपर्क साधायचे.

हे सारे सजीव, अत्यंत बुद्धिमान होते. आणि आता, ह्या वैश्विक प्रज्ञा स्पर्धेमध्ये भाग घेण्यासाठी येणार होते. ते येथे म्हणजे पृथ्वीवर येणार होते कारण, स्पर्धा पृथ्वीवर भरवल्या जायच्या. गेली कित्येक वर्षे ही प्रथा चालू होती. आणि स्पर्धेची तयारी पृथ्वीवरील सजीव करायचे. हे सजीव म्हणजे दुसरे तिसरे कुणी नसून, माणसेच होती. गेल्या कित्येक सहस्त्रकांत माणसांमध्ये म्हणावा तसा काहीच बदल झाला नव्हता. त्यांचा बुद्ध्यांकही तोच होता. शरीरही तेच होते. नाही म्हणायला त्यांनी थोडीफार वैज्ञानिक, औद्योगिक प्रगती सुरू केली होती. पण तरीही वैश्विक बुद्धिमत्तेच्या मेरीट लिस्टमध्ये, माणूस कुठेच नव्हता. आणि म्हणूनच ह्या प्रज्ञा स्पर्धेत तो भाग घेऊ शकत नसे. किंबहुना त्याला भाग घेण्याची परवानगीच नव्हती. पण तरीही ह्या स्पर्धा पृथ्वीवरच भरवल्या जायच्या. कारण वैश्विक साम्राज्यांच्या नियमांनुसार, कमी बुद्ध्यांक असलेल्या वसाहतींना, साम्राज्यांना त्यांच्या दर्जाचे काम करावे लागत असे. म्हणजेच स्पर्धांची उभारणी, त्या पार पाडण्यासाठी करावी लागणारी, मूलभूत तयारी, अशी कामे माणसांनाच करावी लागत. कारण त्या कामांना फारशी बुद्धिमत्ता आवश्यक नव्हती असे



वैश्विक नियमावलीत म्हटले होते.

त्यामुळे वैश्विक परिसंवाद, स्पर्धा, त्या पार पाडण्यासाठी करावी लागणारी मूलभूत तयारी अशी सर्व कामे पृथ्वीवरील माणसेच करत. अत्यंत उच्च दर्जाचा बुद्ध्यांक असणारे सजीव फक्त स्पर्धांमधून हिरीरीने भाग घेत व अत्यंत वेगवान संपर्काच्या पद्धती शोधून काढत.

अशी ही वैश्विक स्पर्धा, पृथ्वीवर भरवली जात होती. - आणि त्याच्या संपूर्ण आयोजनाचे काम हे प्रा. अक्रूरांकडे होते. त्यांच्या हाताखाली पृथ्वीवरील त्यांचा स्टाफ रात्रंदिवस राबत होता. प्रा. अक्रूर हे स्वतः जातीने, ह्या स्पर्धांच्या आयोजनाची देखरेख करत होते. पृथ्वीवर सर्वत्र जय्यत तयारी चालू होती. कुठले सजीव कोठे येणार याची बारकाईने काळजी अक्रूर स्वतः घेत होते.

दीपंकर हा त्यांचा असिस्टंट होता. शिष्य होता. बुद्धीने अत्यंत कुशाग्र, तल्लख होता. खरं तर ह्या प्रज्ञा स्पर्धेमध्ये भाग घेण्याची त्याची तीव्र इच्छा होती. पण केवळ माणूस असल्यामुळे, तो पात्र नव्हता. त्यामुळे काहीशा निरीच्छेनेच, तो ह्या स्पर्धेच्या तयारीला लागला होता.

त्या दिवशी अत्यंत अनिच्छेनेच त्याने प्रा. अक्रूरांशी संपर्क साधला.

''सर, विद्युत चुंबकीय लहरींचे आगमन होत आहे. त्यांनी कळवले आहे की त्यांच्या उतरण्याची व्यवस्था करावी. सर, ह्या वेळचे ठिकाण, जरा बदलूया का ?''

''नाही, नाही दीपंकर,'' प्रा. अक्रूर जरा गडबडीनेच म्हणाले, ''त्यांना ते आवडणार नाही. त्यांची सोय नेहमीच्याच जागी कर. तेथेच त्यांना, त्यांच्या ग्रहासारखे वातावरण वाटते आणि परकेपणा जाणवत नाही.''

दीपंकरने त्यांची व्यवस्था नेहमीच्याच जागी केली. विद्युत चुंबकीय जनित्रांभोवती. ठरलेल्या दिवशी, विद्युत चुंबकीय लहरींच्या प्रचंड ताफ्याचे आगमन पृथ्वीवर झाले आणि पृथ्वीवरील विद्युत चुंबकीय जनित्रांच्या आसपास त्यांनी मुक्काम केला.

पृथ्वीवरील अत्यंत प्रायोगिक अवस्थेतील, इलेक्ट्रॉनिक खेळणी बनवणाऱ्या फॅक्टरीजवळ अत्यंत प्रगत अवस्थेतील रोबोंची व्यवस्था करण्याात आली होती.

''दीपंकर रोबोना ही फॅक्टरी केव्हाही बघता येईल, याची व्यवस्था कर.'' अक्रूरांनी दीपंकरला सूचना देऊन ठेवल्या. दीपंकरनेही त्या पाळल्या. ते अत्यंत प्रगत रोबो ती प्राथमिक अवस्थेतील फॅक्टरी बघायला यायचे. त्यातील कित्येकजण ह्या फॅक्टरीची खिल्ली उडवायचे. पण तेथील सर्व माणसांना शांत रहावयाचे आदेशही अक्रूरांनी दिले होते. इतकेच नव्हे तर तेथील मॅनेजरनी त्यांची आवर्जून दखल घेतलीच पाहिजे, असे अक्रूरांचे आदेशही दीपंकरने पोहोचवले होते. त्यानुसार रोबोंने दिलेल्या सर्व शेऱ्यांची नोंद, तेथील मॅनेजर करून ठेवत.

बायोचिप्स व विषाणु जातीच्या सजीवांना एकमेकांच्या जवळ, प्रयोगशाळांच्या परिसरात उतरवले होते. त्यांना एकमेकांशी संपर्क साधण्यात नेहमीच स्वारस्य होते.

महाकाय धातूजन्य सजीवांना खाणींच्या जवळ उतरवले होते, तर गॅमा किरणांचे प्रारण करणारे सजीव, आण्विक प्रयोगशाळांच्या जवळ उतरले होते.

ह्या रचनेतला अक्रूरांचा हेतू, दीपंकरच्या माहितीनुसार एकच होता, अन् तो म्हणजे त्या त्या प्रकारच्या सजीवांना, आपापल्या ग्रहांप्रमाणे वातावरण व परीसर मिळावा.

दीपंकरने अत्यंत अनिच्छेनेच सारी तयारी केली. स्पर्धेचा दिवस उजाडला तेव्हा प्रा. अक्रूर जातीने सर्व तयारी बघत होते. वैश्विक नियमांनुसार स्पर्धा आयोजित केली होती. अनेक फेऱ्या पार पडत होत्या. काही स्पर्धक, त्यातून पुढच्या फेऱ्यांकरता निवडले जात होते. दीपंकर मात्र अस्वस्थ होता, मनातून चिडलेला होता. त्याने त्या स्पर्धेतील प्रश्न पाहिले, तेव्हा तो अधिकच वैतागला. काहीसे चिडूनच त्याने अक्रूरांना विचारले.

''सर, हे प्रश्न काय आपल्यापैकी कुणालाच येणार नाहीत ?''

त्याच्या ह्या बोलण्याला बायोचिप्सनी परस्परच उत्तर दिले.

''नाही, शक्यच नाही. कारण तुमचा मानवी मेंदू आमच्या वेगाने संपर्क करूच शकत नाही. आणि हा मेंदूच तुमच्या बुद्ध्यांकांचा दर्शक आहे. त्यामुळे तुम्हाला कुणालाच ह्या प्रश्नांची उत्तरे मिळणार नाहीत. आणि म्हणूनच, तुम्हाला स्पर्धांमध्येही भाग घेता येणार नाही.''

चिडलेल्या दीपंकरला अक्रूरांनी नजरेनेच खुणावले. व गप्प रहाण्यास सांगितले. स्पर्धा संपली. यावेळी स्पर्धा विद्युत चुंबकीय सजीवांनी जिंकली. त्यांचा बुद्ध्यांक सर्वाधिक होता.

स्पर्धेनंतर प्रा. अक्रूरांनी आभाराचे भाषण केले. त्यात सर्व स्पर्धकांची भरपूर स्तुती होती. सर्व परग्रहावरील सजीवांचे कौतुक होते. ''आम्हाला, ह्या स्पर्धांकरता काम करता येते. काम करण्याची संधी मिळते हाच तुम्हा सर्वांचा मोठेपणा आहे. कारण आम्ही तुमच्यासारखे प्रगत नाही. आमचा बुद्ध्यांकही तुमच्या इतका नाही.... तरीही..... !''

प्रा. अक्रूरांच्या भाषणाने, दीपंकरचा पारा अधिकच चढला. इतकी गुलामगिरी, इतकी लाचारी अक्रूरांनी दाखवावी, हे त्याला काहीही करून पटेना.

स्पर्धा संपल्या, सर्व स्पर्धक पृथ्वी सोडून गेले. आणि मनातला राग व्यक्त करत दिपंकरने अक्रूरांना विचारले.

''सर, खरंच का आपण बुद्धीने इतके कमी आहोत ? तुम्ही भाषणातून जे बोललात, ते मला अजिबात पटले नाही.'' दीपंकरच्या प्रश्नांची बरसात होणार हे अक्रूर जाणून होते. किंबहुना ते त्या तयारीनेच आले होते. दीपंकर हा अत्यंत तल्लख होता. नुसताच तल्लख नव्हता, तर अत्यंत स्वाभिमानीही होता. स्वतःच्या कर्तृत्वावर आणि बुद्धीवर त्याचा पूर्णपणे भरंवसा होता.

''दीपंकर, आपला बुद्ध्यांक, त्यांच्यापेक्षा फार कमी आहे, हे माहिती आहे ना तुला ?''

''पण सर, बुद्धिमत्तेचा निर्देशक, बुद्ध्यांक, हे त्यांनीच ठरवले आहे आणि ते आपण खरे मानायचे ? सर, एकमेकांशी अत्यंत जलद, संपर्क साधणे, हा एकच पॅरामीटर बुद्ध्यांकासाठी वापरायचा ?''

''दीपंकर,'' प्रा. अक्रूर आता गंभीर झाले होते.

''आपण माणसे सोडली तर हे सारे सजीव हे एकमेकांशी अधिक वेगाने संपर्क साधतात, हे तुला मान्य आहे ?''

''हो, पण म्हणून काय त्यांना बुद्धिमान म्हणायचे ?''

''दीपंकर आहे ह्या स्थितीत आपण त्यांच्याशी टक्कर घेऊ शकत नाही हेही तुला मान्य आहे ना ?''

''हो''

''मग बुद्धिमत्तेचा दुसरा पॅरामीटर असा आहे की ज्यावेळी शक्तीने टक्कर देता येत नाही, त्यावेळी युक्ती वापरावी. मानव जात ही आतापर्यंत तग धरून राहिली ती केवळ एकमेकांशी संपर्क साधण्यात यशस्वी झाली म्हणून नाही, तर ती चलाख होती म्हणून ! आणि त्या चलाखीने, व्यवहार चातुर्याने तिने पृथ्वीवर राज्य टिकविले.''

''म्हणजे सर, मी नाही समजलो.''

''दीपंकर, आपण स्पर्धा भरवतो, अत्यंत कष्टाने भरवतो, त्या कशाकरिता ? कधी विचार केलास ?''

''विचार करून मी दमलो सर.''

''दीपंकर, आपली वैज्ञानिक, औद्योगिक प्रगती होत आहे. त्याकरिता आपल्याला ऊर्जा लागते, लागणार आहे. प्रचंड प्रमाणावर ज्ञानाचे भांडार खुले व्हावे लागणार आहे. ज्यावेळी आपण ह्या साऱ्या सजीवांना बोलावतो त्यावेळी ते आपली ऊर्जेची, ज्ञानाची गरज पुरी करतात.''

''म्हणजे ? म्हणूनच तुम्ही विद्युत चुंबकीय लहरींना.....'' दीपंकर क्षणभर स्तब्ध झाला.

''होय, म्हणूनच मी विद्युत चुंबकीय लहरींना जनित्रांजवळ उतरवतो. त्या प्रचंड विद्युत चुंबकीय क्षेत्र निर्माण करतात. त्याचा उपयोग आपण वर्षानुवर्षे उर्जानिर्मितीकरता करतो. त्याचप्रमाणे विषाणु आणि बायोचिप्स, एकमेकांना जे संदेश देतात, त्यातून आपल्याला आपल्या शरीरातील रोगांविषयी प्रचंड ज्ञान मिळते. बायोचिप्स- मधील संदेशवहन पद्धत त्यामुळेच आपल्याला कळली आहे. रोबो आपली फॅक्टरी बघतात, चुका काढतात, खजील करतात पण त्यातूनच, त्यांनी दिलेल्या शेऱ्यांमधूनच रोबोचे अद्ययावत तंत्रज्ञान आपल्याला मिळू लागले आहे. दीपंकर, आज नाही तरी भविष्यकाळात ह्या तंत्रज्ञानाचा माणसाला निश्चितच फायदा होणार. आणि त्यावेळी आपली संदेश व्यवस्था, संपर्क व्यवस्था ही अन्य कुणाहूनही सरस असेल. त्यावेळी माणूस ह्या स्पर्धांमध्ये उतरेल. अन् तेवढ्याच समर्थपणे विश्वाला

पटवू शकेल की बुद्धिमत्तेचे अनेक पैलू असतात.'' क्षणभर प्रा. अक्रूर थांबले. दीपंकरच्या चेहऱ्यावरील भराभर बदलणारे भावही त्यांनी टिपले.

''सर तेच मला म्हणायचे आहे की बुद्धिमत्तेला अनेक पैलू असतात.''

दीपंकरला प्रा. अक्रूरांनी मध्येच थांबवले आणि ते गंभीर होऊन म्हणाले,

''अन् त्यातला एक महत्वाचा पैलू असतो तो म्हणजे चतुराई !''

दीपंकर निःशब्द झाला. त्याने मोठ्या उत्सुकतेने प्रा. अक्रूरांकडे बघितले. कधी नव्हे ती त्याच्या प्रश्नांची उत्तरे त्याला मिळत होती. त्याच्या मानी स्वभावाची तगमग कदाचित त्या उत्तरांनी थांबणार होती.

''तेव्हा दीपंकर, वैश्विक स्पर्धांच्या वेळी, आपल्या स्वाभिमानाची ढाल पांघरून न बसता, भविष्यातील मानवाच्या, कल्याणासाठी, तू आता चतुर बन ! आणि मानवजातीचा कसा अधिकाधिक उत्कर्ष ह्या स्पधर्कांकडून आणि स्पर्धांमधून साधला जाईल हे बघ.''

ह्या घटनेला आता काही काळ लोटला. पण तेवढ्या काळात, मानवाने इतकी प्रगती केली की जगातील सर्वात बुद्धिमान समजल्या जाणाऱ्या विद्युत चुंबकीय लहरींना, जनित्रांत बंद करून, स्वतःच्या संदेशवहनाकरता त्याने वापरले.

विषाणुंकडून, प्रतिमा बनवण्याचे तंत्रज्ञान आत्मसात करून, रोगांवर स्वामित्व मिळवले. महाकाय धातुरूपी सजीवांमार्फत बलाढ्य औद्योगिक, उभारणीची कामे करून घेतली. आणि बायोचिप्सना संगणकात बंद करून ज्ञानाचे नवे दालन उघडले.

आता पृथ्वीवर बाहेरून सजीव येत नाहीत. पृथ्वीवर वैश्विक बुद्ध्यांक स्पर्धाही भरत नाहीत कारण, बुद्ध्यांकाचा अर्थ आणि बुद्धिमत्तेची व्याख्याच माणसाने बदलली आहे. आणि अन्य सजीव आकारांवर प्रभुत्व मिळवून माणसाने त्यांना स्वतःच्या उत्कर्षासाठी वापरले आहे.

विश्वास बसत नसेल तर टी.व्ही. लावा, इंटरनेट लावा, अथवा विजेवरील कुठलेही उपकरण लावा. विद्युत चुंबकीय लहरी ह्या तुमच्या सेवेसाठी क्षणार्धात हजर होतील !

◆ ◆ ◆

**'विज्ञानयुग'चा हा दीपावली विशेषांक नोव्हेंबर - डिसेंबर २००० चा जोड आहे. डिसेंबर २००० चा अंक वेगळा प्रकाशित होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी. या पुढील अंक १ जानेवारी २००१ रोजी प्रकाशित होईल.**



# बदला

❒ डॉ. द. व्यं. जहागिरदार

*आपण दगडाइतके थोडेच कठीण आहोत ?*
*नाही सहन होत हे जीव घेणे वातावरण ....*
*मग काय करायचं आपण ? ....*

*''सैतान यायची वेळ झाली. पाच दहा मिनिटात पोर्चमध्ये थांबेल त्याची कार.''*

*''हो, आणि मग कर्कश वाजत राहील त्याची कॉलबेल. दरवाजा उघडेपर्यंत.''*

*''तो आत येईल आणि थरकाप उडेल दोघींचा. किचन मधून आपलं काम अर्धवट सोडून मॅडम धावत येतील आणि त्यांची मुलगी-ती लहानशी गोंडस डॉली आईच्या मागे आधीच येऊन उभी राहील. थरथर कापत.''*

*''आणि आपण सर्व निश्चल. एकाचित्ताने पाहत बसू त्यांचेवरील अत्याचार. दररोज होणारी मारहाण. काहीतरी निमित्त काढेल तो सैतान. बेल्ट काढेल आणि सपासप बदडून काढेल मॅडमला. तिला सोडवायला डॉली जाईल. आईच्या अंगावर झोकून देईल स्वतःला. तो मग डॉलीलाही मारत राहील. त्यांच्या शरीरातून रक्त बाहेर येईपर्यंत. त्या मूर्च्छित होईपर्यंत. तोंडाने शिव्यांचा भडीमार आणि तोंडातून येणारा दारूचा भपका सर्व घरात भरून जाईल.''*

*''हो आणि आपण पराभूत, हतबल झालेले पाहत राहू ते अत्याचार.''*

*''न पाहून आपण काय करणार ? आपल्याला नाहीत हातपाय ? नाही दमदार शरीर.''*

*''तुझं स्टेटमेंट अपुरं आहे. मुख्य म्हणजे आपल्याला नाही बुद्धी आणि मानवासारख्या भावना. आपण आहोत फक्त उपकरणें. मानवाने स्वतःच्या फायद्यासाठी, स्वार्थासाठी निर्माण केलेली. माझ्या वापराने तो दूरवर बोलतो, बोलू शकतो आणि तुला ऑन केलं की दूरवरचं पाहू शकतो. आपण सदैव आहोत त्याच्याच आज्ञेत. म्हणूनच नाही स्वतःची प्रज्ञा.''*

*''समोरच्या टेबलावरचा संगणक, मानवापेक्षा किती जलद वेगाने काम करतो तो. पण शेवटी माणसाचा गुलामच आणि कोपऱ्यात उभा असलेला तो रोबो. सर्व तसे हुषार पण सांगकामे. स्वतःहून काहीच करता येत नाही त्यांना.''*

*''कोणतीही निर्जीव वस्तू सजीव मानवाच्या मदतीशिवाय क्रियाशील होऊच शकत नाही, हा मानवाने स्वतः निर्माण केलेला अहंकारी नियम.''*

*''आपल्याला बुद्धी नाही. भावना नाहीत पण मॅडमच्या किंकाळ्या आणि डॉलीचे हुंदके ऐकले की माझा ताबाच राहत नाही माझेवर. दगडाला पाझर फुटतो. आपण तर दगडाइतके कठीण थोडेच आहोत ? नाही सहन होत ते जीवघेणे वातावरण. नशेत चूर असलेला एक नरपशू हतबल पत्नीला असा पिटतांना पाहून.''*

*''मग काय करायचं आपण ?''*

*''किती वेळ सहन करायचं ?''*

''मम्मी, किती वेळ सहन करायचं आपण ?''

डॉलीच्या ह्या प्रश्नाने मम्मी आणखीनच घाबरून जायची. सकाळी केव्हातरी अल्बर्ट बाहेर पडतो. भेदरलेली डॉली मग एकदम तिला बिलगते आणि मोठमोठ्याने हुंदके देत विचारते,

''मम्मी डॅडी कुठे गेलेत ग ? आणि तू त्या माणसांला आपल्या घरात का आणलंस?''

''तो माणूस तुझा नवीन डॅडी आहे.'' मम्मी उत्तर द्यायची.

''माझा नवा डॅडी, मारकुटा, माझा जीव घ्यायला टपलेला. नाही मम्मी हा माझा डॅडी नाही. सैतान आहे, सैतान !'' डॉली अस्पष्ट बोलायची. संतापाने तिचं सारं शरीर हिंदकळायचं.

''सांग मम्मी, कशाला आणलंस या माणसाला तूं आपल्या घरी ?''

कशाला आणलं मी अल्बर्टला माझ्या या बंगल्यात? जॉनने किती कष्ट करून दुबईहून आणलेला पैसा वापरून हा भव्य बंगला बांधला. माझ्या आवडीप्रमाणे. त्रिवेंद्रम पासून चाळीस किलोमीटर अंतरावर बॅकवाटर - अलेप्पी नदीचं. त्यातून शांतपणे मार्ग काढणाऱ्या छोट्या नावा आणि आजूबाजूला केरळचा तो नयनरम्य परिसर, हिरवागार, नारळाच्या झाडांनी बहरलेला. या घराला कित्ती कित्ती सजविलं आम्ही दोघांनी. शहरापासून दूर पण शहराच्या सर्व सुविधा असलेला हा बंगला, अगदी एकटा !

कोणाची तरी दृष्ट लागली असावी माझ्या सुखाला. जॉनला हार्ट अटॅक आला. पहिलाच पण मॅसीव्ह. दहा तासात सर्व संपलं. आणि मी एकटी झाले. सोबतीला फक्त दोन वर्षांची डॉली आणि ती भव्य वास्तू ! एकलेपणच मग खायला उठायचं मला. आजूबाजूचा निर्मम परिसर भयाण वाटायचा मला. पूर्वीचं त्याचं सौंदर्य संपून गेलं माझ्यासाठी. निसर्गाचं सौंदर्य तुम्हाला आनंदित करते. ते तुम्ही आनंदी असतानाच! पण निसर्गाचं चक्र थांबत नसतं. हळूहळू माझा जीवनक्रम पूर्वपदावर येऊ लागला. मी बाहेर पडू लागले, बँकेत जाऊ लागले. आणि त्या बँकेतच अल्बर्ट भेटला - निव्वळ योगायोगाने !

कॅश काउंटर वरून मी वीस हजार रुपये घेतले. नोटांचे गठ्ठे उचलले. पर्समध्ये टाकले. बँकेत गर्दी नव्हतीच. माझ्या मागे कोणीहि नव्हते. समोरच्या बाकावर मी भाजीने भरलेल्या पिशव्या ठेवल्या होत्या. त्या घेण्यासाठी पुढे आले. लगबगीने मी बाहेर आले. कारमध्ये पिशव्या ठेवल्या आणि एकदम मला आठवण झाली माझ्या पर्सची !

मी पर्स विसरले होते !

घाईनेच मी कारचा दरवाजा ढकलला. दोन पावलं टाकणार तोच कोणीतरी माझ्या समोर उभा.

''मॅडम, आपली पर्स.'' त्याच्या चेहऱ्यावर हास्य होते.

''थँक्यू''

''थँक्यू आधी नाही, पैसे मोजून बघा. नंतर थँक्स द्या.''त्याचा आवाज हळूवार होता. आपण पर्स उघडली. नोटांचे चार गठ्ठे अगदी जसेच्या तसे होते. आनंदानेच आपण पर्स बंद केली.

''आता म्हणू शकता तुम्ही थँक्यू.''

''आपलं नाव ?''

''अल्बर्ट पिंटो.''

''काय करता आपण येथे ?''

''मी कारखान्यात असतो. मूळचा मी गोव्याचा.''

''मीही गोव्याचीच''

''सुंदर योगायोग, बरंय मॅडम निघतो मी.''

''पुनः भेटू आपण, असं करता का? माझ्या घरीच या ना उद्या रविवारी दुपारी.''

मी माझं कार्ड दिलं.

अल्बर्ट दुसऱ्या दिवशी अगदी वेळेवर आला. डॉलीशी खूप गप्पा मारल्या त्याने. गाणीही म्हणून दाखविली. मला जाणवली ती त्याची बलदंड शरीरयष्टी पण त्याला विरोधी असा नाजूक, हळूवार, कनवाळू आवाज आणि त्याच्या मॅनर्स !

तो मग येतच राहिला.

तो मित्र कधी झाला ते कळलंच नाही मला. त्याचा पहिला नाजूक स्पर्श पुलकित करून गेला. कवि मनाच्या, शांत, मृदु स्वभावाच्या अल्बर्टकडे पाहता पाहता ओढली गेले मी.

मीच लग्नाचा प्रस्ताव मांडला प्रथम. त्याने आढेवेढे घेतले. 'आपण पुनः शांतपणे विचार करा मॅडम' तो म्हणाला. हो अगदी लग्नापर्यंत तो मला मॅडमच म्हणायचा आणि मी सुखावून जायची.

लग्नाचा सोहळा आटोपून चर्चमधून मी घरी आले ते आनंदाच्या लाटांवर तरंगतच.

''सारा, समोरचा दरवाजा बंद कर.'' पिंटोचा आवाज निराळाच होता.

''मला नावाने हाक मारलीस तू अल्बर्ट ?''

''हो आता तू माझी मॅडम थोडीच आहे ? यू आर माय वाईफ. सारा. फ्रीजमधून सोड्याच्या

बाटल्या आण, आणि डॉलीला तिच्या खोलीत घेऊन जा.''

''अल्बर्ट, राहू दे तिला इथे.'' माझाही आवाज थोडा चिडका झाला.

''नो'' अल्बर्टचा आवाज चढला होता,

"You know three is a crowd." त्याच्या शब्दात आचरटपणा होता. मी मात्र हललेच नाही. अल्बर्ट उठला. त्याने डॉलीला उचललं, तरातरा तिच्या खोलीकडे नेलं, तिच्या पलंगावर आदळलं, तिच्या खोलीचा दरवाजा बंद केला, बाहेरून कडी देखील घातली त्याने.

त्याच्यातला पशू त्या रात्री प्रथम दिसला मला. अक्षरशः ओरबाडून घेतलं मला त्यानं. धडपडत कशी तरी उठले मी सकाळी. डॉलीच्या खोलीचा दरवाजा उघडायला. पण मला मागे टाकत दरवाजापुढे उभा होता अल्बर्ट.

''मला विचारल्याशिवाय दरवाजा उघडायचा नाही सारा.''

''कां ?''

''कां म्हणजे ? मी म्हणतो म्हणून.''

''तू कोण, कोण तूं अल्बर्ट ?'' माझा सर्व त्वेष पाण्याच्या प्रपातासारखा माझ्या चेहऱ्यावर ओसंडला होता.

''मी कोण ? मी तुझा नवरा ? त्याने माझं बकोट धरलं, दोन पंज्यामध्ये माझा चेहरा दाबला आणि विकट हास्य करीत तो म्हणाला,

''मी तुझा नवरा, या घराचा मालक'',

''मालक, घराचा मालक ?'' कुत्सितपणे मी विचारले.

''हो मालक. तू आता माझी गुलाम आयुष्याची.'' मी त्याला ढकलायचा प्रयत्न केला. पण काही कळायच्या आत त्याने माझ्या गालावर आपल्या सर्व शक्तिनिशी आपला पंजा उमटविला. मी कळवळले. तो मारतच राहिला, मी खाली पडेपर्यंत ....

* * *

***कार पोर्चमध्ये थांबल्याचा आवाज झाला. काही क्षणातच कर्कश बेल वाजू लागली. मी टी.व्ही., संगणक, ओव्हन आम्ही सर्वांनीच ऐकला तो आवाज. मला वाटलं रोबो उघडेल दरवाजा, पण तोही नुसता उभाच होता पुतळ्यासारखा. बेल वाजतच राहिली.***

लंगडत, आपला देह एका पायावर ढकलत सारा येत होती. तिचं तोंड सुजलं होतं. डोळ्याखाली रक्त गोठलं होतं. एक डोळा काळानिळा झाला होता.

''गधडे, कुठे गेली होतीस मरायला ?'' आत शिरताच अल्बर्टने प्रश्न केला. सारा काहीच बोलली नाही, तितका त्राणच नव्हता तिच्या शरीरात. लटलटा कापत होती ती.

अल्बर्ट सोफ्यावर ऐसपैस टेकला. पाय लांब केले त्याने. टीपॉयवर बुटाचे पाय ठेवले. निमूटपणे सारा पुढे आली. बुटाची लेस सोडू लागली.



''तुझी जिरली का नाही सारा ? सकाळी फोन केला होतास तू बँकेला. मला पैसे देऊ नका म्हणून ?''

सारा चूप होती.

''हरामखोर मला कंगाल समजतेस का? पैसे कसे मिळवायचे ते समजतात मला.'' अल्बर्टने सूटकेस उघडली. एकदम उघडी केली. नोटांचे गड्डे खाली पडले.

''मोज मोज, एक लाख रुपये आहेत. हा तुझा बंगला मी विकणार. तुला भिकारी करून परत जाणार माझ्या गावी.'' तो विकट हसू लागला.

''घे सारा, एखादं बंडल उचल, माझी भेट म्हणून.'' छद्मीपणे तो हसू लागला. मानभावीपणे तिच्या पाठीवर हात फिरवीत तो म्हणाला.

''सारा तुझ्यासारखा मी मूर्ख नाही. तुझ्या त्या वीस हजार रुपयांना मी स्पर्श केला नाही. म्हणून आज वीस लाखांचा धनी झालो.

'तुम्ही स्त्रिया बावळट असता. तुम्हाला हवी असते पुरुषांची संगत. आणि हा पुरुष सज्जनच असावा असं वाटतं तुम्हाला. उगाच कणव निर्माण होते तुमच्या मनात. त्याचा फायदा मी घेतला. भरपूर उचलला. एका महिन्यात वीस लाख रुपये कमावले मी.''

खसकन् साराला ओढलं त्याने.

''नालायक. ऐकत का बसलीस इतका वेळ. माझे ड्रिंक्स आण.''

ट्रेवर बाटल्या, ग्लासेस, बर्फाचे चौकोन ठेवलेला फ्लास्क दोन्ही हातात धरून लंगड्या पायांनी सारा चालत होती.

''लवकर पाय उचल, मूर्खे'' अल्बर्टच्या ओरडण्याने ती क्षणभर भेदरली. तिचे हात कंपाने थरथरू लागले. आणि ट्रेवरील सर्व वस्तू खाली पडल्या. मोठा आवाज आला. दारू बाहेर सांडली होती, काचा विखुरल्या होत्या. ढांगा टाकीत अल्बर्ट तिच्या समोर आला. त्याने तिला जोरात ढकललं.

''चांडाळणी, एवढं महागाची दारू सांडलीस तू ? पैसे कोण भरून देणार तुझा बाप ?'' संतापाने तो थयथयाट करीत होता. तिला पायांनी तुडवीत होता. तिच्या जीवघेण्या किंकाळ्यांनी सारा हॉल भरून गेला होता.

''मेले, मी मेले'' तिचा आक्रोश चालूच होता.

'मर, मग खरोखरच मर तू ?'' त्याने तिचे पाय पकडले आणि ओढत ओढत डॉलीच्या खोलीत तिला आणून फेकले.

''मरा तुम्ही दोघी मायलेकी.'' त्याने दरवाजाची कडी बंद गेली.

टेलीफोनची बेल वाजू लागली.

''हॅलो ''

''सारा आहे का ?''

''येथे सारा वगैरे कोणी नाही.'' अल्बर्टच्या उत्तरात पुरेपूर संताप होता. दोन मिनिटांनी पुनः तीच बेल. तीच प्रश्नोत्तरे !

''तुम्हाला सांगितलं नं, सारा येथे राहत नाही.''

एक दोन मिनिटे शांततेत गेली.

पुनः बेल झाली.

''नसती कटकट.'' म्हणत अल्बर्ट पुढे आला. टेबलावरून टेलीफोनला उचलले आणि ते उपकरण रागाने दाणकन् खाली आपटले त्याने. ''नसती कटकट'' तो पुनः पुटपुटला. बुटाची लाथ त्यानं माऊथपीसवर घातली व त्याच लाथेने टेलीफोन बॉक्सला फुटबॉल उडवितात तसे उडविले. भिंतीला जोरदार टक्कर देऊन तो बॉक्स खाली पडला....

***साराचे दुःख आम्ही उघड्या डोळ्यांनी पाहिलं म्हणून माझ्यावर हा प्रसंग आला. मी काय त्या अल्बर्टला विरोध करीत होतो? पण सारा तरी विरोध करीत होती थोडीच ? सैतानाचं असंच असतं. ते आक्रमक होतात, सजीवावर व निर्जीवावर देखील ! उत्तरेकडून आलेल्या आक्रमकांनी नुसती माणसंच मारली नाहीत, तर जुन्या काळी देवदेवतांच्या मूर्ती देखील भग्न केल्या. सजीव व निर्जीवातला फरक करतच नाहीत ही क्रूर माणसे. चांगुलपणाचा, सौजन्याचा नायनाट करणारी ही मंडळी. पण आपण किती सहन करायचं ? सकाळीच हा प्रश्न तुम्हा सर्व मंडळींना मी केला होता. तू टी.व्ही, तू संगणक, तूं रोबो काहीच बोलला नाहीत. तुम्ही आम्ही काय करू शकतो ? तुम्ही म्हणालात, अरे महाभारतातल्या द्रौपदी वस्त्रहरणाचे वेळी भीष्म, द्रोणाचार्य, असेच वागले, निश्चल शांत. सज्जन माणसे संस्कृतीचं जतन करतात म्हणूनच दुष्टांचं फावतं. दुष्टांना त्यांच्या भाषेतच उत्तर द्यायला हवे. आक्रमण हीच स्वसंरक्षणाची पहिली पायरी असं चर्चिल म्हणायचा. म्हणूनच तो हिटलरचा निःपात करू शकला. आपला हा अल्बर्ट सैतानच नाही. तो हिटलर आहे, दुसरा हिटलर.***

***''तू म्हणतोस ते समजतं आम्हाला. पण आमच्याजवळ काय शस्त्रे आहेत ? शिवाय आपण काय चालू शकतो ? सैतानाला तोंड देणं सोपं नाही.''***

***''तुम्ही असेच निष्क्रीय राहणार. आपली नाही तर निदान त्या छोट्या डॉलीची अवस्था पहा.''***

***''आमचा विदूर झाला आहे. तुला महाभारत आवडतं म्हणूनच त्यातील एका व्यक्तीचं नाव घेतलं.''***

अल्बर्ट सोफ्यावर लांब पाय करून पसरला होता. त्याच्या हातात बीयरचा कॅन होता, खाली जमिनीवर चार पाच रिकामे कॅन्स अस्ताव्यस्त पडले होते. समोरच्या टीपॉयवर सफरचंद होती. कापण्याची सुरी होती. अल्बर्टने सफरचंद आपल्या मुठीत धरलं, डाव्या हाताच्या मुठीत. उजव्या हातात धारदार सुरी घेतली. हा धसमुसळा स्पर्श सुरीला अनोखा होता. साराचा स्पर्श कसा नाजूक असायचा. दुपारी डॉलीसाठी सफरचंदाच्या हळूवार पद्धतीने फोडी करायची ती. अल्बर्टनं मला अगदी जबरदस्तीने मुठीत पकडल्यासारखं वाटते. स्वतःला समजतो कोण ? सुरीला राग आला. फळावर सुरी ठेवली त्याने. जोर देऊन फळ कापणार, इतक्यात त्याच्या मुठीतून सटकली ती. जोराने आपटली त्याच्या डाव्या हाताच्या अंगठ्यावर. तिचा त्वेष तिच्या वेगात जागृत होता. त्याचा अंगठा तुटल्यातच जमा झाला. भळभळा रक्त वाहू लागले. तो विव्हळला. रक्ताने त्याचा पंचा भरून गेला. जमिनीवर रक्त सांडू लागले. वेगाने तो बेसिनकडे पळाला. डेटॉलने जखम धुण्यासाठी, पाण्याने स्वच्छ करण्यासाठी. पण जाताना त्वेषाने सुरी पुनः मुठीत घेतली त्याने आणि मनात शिव्या पुटपुटत जोराने फेकली. ती दूर जाऊन आदळली ती खिडकीच्या काचेवर. काच फुटल्याच्या आवाजात, सुरी पडण्याचा आवाज लुप्त झाला.

* * *

***पाहिलंत ? तुम्ही म्हणत होता ना, आपण निर्जीव, आपण काय प्रतिकार करणार ? त्या लहानशा सुरीने मार्ग दाखविला आहे तुम्हाला. ती अल्बर्टच्या पंज्यातून त्याच्या चुकीने सुटली नाही. स्वतःच्या हुषारीने तिने सोडवणूक केली आपली. धडा शिकविला सैतानाला. म्हणून म्हणतो जागे व्हा. जागृत व्हा. आपण सर्व एक होऊन देऊ टक्कर त्याला.***

अल्बर्ट आतल्या आत धुमसत होता. चिडण्यासाठी समोर सारा नव्हती म्हणून स्वतःवरच चिडला होता तो. पण त्याला राग आला होता त्या धारदार सुरीचा. सर्व साले माझ्या विरुद्ध आहेत. साराची माणसं, साराच्या वस्तू माझा द्वेष करतात. रागाने तो उठला. समोरचा टीपॉय त्याने लाथाडला. डॉलीची खेळणी लाथेने उडविली. भिंतीवरील फोटो फ्रेम्स काढून त्यानं त्या जमिनीवर फेकल्या आणि तो थयथय नाचला त्या फोटोंवर. शेवटी तो थकून गेला. सोफ्यावर आडवा झाला. हातात रिमोट कंट्रोल घेऊन त्यानं टी.व्ही. ऑन केला. त्याची आवडती चॅनेल लावण्यासाठी कंट्रोलचे स्वीच दाबत राहिला, पण ते चॅनेल काही लागेचना.

''सर्व साले बदमाश. साराच्या वस्तू. माझं काय ऐकणार ? त्याने साउंड स्वीच प्रेस केलं. कानठळ्या बसाव्यात एवढा आवाज झाला. पण त्याचं चॅनेल काही लागेना. 'खोटारडे, बदमाश, हरामखोर' तो संतापत ओरडला. सोफ्यावरून उठला. टी.व्ही. जवळ गेला. गदगदा हलवलं त्याला. आणि काही कळण्याच्या आत जमिनीवरील काठी त्याने उचलली. आणि आपटू लागला तो टी.व्ही. च्या शरीरावर, साराला मारायचा तोच, तसाच त्वेष होता त्याच्या मारण्यात. स्क्रीन तुटला. फ्रेमला क्रॅक्स गेल्या. सर्व ताकद एकत्रित करून त्याने तो टीव्ही उचलला आणि त्वेषाने जमिनीवर आदळला.

''हीच शिक्षा, हीच शिक्षा हवी तुम्हाला. माझ्या विरुद्ध वागता का ? मग मरा साल्यांनो, तुमच्या मालकिणीसारखं.'' खाली पडलेल्या टी.व्ही. च्या बॉक्सला लाथेने तुडवीत काहीतरी

तो पुटपुटला. त्या शिव्याच असणार.

*''तू रोबो, तू संगणक, पाहिलीस टी.व्ही.ची हालत ? तुमचाही शेवट असाच होणार. हा सैतान सर्वांनाच खतम करणार. आपण षंढ, म्हणून चूप बसणार, लढणार नाही अन्यायाविरुद्ध. काही शिका त्या सुरीपासून.''*

*''आम्ही तयार आहोत. पहाच माझी कमाल.'' संगणक बोलला.*

हॉलमध्ये वस्तू अस्ताव्यस्त पडल्या होत्या. जिकडे तिकडे काचाच काचा. त्या साफ करणारी सारा बेशुद्धावस्थेत होती. घरात नोकर नव्हते. अल्बर्टनं ते मुद्दाम ठेवले नव्हते. घरातला आवाज बाहेर जाणं शक्य नव्हतं. आसमंतात जवळपास दोन फर्लांग मनुष्यवस्ती नव्हती. संध्याकाळ झाली होती. करमणुकीची काहीच साधनं नव्हती. टी.व्ही. जायबंदी झाला होता. आता संगणकाबरोबर वेळ घालवणं भाग होतं. अल्बर्टने तो ऑन केला. माऊसला पुढे मागे केलं. पडद्यावर मोठ्या आकाराची, ठळक अक्षर उमटू लागली.

'सैताना, येथून निघून जा.'

अल्बर्ट पाहतच राहिला. अक्षरे मिटली गेली. नवीन संदेश आला,

''तुला म्हणतो आहे मी अल्बर्ट, तू सैतान आहेस, खुनी आहेस, येथून निघून जा.''

अल्बर्टची नशा आपोआप उतरली. एका क्षणातच. कोणी दिला हा संदेश ? डॉलीने का साराने ? तो संदेश नष्ट करण्याचा नवीन संदेश दिला त्याने संगणकाला. पण संगणक थंडच. तोच जुनाच संदेश पडद्यावर. आणि तो संदेश मोठ्या आवाजात पुनः पुनः स्पीकर मधून येत होता.

''सैताना, निघून जा येथून.''

अल्बर्ट त्वेषाने लालीलाल झाला. आपल्या खुर्चीवरून तो उठला. संगणकाला गदगदा हलविलं त्यानं. पण तो संदेश काही संपेचना, बंद होईना. ''खालीच फेकतो तुला'' म्हणत तो संगणकाला उचलायला गेला.

पण त्याचा हात पकडला कोणीतरी. गच्च धरून ठेवला. अल्बर्ट दांडगट होता. त्यालाही आपला हात सोडविता आला नाही. त्याच्या हातावर पडलेली मूठ धातूची होती, बळकट होती. अल्बर्ट क्षणभर भेदरला. पण तो क्रूर होता. पायानेच त्याने संगणक ठेवलेल्या टेबलाला लाथ मारली. टेबल तिरपं झालं आणि संगणक खाली पडला. अल्बर्टच्या हाताची पकड ढिली झाली. 'मला पकडतोस तूं ? माझा नोकर तूं, मला पकडतोस ?' असं त्याने ओरडत जोरात धक्का दिला त्याला.

रोबो जमिनीवर आडवा पडला होता.

* * *

आता नाही राह्यचं इथे. रात्री एखाद्या हॉटेलात राहू त्रिवेंद्रमच्या. सकाळी येऊ परत. अल्बर्टने विचार केला. खिशात नोटांची दोन बंडले भरून घेतली. साराच्या खोलीचं दार उघडलं. डॉलीला कुशीत घेऊन ती निपचित पडली होती. अल्बर्टने दार बंद केलं. सर्व दिवे मालवले आणि समोरचा दरवाजा बंद केला.

मोटारीचा वेग त्यानं एकदम वाढविला. रस्ता निर्मनुष्य होता. त्याने वेग आणखी वाढविला. पण हा वेग फारच वाढल्याचं त्याच्या ध्यानात आलं. काटा 160 किमी वेग दाखवीत होता. इतका वेग त्याला नको होता. त्याने वेग कमी करण्यासाठी प्रयत्न केला. तो थोडा वाकला. कार थोडी कलली. संपूर्ण वेगाने तिने रस्ता सोडला. समोरच्या झाडावर जाऊन आपटली ती. मोठ्ठा आवाज झाला. कार चेपली होती समोरून. अल्बर्टची मान, चेहरा व्हीलवर टेकला होता.

* * *

*मला मारायचं नव्हतचं त्याला, अद्दल घडवायची होती सैतानाला. आयुष्यभराची शिक्षा केली मी त्याला. त्याचे दोन्ही हात, पाय लुळे झालेत. आम्हाला लाथा मारतो ? साराला तुडवितो ? आता तो पायच जायबंदी झाला त्याचा. आयुष्यभर पांगळा राहील तो. संध्याकाळचा त्याचा धिंगाणा डोळ्यांनी पाहत होते मी. तेव्हाचं मी निर्णय घेतला. याला अद्दल घडवायची.*

*डॉलीचे हुंदके फिरता आहेत माझ्या कानात, साराच्या किंकाळ्या आणि आमच्या जमातीचे संगणक, टीव्ही, टेलिफोन यांचे अश्रू दिसलेत मला.*

*मी ठरविलं बदला घ्यायचा.*

*अगदी नकळत.*

*वेग वाढविला माझा. कसे ते कळलेही नाही सैतानाला. जायबंदी केला त्याला, मी देखील जायबंदी झाले. पण चालेल मला काही दिवस गॅरेजमध्ये आराम करायला.*

*मी सुखी आहे. समाधानी आहे. मी बदला घेतला.*

*शेवटी मलाही काही भावना आहेत की नाहीत ?*

◆◆◆

# ब्रकाबक

❒ शुभदा गोगटे

***केवळ गवत खाऊन ऊर्जा मिळवणारा, आज्ञाधारक यंत्रमानव आता कागद, इतकंच काय कपडे सुद्धा खाऊ लागला आणि एकच गोंधळ उडाला. यंत्रमानवाचंच डोकं फिरतं तर काय करायचं ?***

सुहिता ऑफिसशी पोचली तेव्हा साडेदहा वाजून गेले होते. आज तिला खूपच उशीर झाला होता. खरं म्हणजे सध्या ती रोज सकाळी आठ वाजताच कामावर येत होती आणि रात्री नऊ-साडेनऊपर्यंत थांबतहोती. त्यामानानं आज खूपच उशीर झाला होता. सगळे सहकारी कामात बुडलेले असतील आणि आपल्याला मात्र उशीर झाला असं वाटून थोडीशी ओशाळी होत ती ऑफिसमधे शिरली आणि बघतच राहिली.

ऑफिसमधे एकच गोंधळ सुरू होता.

त्यांची कंपनी संगणक सॉफ्टवेअर क्षेत्रातली एक नावाजलेली कंपनी होती. त्यामुळे नेहमीच त्यांच्याकडे भरपूर काम असायचं. पण सध्या तर कामाची खूपच घाई असल्यामुळे बहुतेक सगळेजण लवकरच येऊन कामाला जुंपलेले असत. त्यामुळे आपल्याला सगळे कामात बुडलेले बघायला मिळतील असं सुहिताला वाटलं होतं. पण बघते तो काय, जवळजवळ सगळीच माणसं आपल्या जागेवरून उठून घोळक्या- घोळक्यानं कसली तरी चर्चा करत उभी होती.

आणि सगळेजण हातातलं काम अर्धवट टाकून उठले होते हे नक्की, कारण सगळ्यांच्या मॉनिटर्सवर स्क्रीनसेव्हर्स नाचतानां दिसत होते. सुहितानं पर्स आणि हातातलं पुस्तक तिच्या टेबलवर ठेवलं आणि ती मीनलकडे वळली. मीनलभोवती तीन-चार जण जमले होते आणि मीनल तावातावानं काहीतरी सांगत होती. सुहिताकडे तिचं लक्ष गेलं आणि तिच्याकडे वळून ती रागारागानंच म्हणाली,

"सुहे, त्या तुझ्या मानसला काहीतरी सांग जरा. उगाच कोणावर तरी संशय घेत जाऊ नकोस म्हणावं. मला काय करायचं आहे त्याचे प्रिंटाऊट्स घेऊन ? मला माझी कामं काय कमी आहेत का ?"

"कसले प्रिंटाऊट्स ? काय म्हणते आहेस तू ?" सुहितानं गोंधळून विचारलं.

"काल त्यानं म्हणे त्यानं लिहिलेल्या नवीन कोडची प्रिंट्स काढली होती घरी नेण्यासाठी. त्याला त्याच्यावर अजून विचार करायचा होता म्हणे. आणि शहाणा ते कागद घेऊन जायला मात्र विसरला. आज तो कामावर आला आणि बघितलं तर ते कागद त्याला सापडत नाहीयेत. त्याला आता मी काय करणार ?"

"सापडत नाहीयेत ? .... आणि, नाही पण, तो तुला म्हणतोय का की तू ते कागद घेतलेस म्हणून ?" सुहितानं विचारलं.

"हो ना. त्याला वाटतंय की मी त्याचे कागद कुठेतरी लपवून ठेवले आहेत, त्याची गंमत करण्यासाठी म्हणून, आणि ते देत नाहीये."

"पण ते तू लपवले आहेत असं त्याला का वाटतंय ?"

"कारण ही काल सगळ्यात शेवटी, मानसच्याही मागून ऑफिसमधून बाहेर पडली आणि आज सगळ्यात आधी कामाला आली. त्यामुळे तिनंच ते लपवले असं त्याला वाटतंय." मीनलच्या ऐवजी पंकज म्हणाला.

"नाही, पण काहीतरी गोची आहे बरं का," संभाषणात भाग घेत शबीर म्हणाला. "मानसचे कागद गेले, माझं एक पुस्तक दिसत नाही आहे, विकासनं काही नोट्स त्याच्या कॉम्प्युटरशेजारी ठेवल्या होत्या, त्या नाहीयेत आणि कोपऱ्यातल्या टेबलवरची सगळी वर्तमानपत्रं आणि मासिकंही नाहीशी झाली आहेत. आरतीच्या टेबलवर तिनं ठेवलेले पेपर नॅपकिन्सही दिसत नाहीयेत म्हणे."

"म्हणजे ? म्हणजे काय सगळे कागद कोणीतरी पळवले आहेत की काय ?"

"पण मी कशाला त्याचे प्रिंटाऊट्स घेऊ? मला काय करायचा आहे त्याचा कोड ? उगाच काहीतरी आरोप करायचे म्हणजे काय?" मीनलचा राग अजून धुमसत होता.

तेवढ्यात दुसऱ्या एका घोळक्यातून बाजूला होऊन मदाने त्यांच्याकडे येत म्हणाला, "वुई हॅव टू गेट टू द बॉटम ऑफ धिस थिंग, यार. कम, लेट अस हॅव अॅन इन्फॉर्मल मीटिंग."

बोलताना सारखं फाड-फाड इंग्लिश फाडण्याच्या आणि प्रत्येक गोष्टींचा बाऊ करण्याच्या मदानेच्या सवयीला ऑफिसमधले सगळेच वैतागत असत पण आत्ता मात्र तो म्हणत होता त्याला सर्वांनी मान डोलावली. तो म्हणत होता ते खरं होतं. ऑफिसमधल्या बऱ्याच जणांचे कामाचे कागद, पुस्तकं, वर्तमानपत्रं, असं काही काही दिसत नव्हतं. म्हणजे कोणीतरी ऑफिसमधे घुसून ते सगळं चोरलं होतं की काय ?

त्यांचं सॉफ्टवेअर चोरण्याचा तर तो प्रयत्न नव्हता ? असं असलं तर ती गंभीर बाब होती.

ऑफिसच्या तीन मजली इमारतीतल्या त्या पहिल्या मजल्यावरची सगळी जागा सुहिताच्या डेव्हलपमेंट सेक्शननं व्यापली होती. सेक्शन मॅनेजर मानसची केबिन आणि मीटिंग रूम या दोनच बंदिस्त करता येण्याजोग्या खोल्या सेक्शनमधे होत्या. त्या जरा मोठ्या आणि सुशोभित

केलेल्या होत्या. बाकीच्या जागेत साडेचार फूट उंचीच्या पार्टीशन्सनी खोल्यावजा केबिन्स केल्या होत्या. आणि एकेका केबिनमधे चार कोपऱ्यांत चार जणांची टेबलं होती. ऐसपैस मोठं टेबल, त्यावर संगणकाच्या सगळ्या संसारासाठी आणि शिवाय फोनसाठी, लिहिण्यासाठी जागा, टेबलाला सोयीचे ड्रॉवर्स अशी सगळी व्यवस्था होती. जागा भरपूर असल्यामुळे कामाचे कागद, पुस्तकं अशा वस्तू टेबलवरच सोडून जाण्याची सर्वांना सवय होती. आतापर्यंत तरी त्यामुळे कधी काही गहाळ झालं नव्हतं. त्यांच्या ऑफिसची सुरक्षा व्यवस्थाही चांगली होती. असं असताना कागद, पुस्तकं, वर्तमानपत्रं नाहीशी होणं ही म्हटलं तर तशी गंभीर बाब होती.

त्यामुळे ही काय भानगड आहे हे बघायलाच हवं होतं. शिवाय अशा काहीतरी वेगळ्या विषयावर चर्चा करण्यात सगळ्यांना रस होताच. मदानेची मीटिंगची सूचना त्यामुळे सर्वांनी उचलून धरली आणि बोलत बोलत सगळे मीटिंगरूममध्ये गेले. सुहिता तेवढी मागे रेंगाळली. कारण सगळ्यांच्यात तिला मानस तेवढा दिसत नव्हता. तो रागावून आपल्या खोलीत बसला होता की काय ?

ती मानसच्या खोलीत गेली. तिच्या अपेक्षेप्रमाणे तो संगणकासमोर बसून काम करण्यात बुडला होता. ती आत गेली तरी त्यानं वळून सुद्धा पाहिलं नाही. तीच म्हणाली, ''मानस, अरे काय झालं ?''

''तू आहेस होय ? मला वाटलं...'' तिच्याकडे वळत आणि हात थांबवत तो म्हणाला.

''काय, झालं काय ?''

''अगं माझे इथले सगळे कागद नाहीसे झालेत. काल संध्याकाळी इथे ठेवले होते. आणि आज...''

''अरे पण, मीनल कशाला घेईल ते ?''

''नाही गं, ती कशाला घेईल ? मला आपलं आधी वाटलं की ती माझी चेष्टा करते आहे म्हणून. पण तसं नाही हे माझ्या लक्षात आलं आहे. कारण इथलं माझं कोऱ्या कागदांचं पॅडही नाहीसं झालं आहे.''

''पण कोण कशाला घेईल ते पॅड ? आणि एक वेळ कोड चोरला जाऊ शकेल पण जुनी वर्तमानपत्रं चोरून काय उपयोग ?''

''हो ना. आधीच कामाची इतकी घाई आहे आणि त्यात आता हे नवीनच लचांड उपटलं आहे. आणि आज तर सगळे या चर्चेतच गुंतले आहेत. मी सोडून कुणीही कामाला अजून हातही लावलेलं नाही. कसं वेळेत सगळं पुरं होणार आहे....''

मानसच्या स्वरातला वैताग ऐकून त्याला जरा शांत करावं म्हणून सुहिता म्हणाली, ''अरे, होईल सगळं वेळेत. आपण किती वेळा असं तातडीनं काम पूर्ण करून दिलं आहे. आत्ता गमावलेला वेळ रात्र रात्र काम करून भरून काढण्यात आपली टीम अगदी तय्यार आहे....



बरं ते जाऊ दे. मी आल्यापासून अजून चहासुद्धा घेतला नाहीये. आपण चहा घेऊया का ? की तुला कॉफी घ्यायची आहे ? मीटींग रूममधे जमून सगळे याच विषयाची चर्चा करताहेत. आपण तिकडे लौकर गेलो नाही तर बोलावणं येईलच. त्याआधी चहा तरी घेऊया बाई.''

आणि तिनं त्याच्या होकाराची वाट न बघता चहाची ऑर्डर देण्यासाठी बकाबकचं बटन दाबलं.

'बकाबक' हा त्यांच्या ऑफिसचा हरकाम्या यंत्रमानव होता. तो एक यंत्रमानव होता यात विशेष काही नव्हतं. पण तो गवत खाऊन काम करत होता ही गोष्ट मात्र अचंबित करणारी होती.

यंत्र मानवाचा वापर ही काही तशी नवीन गोष्ट नव्हती. कित्येक दशकांपासून यंत्रमानव अस्तित्वात आणि वापरात होता. पण यंत्रमानव निर्माण करण्याचा आणि तो चालवण्याचा खर्च इतका मोठा असायचा की मोठाल्या व्यापारी कंपन्या, काही देशांची संरक्षण खाती यांनाच यंत्रमानव परवडायचा. शिवाय त्याला लागणारी ऊर्जा पुरवण्यासाठी मोठ्या प्रमाणावर वीज लागत असल्यामुळे त्याच्या वापरण्यावर साहजिकच मर्यादा यायची.

पण २००० साली साखरेवर चालणारा, जैविक विद्युतघट असलेला यंत्रमानव निर्माण करण्यात शास्त्रज्ञांना यश आलं आणि त्याच्या विकासाला एकदम गती आली. थोड्याच काळात हलक्या पण टिकाऊ प्लास्टिकपासून यंत्रमानवाचं शरीर बनवण्यास सुरवात झाली. हळू हळू त्या शरीराचा आकार कमी होत गेला आणि दोन वर्षांपासून तर एखाद्या छोट्या कपाटाच्या आकाराचा आणि साखर खाऊन काम करणारा यंत्रमानव चक्क बाजारपेठेत विक्रीला उपलब्ध झाला होता. मानवी आवाजातल्या आज्ञा स्विकारून तो काम करायचा. त्याचा लहान आकार, त्यामुळे बेताची किंमत, विजेची गरज नसणं आणि त्याच्या संरचनेत सतत झालेल्या सुधारणांमुळे अनेकविध कामं करण्याची क्षमता, या गोष्टींमुळे यंत्रमानवांचा खप एकदम वाढला होता.

आणि काही महिन्यांपूर्वी चक्क गवताचा वापर करून ऊर्जा निर्माण करणाऱ्या, माणसाच्या शरीराकृतीशी साम्य असणाऱ्या यंत्रमानवाची निर्मिती करण्यात भारतीय शास्त्रज्ञ यशस्वी झाले होते.

असाच एक यंत्रमानव त्यांच्या कंपनीनं घेतला होता आणि तो व्यवस्थित काम करत असलेला पाहून २-३ महिन्यांपूर्वी प्रत्येक मजल्यासाठी एका यंत्रमानवाची खरेदी करण्यात आली होती. कंपनीच्या आवारात, इमारतीभोवती, अशी सगळीकडे वेगानं वाढणाऱ्या गवताची मुद्दाम लागवड करण्यात आली होती - त्या सगळ्यांना खाद्य पुरवण्यासाठी.

गंमत म्हणजे गवत कापून आणून ऊर्जापेटीतल्या एका ठराविक खणात ते भरून घेण्याचं कामही ते यंत्रमानवच करत असत. फक्त त्यासाठी त्यांच्या मेंदूत योग्य त्या सूचना दिलेल्या असाव्या लागत.

ऑफिसची झाडलोट करणं, फर्निचर पुसणं, खुर्च्या, टीपॉय वगैरे इकडे तिकडे पडलेलं असलं तर ते जागेवर आणून मांडणं, ऑर्डरप्रमाणे चहा, कॉफी, सरबत वगैरे करून पुरवणं, कर्मचारी सांगतील त्याप्रमाणे कागद किंवा इतर वस्तू इकडून तिकडे नेऊन पोचवणं अशी सगळी कामं ते करत. कामात खर्च होणारी ऊर्जा भरून काढण्यासाठी रोज एका ठराविक वेळेला, त्यांच्यासाठी मुद्दाम तयार केलेल्या उतारावरून खाली जाऊन गवत कापून ते ऊर्जापेटी भरून घेत आणि परत आपल्या नेमलेल्या जागी येऊन कामासाठी तयारीत उभे रहात. ऊर्जापेटीच्या एका खणात गवतावर जगणारे आणि वाढणारे जिवाणू ठेवलेले होते. पेटीतील गवत हळूहळू त्या कप्प्यात सरकत राही आणि त्या गवताचा फडशा पाडून ते ऊर्जानिर्मिती करत. ती ऊर्जा पुढच्या कप्प्यात असलेल्या घटांमधे साठवलं जाई आणि मग तिथून ती यंत्रमानवाच्या विविध हालचालींसाठी वापरली जाई.

कधीकधी एखाद्या यंत्रमानवाचं जास्त काम झालं तर लौकरच त्याचं गवत संपायचं. अशा वेळेला गवताचा साठा एका विशिष्ट वजनापेक्षा कमी झाला तर एक सूचक शिट्टी वाजू लागायची. ती ऐकू येऊ लागली की कोणीतरी जाऊन ती बंद करायचं आणि त्याला गवत कापून आणण्याची आज्ञा द्यायचं. अशा वेळी त्याच्याकडे थोडा राखीव साठा असायचा. तो साठा एका ठराविक पातळीपर्यंत कमी होईपर्यंत तो काम करायचा. त्यामुळे त्याच्या हातात सुरू असलेलं काम पुरं व्हायचं आणि मग तो जाऊन गवत कापून भरून घ्यायचा.

सुहिताच्या विभागात असलेला यंत्रमानव त्याच्या या गुणांमुळे सर्वांचा फार लाडका झाला होता. गवत कापून ते आपल्या पेटीत भरून घेण्याचा त्याचा वेग पाहून तो बकाबक गवत खातो असं ठरवून त्यांनी त्याचं नाव 'बकाबक' ठेवलं होतं. बकाबकशिवाय ऑफिसमधल्या कुणाचं पानही हलत नसे. त्याला ऑर्डर देण्यासाठी प्रत्येकाच्या संगणकाच्या जवळ एक खास बटन होतं. ते बटन दाबून त्यासमोर बोललं की बोलणाऱ्याचा आवाज ओळखून त्यानं सांगितलेलं काम बकाबक करत असे. ऑफिसच्या एका कोपऱ्यात बकाबकची खोली होती. खोलीला चार भिंती आणि दाराची चौकट होती. मात्र त्या चौकटीत दार बसवलेलं नव्हतं. त्यामुळे बकाबक मुक्तपणे वावरू शकायचा आणि सांगितलेलं काम झालं की आपल्या खोलीत ठराविक जागी जाऊन उभा रहायचा. पुढच्या आज्ञेची वाट बघत.

सुहितानं बकाबकचं बटन दाबून त्याला दोन चहा आणायला सांगितलं. पण नेहमीप्रमाणे ''यस, मॅडम. दोन चहा घेऊन येतो'' असं उत्तर येण्याऐवजी ''सॉरी मॅडम. आधीची तेरा कॉफीची ऑर्डर पूर्ण करून दोन चहा घेऊन येतो. साधारण अकरा मिनिटं लागतील.'' असं उत्तर बकाबकनं दिलं.

म्हणजे मीटींगरूममधे गेल्या गेल्या सर्वांनी आधी कॉफीची ऑर्डर देण्याचं काम केलं होतं तर !

''मानस, आपणही मीटींगरूममधेच कॉफी घेऊया का ?'' सुहितानं विचारलं.

''ठीक आहे, चल.'' मानसनं म्हटलं. नाहीतरी सगळे जमले होते तिथे जाऊन चर्चा करणं भागच होतं. सेक्शन मॅनेजर म्हणून त्याची ती जबाबदारी होती.

आपल्यासाठी दोन कॉफी मीटींगरूममधे घेऊन येण्याची ऑर्डर बकाबकला देऊन सुहिता आणि मानस तिकडे गेले.

मीटींगरूममधे चर्चा चालली होती असं म्हणण्यापेक्षा गप्पा चालल्या होत्या असं म्हणणंच बरोबर ठरलं असतं. सुहिताबरोबर मानसही तिथे पोचल्यामुळे गप्पांमधे जरा खंड पडला. नाही म्हटलं तरी मानस त्यांचा साहेब होता.

''मीनल, सॉरी. तू माझे कागद घेतलेस असं मला म्हणायचं नव्हतं. मला आपलं वाटलं की तू माझी चेष्टा करते आहेस म्हणून.'' मानसनं गेल्या गेल्या सांगून टाकलं. त्यामुळे वातावरण मोकळं झालं आणि कागद, पुस्तकं, वर्तमानपत्रं या गोष्टी नाहीशा होण्याची चर्चा सुरू झाली. तेवढ्यात बकाबक कॉफी घेऊन आला आणि प्रत्येकाच्या हातात एकेक कप देऊ लागला. त्यानं चौथा कप दिला आणि त्याची सूचक शिट्टी वाजू लागली.

''आँ, ह्याचं गवत एवढ्या लौकर संपलं?'' कोणीतरी उद्गारलं. साधारणपणे दिवसभराचं काम आटोपत आलं की बकाबकला गवत गोळा करण्यासाठी पाठवायची वेळ यायची. त्या मानानं आजची शिट्टी फारच लौकर वाजली होती.

पण या गोष्टीवर फार विचार करत बसण्याचं कारण नव्हतं. शबीर बकाबकच्या जवळ होता. त्यानं बकाबकची शिट्टी बंद केली आणि म्हणाला,

''ऊर्जापेटी भरून घे.''

बकाबक उरलेले कप एकेकाच्या हातात देऊ लागला. सगळे कॉफीचे घोट घेत बोलू लागले. ऑफिसमधले कागद नाहीसे का होऊ लागले होते याचा छडा लावायलाच हवा होता.

एकाएकी मदाने ओरडला, ''ए, काय आहे ? माझा शर्ट कोण ओढतंय ?'' आणि तो गर्रकन् मागे वळला. त्याचं हे असं ओरडणं इतकं अनपेक्षित होतं की सगळे एकदम बोलणं थांबवून त्याच्याकडे बघू लागले.

आणि बघतच राहिले.

कारण मदानेच्या शर्टचा पँटमधे खोचलेला भाग बाहेर निघालेला होता आणि बकाबक तो कापत होता ! गवत कापण्यासाठी असलेल्या कात्रीसारख्या दांड्यामधे पकडून तो सरसर कापड कापत होता.

''ए, अरे ....'' हे, हे काय चाललंय?'' ह्या बकाबकला काय झालं आता ?''

असे विविध उद्गार निघत असतानाच मदाने शर्ट ओढून घेण्याचा प्रयत्न करत होता आणि

बकाबकची कात्री भराभर चालत होती. मदानेनं जोरात ओढल्यावर शर्ट टरटर फाटला आणि मदाने बकाबकच्या तावडीतून सुटला. तशी बकाबकनं त्याच्या शेजारी उभ्या असलेल्या देवधरकडे मोर्चा वळवला. देवधर एकदम मागे झाला. तशी त्याच्या जवळ उभ्या असलेल्या मीनलच्या ओढणीचं टोक पकडून तो कापू लागला. ती किंचाळू लागली आणि एकच गोंधळ उडाला.

दोघातिघांनी मिळून बकाबकला मागे ढकललं. पण तो त्याच्या चाकांवर फिरत परत पुढे येऊ लागला. तशी मानसनं पुढे होऊन त्याचं मुख्य बटन बंद केलं.

पण तरी तो पुढे सरकतच राहिला ! बटन बंद केलं तरी त्याला ऊर्जा मिळायची बंद झाली नव्हती.

क्षणभर सगळे स्तंभित झाले. तेवढ्यात बकाबकनं मीनलची ओढणी ओढून घेऊन ती कापून आपल्या खाद्यपेटीत भरून घेतली होती आणि शेजारच्या सुहिताकडे मोर्चा वळवला होता. त्याचा रोख बघून ती पळून टेबलाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन उभी राहिली आणि विस्फारलेल्या नेत्रांनी त्याच्याकडे पाहू लागली.

प्रसंगावधान राखून मानसनं आणि देवधरनं बकाबकला पाठीमागून गच्च पकडलं. आणि तो इकडे-तिकडे वळून जवळचे कपडे आपल्या कात्रीत पकडण्याचा प्रयत्न करत असतानाच त्याला ढकलत ते मीटिंगरूमबाहेर घेऊन गेले.

पण आता प्रश्न होता त्याला कुठे न्यायचं? कारण त्याला बंद करणं आवश्यक होतं आणि बंदिस्त करता येईल अशी आणखी एकच खोली त्यांच्या ऑफिसमधे होती. मानसचं ऑफिस. थोडं घुटमळून शेवटी त्या दोघांनी त्याला तिथे ढकललं आणि घाईघाईनं दरवाजा लावून घेतला. दरवाजा लावला तरी बकाबकच्या आतल्या हालचालीचे आवाज येत होते.

तो आता आतमधे काय कापत होता ?

एव्हाना बाकी सगळेही त्यांच्या मागोमाग तिथे जमा झाले होते. बकाबक बंदिस्त झालेला बघून सर्वांनी सुटकेचा निःश्वास सोडला आणि मग एकदम सगळे बोलू लागले. तशी मानसनं आवाज चढवला आणि तो मोठ्यानं म्हणाला,

''थांबा, थांबा. एकदम सगळे बोललात तर कोणालाच काही कळणार नाही आणि या प्रॉब्लेममधून मार्ग निघणार नाही. आणि तातडीनं काहीतरी मार्ग तर काढलाच पाहिजे. बकाबकच्या आज्ञावलीत कोणीतरी फेरफार केले आहेत आणि गवताच्या ऐवजी कापड वापरून ऊर्जा निर्माण करण्याची आज्ञा त्याच्या आज्ञावलीत आता नोंदलेली आहे.''

''मला वाटतं, त्याच्यात केलेल्या फेरफारांमधे आधी त्याला कागद खाऊन काम करायची आज्ञा दिलेली असावी. आणि तुझे नाहीसे झालेले प्रिंटाऊट्स, वर्तमानपत्रं, पुस्तकं या गोष्टींही त्यानंच गिळंकृत केल्या असाव्यात.'' सुहितानं विचार करत म्हटलं.

''हो, हो, असंच झालं असावं, नक्की. तो कागद खाऊ लागला आणि मग कापडही खाऊ लागला.'' एकदम उत्तेजित होत मीनल म्हणाली.

''अरेच्या, म्हणजे अगदी बकासुरच झाला की तो. सगळंच स्वाहा करायला लागला.''

''पण, असं होणं कसं शक्य आहे ? बकाबकचा जैविक ऊर्जाघट हा खास गवतावर काम करणारा होता. ऊर्जानिर्मितीसाठी बकाबकमधे असलेले जिवाणू गवतावर जगणारे होते. गवताच्या ऐवजी कागद किंवा कापड त्यात घातलं तर ते कसे काम करतील ?'' मदाने म्हणाला.

''याचा अर्थ सरळ आहे. त्याची ऊर्जापेटी कोणीतरी बदलली आहे.''

''आँ ! अरे पण अशी कशी बदलता येईल त्याची पेटी ? आणि कागदावर किंवा कापडावर काम करणारा घट अजून तरी कोणी बनवलेला नाही.''

''बनवलेला नाही म्हणजे, आपल्यापर्यंत ती बातमी अजून पोचलेली नाही असंही असू शकेल. कारण, कोणत्याही नवीन संशोधनाला प्रसिद्धी मिळण्याच्या कितीतरी आधी ते प्रयोगशाळेत सिद्ध झालेलं असतं. तसंच याच्या बाबतीतही असू शकेल. गवत खाऊन ऊर्जा निर्माण करणाऱ्या जिवाणूंसारखे कागद किंवा कापड खाऊन ऊर्जा निर्माण करणारे जिवाणू वापरण्यात कोणाला तरी यश आलेलं असेल आणि....''

''अरे पण, बकाबक नेमका कापडाच्या दिशेनं वळून जवळच्या माणसाचे कपडे कसे पकडतो ?''

''मला वाटतं या नवीन जिवाणूंना कापडाचा वास येत असावा. त्यामुळे बकाबक त्या दिशेनं निघत असावा. पण हे कोणी केलं असेल....''

''मला माहीत आहे, हे कोणी आणि का केलं आहे ते.'' सुहिता एकदम म्हणाली. तशी सगळे तिच्याकडे आश्चर्यानं बघू लागले.

''माहीत आहे ?'' मानसनं विचारलं.

''हो. नक्की डॉ. पानश्यांचाच हात आहे बकाबकला बकासूर बनवण्यात.''

''पानश्यांचा ? ... हं... असू शकेल. कारण हा बकासूर आपण त्यांच्याकडून घेतला आहे आणि गवतावर चालणारा यंत्रमानव तयार करणाऱ्या संशोधकांच्या मूळ टीममध्ये ते होते असं मी ऐकलेलं आहे. आणि हुषार तर ते आहेतच. पण, ते हे असं कशाला करतील ?'' मानस म्हणाला.

''नाही, म्हणजे मला आपलं वाटतंय की... '' सुहिता जरा घुटमळली तशी मानस म्हणाला,

''अगं, पण कां वाटतंय तुला असं ? एवढा हुषार शास्त्रज्ञ... आणि तो असं काहीतरी करेल ?''

''सांगते. ते हुषार आहेत पण त्याचबरोबर विक्षिप्तही आहेत हे तुम्हा सर्वांनाही माहीत आहे.... अणि शिवाय किती मोठे आहेत ते... पण ... तरीसुद्धा गेल्या तीन-चार महिन्यांपासून

ते माझ्या फार मागे लागले आहेत. मी त्यांच्याबरोबर फिरायला जावं, जेवायला जावं, त्यांचं घर बघायला जावं असा सारखा आग्रह ते करत असतात. कधी प्रत्यक्ष भेटून तर कधी फोनवरून. दोन-तीन वेळा तर त्यांनी माझ्या घरी सुद्धा फोन केला होता. मी जाम वैतागले आहे. परवा त्यांनी मला माझ्या घराबाहेर गाठलं तेव्हां मी स्पष्टच त्यांना सांगितलं की माझं आणि मानसचं लग्न ठरलं आहे. आणि मी त्यांना हेही सांगितलं की हे असं वागणं त्यांच्यासारख्या विद्वान आणि वयस्क माणसाला शोभत नाही म्हणून. आणि यापुढे जर मला त्रास देण्याचा प्रयत्न केला तर मी सरळ पोलिसांत तक्रार करेन असंही मी म्हणाले. तेव्हा ते खूप रागावले आणि अद्वातद्वा काहीतरी बोलले. म्हणाले, - तुम्ही तरुण मंडळी फार माजला आहात. तुम्ही लोक स्वतःला कोण समजता ? माझ्या सारख्याला तू आवडलीस याचा आनंद मानायचा सोडून तू त्या मानस का फानस त्याच्या नादी लागली आहेस. माझ्या जोड्याजवळसुद्धा उभं रहायची लायकी नाही त्याची...''

''स्साला ... दाखवतोच म्हाताऱ्याला...'' मानस असं म्हणाला तशी मीनल म्हणाली, ''अरे म्हातारचळ लागला आहे त्याला. पण तरी तो असं कशाला करेल ?''

''ते पुढे म्हणाले, थांबा, तुम्हां सगळ्यांना चांगली अद्दल घडवतो, मग झकत येशील तू माझे पाय पकडायला....'' सुहितानं बोलणं पुरं केलं.

''अरे, हरामखोरा ! चांगलं जोड्यानं हाणलं पाहिजे बुढ्ढ्याला.'' शबीर म्हणाला.

''हे सगळं खरं. पण बकाबकमधे बदल करून आपल्याला अद्दल कशी घडणार ?'' देवधर म्हणाला.

''बकाबकच्या कापड खाण्याला घाबरून आपण त्याला बंद करून ठेवू, आणि मग त्यांना बोलावणं पाठवू असं त्यांना वाटलं असेल. मग ते यायला लौकर तयार होणार नाहीत, गावालाच निघून जातील किंवा वेळ नाही असं सांगतील. आणि आले तरी कादचित् आणखी काही बिघाड करून ठेवतील. मग आपण त्यांच्या गयावया करू, त्यांच्यावाचून आपलं काम अडतं आहे, कामं धड होत नाहीयेत असं त्यांना सांगू असं वाटलं असेल. बकाबकमुळे आपली जी सोय झालेली आहे ती नाहीशी झाली की आपली कामं मागे पडतील, आपण चिडचिड करू, कामं पुरी न झाल्यामुळे वरिष्ठांची बोलणी आपल्याला खावी लागतील, मी या विभागाचा प्रमुख असल्यामुळे माझं रेकॉर्ड खराब होईल असं काहीतरी त्या मुर्खाला वाटलं असेल कदाचित्. पण त्या चळलागलेल्या म्हाताऱ्याला आपल्या बकाबकचा असा बकासूर करायची संधी तरी कशी मिळाली? गेल्या आठ-दहा दिवसात तर तो इकडे फिरकलेलाही नाही.'' मानस म्हणाला.

''काल आला होता ना तो.'' मीनल असं म्हणाली आणि सगळे आश्चर्यानं तिच्याकडे पाहू लागले. ती पुढे म्हणाली,

''काल मी उशीरापर्यंत बसले होते. तुम्ही सगळे गेल्यानंतर जवळजवळ तासाभरानं पानसे आले. त्यांना बघून मी चकितच झाले आणि वैतागलेही. कारण तोपर्यंत माझं काम पुष्कळ उरकलं होतं आणि मी निघण्याचा विचार करत होते. पण ते आल्यामुळे ते जाईपर्यंत मला थांबणं भाग होतं. मी शेवटून निघणार असल्यामुळे ऑफिस बंद करण्याच्या सूचना बकाबकला देण्याची जबाबदारी माझी होती आणि त्यासाठी आधी पानसे जायला हवे होते. मी वैतागलेले बघून ते म्हणाले, ''तुमचं काम चालू दे. मी आपली सहज चक्कर मारली. आता आलोच आहे तर माझ्या मानसपुत्राला भेटून घेतो''. असं म्हणून हसत ते बकाबकच्या खोलीत गेले. मग माझं आवरेपर्यंत ते तिथेच होते.''

''आणि तेव्हाच त्यांनी त्याचा ऊर्जापेटी आणि आज्ञावली चकती बदलली. शिवाय विद्युत आरेखातली मुख्य बटनाची जागाही बदलली. आता ते बटन नक्की कुठे बसवलं आहे ते शोधावंच लागणार आहे. ते बंद करेपर्यंत तो त्याचं काम, म्हणजे निदान त्याच्या अन्नाचा म्हणजे आता कापडाचा शोध तो करतच राहणार.''

मानसच्या या म्हणण्याला पुष्टी देण्यासाठी म्हणून की काय त्याच्या बंद खोलीतून खुर्ची-टेबल पडल्याचे आवाज आले. खुर्चीच्या सीटला आणि पाठीला असलेलं पॅडिंग आणि कव्हर बकाबक खात होता की काय ?

बकाबकचा बकासूर कोणी आणि का केला होता हे आता उलगडल्यासारखं होतं पण त्यावर उपाय काय करायचा हा प्रश्न होता.

''वुई मस्ट टीच दॅट स्काऊंड्रल अ लेसन, यार.'' मदाने म्हणाला आणि सगळेच त्याच्याशी सहमत झाले. मग सगळ्यांनी मिळून एक ॲक्शन प्लॅन तयार केला.

''हे आपलं ठरलं तर.'' मानस म्हणाला. ''पण हे सगळं प्रत्यक्षात यायला २-३ दिवस, कदाचित आठवडासुद्धा लागेल. तोपर्यंत आपलं काम थांबून चालणार नाहीये. आधीच आज निम्मा दिवस वाया गेला आहे. आता आपल्या दिमतीला यंत्रमानव असणार नाहीये. तेव्हा प्रत्येकानं आपलं बारीकसारीक काम स्वतः करणं आणि आपल्या कामात दिरंगाई न करणं आवश्यक आहे. आपलं काम मागे पडलं नाही की पानश्यांचा हेतू सफल होऊ शकणार नाही.''

''तू काही काळजी करू नकोस. आम्ही मुळीच काम मागे पडू देणार नाही. आणि आता आपल्या दिमतीला यंत्रमानव नाही हे खरं आहे पण आपण इतके मानव आहोत ना कामं करायला. आपले हात काय मोडलेयत का ?'' मीनल ठामपणे म्हणाली.

पण बकाबकचं काय करायचं ?

मानसच्या खोलीच्या काचेच्या खिडकीतून त्यानं आणि दोघा-तिघांनी आत डोकावून पाहिलं तेव्हां त्यांना आतल्या दोन्ही खुर्च्या अस्ताव्यस्त पडलेल्या दिसल्या. त्यांची कव्हर्स, आणि आतला कापूस बकाबकनं फस्त केलेला असावा कारण त्या दोन्ही उघड्या पडलेल्या दिसत होत्या. ते खाऊन बकाबक स्वस्थ उभा होता.

पण त्याच्या जवळ जाणं धोक्याचं होतं कारण त्याला पुरेसं कापड मिळालं होतं की नाही कुणास ठाऊक. त्याच्या पेटीत ठराविक पातळीपर्यंत खाद्य भरलं गेलं नसलं तर तो जवळ येणाऱ्या माणसाच्या अंगावरचा कपडा ओढून खाऊ लागला असता ! त्यामुळे मानसला खोलीत जाता येत नव्हतं.

पण शबीरनं त्याच्यावर एक युक्ती शोधून काढली. त्याच्या कपाटात त्याचा रेनकोट ठेवलेला होता. त्यानं तो घातला, पँट गुडघ्याच्या वरपर्यंत दुमडली आणि मानसच्या खोलीचं दार उघडून तो आत गेला.

काय होतं ते बघायला खिडकीच्या काचेशी गर्दी जमली होती पण बकाबकनं शबीरची दखलही घेतली नाही. कारण कापड खाण्याचीच आज्ञा त्याच्या आज्ञावलीत होती. शबीर बकाबकजवळ गेला. आणि त्यानं त्याच्या मुख्य बटनाची जागा शोधून काढली. त्यानं ते बंद करताच खोलीचं दार उघडून मानस आणि इतर सगळे आत शिरले. आता बकाबक म्हणजे एका मोठ्या निर्जीव बाहुल्यासारखा दिसत होता. कापडापासून ऊर्जा तयार करण्याचं जिवाणूंचं काम चालू होतं पण त्या ऊर्जेचा प्रवाह खंडित झालेला होता.

त्या निर्जीव बाहुल्याला ढकलत त्याच्या खोलीत नेऊन उभं करण्यात आलं. आणि मग हळूहळू प्रत्येकजण आपापल्या जागी जाऊन कामाला लागला. एकदा त्या सर्वांवर नजर फिरवून मानसनं सुस्कारा सोडला. परत एकदा नेहमीप्रमाणे काम सुरू झालं होतं.

चार दिवस गेले. आणि पाचव्या दिवशी कडक सुटातले डॉक्टर पानसे अकरा वाजण्याच्या सुमारास ऑफिसमधे अवतरले. बकाबकविषयी काहीही तक्रार चार दिवसांत न आल्यामुळे अस्वस्थ होऊन ते स्वतः आले होते. सुहिताकडे त्यांनी दुर्लक्ष केलं. आणि सगळीकडे एक चोरटी नजर टाकून त्यांनी मीनलकडे मोर्चा वळवला. जवळ जवळ पूर्ण टक्कल पडलेल्या, जाड भिंगांचा चष्मा लावलेल्या आणि पोक काढलेल्या पन्नाशीच्या पानशांना आपल्या दिशेनं येताना बघून मीनल एकदम सावध झाली. पानसे तिच्या टेबलाशी पोचल्यावर तिनं त्यांचं अगदी गोड हसून स्वागत केलं आणि समोरच्या खुर्चीकडे हात करत म्हटलं, ''बसा ना, सर.''

''काय, कसं काय चाललंय ?'' तिच्यासमोरच्या खुर्चीवर बसत त्यांनी विचारलं.

''मस्त ! खूप काम आहे सध्या. आम्ही सगळे अगदी बुडून गेलो आहोत कामात.''

''आणि आमचा मानसपुत्र काय म्हणतो आहे ?'' तिच्याकडे रोखून बघत त्यांनी पुढे विचारलं. बकाबकनं काय गोंधळ उडवून दिला आहे, त्याचा किती त्रास होतो आहे हे बघायलाच तर ते आले होते.

''तोही मस्त आहे. खरंच सर, इतका बहुपयोगी आणि कार्यक्षम आहे तो की त्याच्यावाचून... सर, तुमची खरंच कमाल आहे हं ! जगातल्या मोठ्या मोठ्या शास्त्रज्ञांना जमलं नाही ते तुम्ही किती सहजपणे .... सर, त्याची नवी करामत बघायची आहे का तुम्हाला ?'' असं म्हणत मीनल उत्साहानं उठली आणि बकाबकच्या खोलीकडे जाऊ लागली. पानसे जरासे गोंधळले. ती नक्की काय करते आहे हे त्यांच्या लक्षात येईना. पण मग स्वाभाविकपणेच ते तिच्यामागे जाऊ लागले.

ते दोघं बकाबकच्या खोलीशी पोचण्यापूर्वीच शबीरनं त्यांना गाठलं आणि म्हणाला, ''मीनल, तुला मानसनं बोलावलं आहे. मी दाखवतो सरांना बकाबकची गंमत.''

काही न बोलता मीनल मागे वळली. पानसे आणि त्यांच्या मागोमाग शबीर बकाबकच्या खोलीत शिरले.

पानसे बकाबकच्या जवळ गेले आणि सहज त्याच्या वेगवेगळ्या भागांवरून हात फिरवू लागले. काही झालं तरी ती त्यांची निर्मिती होती आणि त्यामुळे त्या यंत्राविषयीसुद्धा त्यांना ममत्व वाटत होतं.

शबीर चटकन बकाबकच्या मागे गेला आणि त्यानं त्याचं बटण सुरू केलं.

व्हर्र ऽ ऽ ऽ ऽ ऽ असा आवाज करत बकाबकची चक्रं फिरू लागली आणि त्याच्या कात्रीसारख्या दांड्यांमधे पकडून त्यानं पानश्यांचा कोट कापायला सुरवात केली.

''ए, ए, काय.. हे काय ... सोड, सोड माझा कोट....''

असं काहीतरी ओरडत पानसे मागे जाण्याचा प्रयत्न करू लागले पण बकाबकची पकड पक्की होती. धरलेला कोट तो सोडेना. उलट तो आणखी ओढला आणि कापला जाऊ लागला.

''अरे, अरे, बंद कर ना त्याचं बटण, बघतोस काय ? आणि ... हसतोस काय गाढवा ?'' एकीकडे कोट सोडवण्याचा प्रयत्न करत पानसे शबीरवर ओरडले आणि तेव्हां प्रथम त्यांच्या लक्षात आलं की शबीरनं अंगात प्लास्टिकचे कपडे घातले होते !

शबीर आणखी [illegible]त हसू लागला आणि बकाबकच्या हातातून कोट सोडवण्यासाठी धडपडणाऱ्या पानश्यांच्या कोटाची लक्तरं होऊन लोंबू लागली. बकाबक शर्ट कापतच होता. पानसे धडपडत असतानाच शर्ट आणि टायच्या चिंध्या झाल्या. मग बकाबक त्यांचा गंजीफ्रॉक ओढून कापू लागला.

आता आपल्या कपड्यांची धडगत नाही आणि शबीर आपल्याला मदत करणार नाही हे पानश्यांच्या लक्षात आलं. त्यांनी धडपडत, अंग वेडंवाकडं करत गंजीफ्रॉक काढून बकाबकच्या हातात दिला आणि दाराकडे धाव घेतली.

ऑफिसातला सगळा स्टाफ रेनकोट घालून दारात गर्दी करून उभा होता !

गंमत बघत उभ्या असलेल्या त्या घोळक्याकडे बघून आता आपली सुटका नाही हे त्यांच्या लक्षात आलं आणि ते गयावया करू लागले. ''अरे, मला जाऊ द्या रे. हा राक्षस माझे सगळे कपडे फाडेल आणि मला उघडा पाडेल मी पाया पडतो तुमच्या. जाऊ द्या मला.''

एव्हानं बकाबकनं त्यांचा गंजीफ्रॉक कापून पेटीत भरून घेतला होता आणि तो त्यांच्या पाठीशी येऊन पोचला होता. त्यानं बरोबर त्यांच्या पँटला हात घातला. त्याबरोबर ते ओरडू लागले. ''ए, ए, अरे, असं काय करता ? अरे ऽ ऽ ऽ''

''शबीर, बंद कर त्याला.'' मानस म्हणाला. तशी शबीरनं बकाबकचं बटण खट्कन बंद केलं आणि पानश्यांची पँट कात्रीत धरल्या स्थितीत बकाबक गप्प उभा राहिला.

''सर, कसं वाटतंय आपल्या मानसपुत्राचं कर्तृत्त्व बघून ? अगदी तुमच्या आज्ञेबरहुकूम काम करतो आहे की नाही तो?''

''माझ्या आज्ञे... काहीतरी बोलू नकोस.. मी कशाला....'' वटारलेल्या डोळ्यांनी मानसकडे बघत पानसे उद्गारले.

''तुम्ही नाही तर कोणी ? तुमच्याशिवाय दुसरं कोण करू शकणार आहे हे काम ? बकाबकच्या ऊर्जापेटीत आणि आज्ञावलीत फेरफार करण्याइतकी हुषारी तुमच्याजवळच आहे आणि संधीही तुम्हालाच होती. तुम्ही नाकारून काही उपयोग नाही, डॉक्टर. चट्कन कबूल करणंच तुमच्या हिताचं आहे. नाहीतर...''

''नाहीतर... नाहीतर काय ? कशावरून मी हे केलं आहे ? काय पुरावा आहे तुमच्याजवळ ?'' पानसे त्याही स्थितीत गुरकावले.

''पुरावा ? पुराव्याची गरज आहे असं मला वाटत नाही. कारण पुरावा नसला तरी तुमची पँट आहे ना... बकाबकच्या हातात.'' असं म्हणून मानस आणि त्याचे सगळे सहकारी खिः खिः करून हसू लागले. पानसे रागानं आणि शरमेनं लालबुंद झाले. मानस पुढे म्हणाला,

''पोलिसात तुमच्याविरुद्ध तक्रार करता येईल आम्हाला. आमच्या परवानगीशिवाय आमच्या यंत्रमानवात फेरफार करणं हा गुन्हा आहे आणि पोलिस बरोबर पुरावा गोळा करतील. पण या सगळ्या भानगडीत आम्हाला वेळ वाया घालवायचा नाहीये. तेव्हां तुम्ही मुकाट्यानं आपला अपराध.. पाहिजे तर आपण त्याला चूक म्हणू. तर आपली चूक कबूल करावीत. चूक कबूल करून प्रायश्चित्त घेणं हे तुमच्याच हिताचं आहे.''

''माझी चूक ? काहीतरी आरोप करू नका माझ्यावर.''

''डॉक्टर पानसे, तुमच्या या गुन्ह्याला सगळीकडे भरपूर प्रसिद्धी मिळेल आणि माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात राहणं तुम्हाला अशक्य होईल अशी व्यवस्था मी करू शकतो. शिवाय बकाबक आहेच. शबीर सोड बकाबकला...''

''नाही. नाही... नको. मला कबूल आहे तू काय म्हणतोस ते.'' पानसे घाईघाईनं म्हणाले., तशी सुहितानं तिच्या हातातले कागद मानसकडे दिले. ते त्यानं पानश्यांच्या समोर धरले आणि म्हणाला,

''ठीक आहे. याच्यावर सही करा.''

''हे ... हे काय आहे ?''

''तुमचा कबुलीजबाब आणि चुकीचं परिमार्जन. बकाबकचे तुम्ही काढून टाकलेले भाग तुम्ही दोन तासांत परत बसवून देणार आहात, परत कधीही असला खेळ आमच्या कुठल्याही यंत्रणेशी करणार नाही आहात आणि येती पाच वर्षं आमच्या ऑफिसातल्या तुम्ही दिलेल्या सगळ्या यंत्रमानवांचं फुकट सर्व्हिसिंग करणार आहात, असं लिहिलेलं आहे यात.''

हतबुद्ध होऊन पानसे काही क्षण तसेच उभे राहिले. मग म्हणाले, ''पण, पण असा पाच वर्षांचा करार... आमच्या कंपनीच्या व्यवस्थापक मंडळाची संमती लागते अशा कराराला. आणि इतक्या दीर्घ मुदतीचा करार म्हणजे लक्षावधी रुपयांचा प्रश्न आहे. आमचं मंडळ मान्य करणार नाही हा करार.''

''तुम्हाला त्यांचं मन वळवावं लागेल आणि तरी त्यांनी नाहीच मान्य केलं तर तुमच्या खिशातून भरावे लागतील ते पैसे. नाही का?'' आणि मानस हसू लागला.

आपण पुरते कात्रीत सापडलो आहे हे पानश्यांच्या लक्षांत आलं. दात ओठ खात त्यांनी कागद हिसकावून घेतले. मानसनं तत्परतेनं आपलं पेन आणि सुहितानं कागदाखाली धरायला एक पुस्तक पुढे केलं. पानश्यांनी रागारागानं आपली सही खरडली तही शबीरनं त्यांना बकाबकच्या तावडीतून मोकळं केलं.

तरी पानसे जाण्यासाठी हालचाल करेनात. तेव्हा हसत, हसत देवधरनं आपल्या अंगावरचा रेनकोट काढून त्यांना दिला. ते तो घालत असताना शबीर म्हणाला, ''पँटही दुमडा डॉक्टर., बकाबकनं परत तुम्हांला धरलं म्हणजे ?'' आणि परत एकदा सगळे मोठ्यानं हसले.

लाजेनं आणि रागानं अर्धमेले झालेले पानसे दाराशी जमलेल्या त्या सगळ्या तरुणांमधून वाट काढत बाहेर पडले तेव्हा ''शेम, शेम'' असं ओरडत सगळ्यांनी त्यांचा दारापर्यंत पाठलाग केला.

पानसे गेले. थोडा वेळ त्यांच्याविषयी आपापसात गप्पा झाल्यावर मानस म्हणाला, ''मंडळी, आता वेळ फुकट घालवणं बास. आपलं काम बरंच मागे पडलं आहे. कामाला लागू या आता.'' एवढं बोलून तो त्याच्या खोलीकडे वळला. तही मग जरा अनिच्छेनेच जो तो आपल्या जागेकडे जाऊ लागला. करमणुकीचा कार्यक्रम समाप्त झाला होता. पण पुढे कितीतरी दिवस पानश्यांच्या आठवणीनं त्या सर्वांची करमणूक होत राहणार होती !

◆ ◆ ◆

# ॲमॉस लघुग्रहावरचा नियंत्रक

❒ प्रा. प्रभाकर सोवनी

***आपलं यान नियोजित मार्गावरून नक्कीच ढळत आहे याची त्यांना कल्पना आली. आधीच्या दोन यानांसारखंच आपलंही यान नाहीसं होणार का ?***

''मार्गात बदल, 270 अंश, डावे रिट्रोरॉकेट दोन सेकंद ज्वलन.''

'कुबेर-10' यानाच्या नियंत्रण कक्षात बसलेले तिघेहीजण चकित होऊन एकमेकांकडे पाहू लागले. कुबेर-10 या गस्त घालणाऱ्या अवकाश यानात स्वयंचालन करण्यासाठी तोंडी हुकुमाने आज्ञा दिली तरी ती पाहून वाहनाचे सारथ्य आणि नियंत्रण करेल अशा तऱ्हेचा संगणकयुक्त 'ऑटो पायलट' बसवलेला होता. त्याला 'रमण कप्तान' हे नाव होते. तोंडी दिलेली आज्ञा पुन्हा उच्चारावयाची व त्या बरहुकूम योग्य ती कृती करायची ही रमण कप्तानाची पद्धत होती. पण आताची आज्ञा या तिघांपैकी कुणीही दिलेली नव्हती.

'रमण ! तुला मार्ग बदल करायला कुणी सांगितलं ?'' पार्थने आश्चर्याने समोरच्या गुंतागुंतीच्या उपकरणाकडे पाहून प्रश्न केला.

''आज्ञा मिळाली, त्यानुसार आज्ञा पालन केले !'' रमण कप्तानाच्या पोटातून पुन्हा एक ठराविक सुरातले शब्द यांत्रिक आवाजात उमटले.

''काय रे पार्था ? तुझ्या आवाजाशिवाय दुसऱ्या कुणाच्याही आवाजातली आज्ञा पाळायची नाही, अशी व्यवस्था या रमण कप्तानाच्या बाबतीत आपण केली आहे ना? मग हा रमण कुणाची आज्ञा सध्या पाळत आहे?'' पार्थाचा सहकारी सुधन्व याने प्रश्न केला.

'मलाही तेच कोडं पडलंय !'' पार्थ चिंताक्रांत स्वरात म्हणाला,

''मार्ग दुरुस्ती - 305 अंश'' पुन्हा रमणच्या पोटातून यांत्रिक शब्द उमटले.

''पार्थ ! काहीतरी मोठाच घोटाळा दिसतोय !'' जयदीप काळजीच्या सुरात म्हणाला. ''आपली आधीची दोन गस्त याने बेपत्ता झाली आहेत, त्याचा आणि या विचित्र प्रकाराचा काहीतरी संबंध नक्की असणार !'' जयदीपच्या चेहऱ्यावर भीतीची छाया उमटली होती.

''मलाही तसंच वाटतंय. पण पाहू या ! नाहीतरी आपण त्याचाच शोध घ्यायला चाललो आहोत. डोकं शांत ठेवून काय काय होतंय ते पाहू या !''

''मार्गबदल 200 अंश, वेग निम्म्यावर!'' पुन्हा रमणच्या पोटातून शब्द उमटले. आता तिघेहीजण समोरच्या निरीक्षण पडद्याकडे उत्कंठेने पहात होते. पडद्यावर दूरवर एक लघुग्रह दिसत होता. कुबेर-10 हे यान सरळ त्या लघुग्रहाच्याच दिशेने चालले होते.

''मला वाटतं, या लघुग्रहावरच आपल्या कोड्याचं उत्तर मिळणार असं दिसतंय !'' सुधन्व म्हणाला.

लघुग्रह आता झपाट्याने जवळ येत होता. पडद्यावर त्याचे स्वरूप अधिकाधिक स्पष्ट होत होते. आजवर पाहिलेल्या लघुग्रहांपेक्षा हा लघुग्रह काही वेगळाच दिसत होता. आकाराने सुमारे 20-25 किलोमीटर व्यासाचा असावा. पण त्याच्या पृष्ठभागावर जागोजागी अनेक यांत्रिकी रचना केल्याचे दिसत होते.

'यानाचा वेग एक दशांश. सर्व रिट्रो रॉकेटस् सुरू. यान स्थानकाला अडकवण्याची तयारी.' रमण कप्तानाच्या पोटातून त्याला मिळणाऱ्या आज्ञांचा भराभर पुनरुच्चार होत होता. यानांतले तिघेही जण काय काय होत आहे हे चिंतायुक्त उत्कंठेने पहात होते.

पडद्यावर आता चकचकीत धातूच्या खांबावर आधारलेले भले मोठे अवकाश स्थानक दिसत होते. स्थानकाच्या एका रुंद पन्हळीसारख्या लांबट, खोलगट भागात कुबेर-10 हे यान अलगद जाऊन थांबले. यानाचे इंजिन बंद झाले. तेवढ्यात पन्हळीच्या दोन्ही बाजूंना असणाऱ्या खांबातून धातूच्या अनेक पट्ट्या बाहेर पडल्या आणि त्यांनी यान पक्के जखडले गेले.

'हे स्थानक कसले ! हा तर पिंजराच दिसतोय !'' सुधन्व चिंतेच्या स्वरात म्हणाला. तेवढ्यात कोणीतरी यान हळूहळू ओढत कुठेतरी नेत आहे असा भास झाला. काही क्षण निरीक्षण पडद्यावर संपूर्ण अंधार झाला. पाठोपाठ एकदम पडदा शुभ्र प्रकाशाने झगमगून उठला.

''तुम्ही- सर्वांनी -- कृपा -- करून ---- यानाचे -- बाहेर --- यावे !'' मानवी आवाजाची नक्कल करीत यांत्रिक आवाजात थांबून थांबून एक एक करीत उच्चारलेले शब्द तिघांच्याही कानी पडले. ''काय करावे !'' अशा विचारात चुळबूळ करीत तिघांनीही आपली शिरस्त्राणे आणि अवकाश पोषाख चढवण्यास सुरवात केली.

''अवकाश पोषाखाची -- गरज -- नाही. या बंदिस्त जागेत .. तुम्हाला.. योग्य अशी हवा आहे ! कृपा करून बाहेर या ! आत राहाल तर मात्र जीव गमावाल !'' पुन्हा यांत्रिक आवाजातले शब्द उमटले.

पार्थने मनाशी निश्चय करून यानाच्या दाराचा खटका काढला आणि दार उघडून बाहेर पाय ठेवला. पाठोपाठ सुधन्व आणि जयदीप हे दोघेही दाराबाहेर पडले. बाहेर पडताच तिघांनाही आश्चर्याचा झटका बसला. या लघुग्रहावर गुरुत्वाकर्षणाचा प्रभाव जवळजवळ शून्य असल्याने तिघेही जण यानाच्या बाहेर हवेत तरंगत होते. [illegible] यानाबाहेर [illegible] असावी अशीच शीतल आल्हाददायक प्राणवायुयुक्त हवा होती.

कुबेर-10 हे यान एका प्रशस्त दालनात आणले गेले होते. दालनात भरपूर प्रकाश होता. सर्वत्र हवा खेळवली होती. दालनाच्या मध्याशी एका उंच मंचावर यान स्थिरावले होते. दोन्ही बाजूच्या भिंतीतून धातूच्या आडव्या शलाका निघाल्या होत्या. त्यांनी यान पक्के जखडून ठेवले होते. यानांतून बाहेर पडलेले तिघेही प्रवासी यानाभोवती तरंगत अधांतरी होते. तेवढ्यात समोरच्या बाजूने मंदसा वाऱ्याचा झोत सुरू झाला. त्यामुळे तिघेही जण यानापासून दूर ढकलले जाऊन पाठीमागच्या भिंतीपर्यंत गेले. तिथे भिंतीला जागोजागी कड्यांना अडकवलेल्या साखळ्या होत्या. त्या साखळ्या पकडून तिघेहीजण भिंतीशी उभे राहिले. त्याच क्षणी दोन्ही बाजूच्या भिंतीत असणारी असंख्य छोटी कवाडे उघडली आणि त्यातून लांब दोरीसारख्या धातूच्या केबल्स वळवळत बाहेर आल्या. प्रत्येक केबलच्या टोकाशी मायक्रोफोनसारखे दिसणारे एक छोटे यंत्र जोडलेले होते. या साऱ्या केबल्सनी यानाभोवती विळखे घातले आणि केबलच्या टोकाची यंत्रे यानाच्या पृष्ठभागावरून फिरू लागली. त्यांनी यानाचा इंच नी इंच तपासून पाहिला. नंतर जादू व्हावी तशा सर्व केबल्स पुन्हा वळवळत आपापल्या बिळात जाऊन अदृश्य झाल्या.

पार्थ, सुधन्व आणि जयदीप हे तिघेहीजण हे सारे दुरून विस्मयचकित दृष्टीने पहात होते. तेवढ्यात बाजूच्या भिंतीतले आणखी एक दार उघडले. त्यातून दोन केबल्स बाहेर आल्या. एका केबलच्या टोकाशी एक पांढरे शुभ्र चमकदार अग्र होते. यानाच्या पुढच्या बाजूच्या पृष्ठभागावर ही केबल टेकली आणि खडूने फळ्यावर रेघा काढाव्यात तसा यानाच्या पृष्ठभागावर एक मोठा चौकोन त्या पांढऱ्या अग्राने रेखाटला. केबलचे टोक पुन्हा त्या चौकोनाच्या रेषेवरून फिरू लागले आणि रेषेवरचा धातूचा तेवढा भाग वितळून तिथे भेग निर्माण होऊ लागली. चौकोन पूर्ण कापून होताच दुसऱ्या केबलचे शोषण अग्र त्या पत्र्यावर टेकले आणि चौकोनी आकाराचा तेवढा पत्रा अलगद उचलून बाजूला करण्यात आला.

''अरे पार्था ! आपल्या यानाचे कवच काढून आतल्या इंजिनाचा हे लोक फडशा पाडणार !'' सुधन्व तीव्र स्वरात ओरडला.

''त्याला .. काही... इलाज ... नाही.'' पुन्हा धात्विक आवाजात थांबून थांबून शब्द येऊ लागले.'' यानाचा ... नाश... थांबवण्यासाठी तुमचा .. इंधनाचा.. प्रकार .. सांगा !''

''काही एक ऐकणार नाही मी तुमचं !'' पार्थ त्वेषाने ओरडला -

''आधी तुम्ही कोण, मी कुणाशी बोलतोय, हे मला कळलं पाहिजे !''

''सांगतो... सारं... सांगतो !'' पुन्हा धात्विक आवाजात शब्द उमटू लागले.'' मी या ॲमॉस ग्रहावरचा सर्वाधिकारी विद्युत् आण्विकी नियंत्रक आहे. या छोट्या लघुग्रहावरच्या सर्व निवासी नागरिकांची सुरक्षा, देखभाल, व्यवस्था राखण्याचे काम माझ्याकडे आहे.'' सावकाशीने थांबत थांबत उत्तर आले.



''ठीक आहे, तुमची व्यवस्था तुम्ही पहा, पण मग आमची वाट चुकवून आमचं यान इकडे पळवून कशासाठी आणलं आहे ?'' पुन्हा ओरडून पार्थाने समोरच्या अदृश्य यांत्रिक नियंत्रकाला विचारले.

''समजेल, सारे समजेल.'' समोरून आवाज आला. त्या बरोबरच एक मोठा वाऱ्याचा झोत आला. त्याचवेळी या तिघांनी साखळ्या धरलेला भिंतीचा भाग बाहेरच्या बाजूला उघडला जाऊन तिघेही जण वावटळीत सापडलेल्या पानांप्रमाणे वाऱ्याच्या झोताबरोबर एका लांबच लांब बोगद्यातून वहावत गेले. थोड्याच वेळात वाऱ्याचा वेग मंदावत जाऊन तिघेही जण हलकेच जमिनीवर टेकले. आता ते एखाद्या प्रचंड विस्ताराच्या इनडोअर फुटबॉल स्टेडियम सारख्या मैदानी दालनाच्या उंचावरच्या प्रेक्षासज्जात उभे होते. खाली दालनाच्या भूमीवर फळाफुलांनी लगडलेल्या, पण जेमतेम एक दीड मीटर उंचीच्या झाडांची बाग आणि मळे होते. त्या बागेत जेमतेम अर्धा-पाऊण मीटर उंचीचे माणसासारखे द्विपाद प्राणी विहार करीत होते. या प्राण्यांचे हातपाय काटकुळे होते. पण डोके आणि डोळे मात्र खूप मोठे, गोल गरगरीत होते. त्यातले कुणी फळे तोडून खात होते, कुणी नुसताच पाठशिवणीसारखा पळापळीचा खेळ खेळत होते.

''हे या ग्रहावरचे नागरिक. मुळात हे सारे लोक एका फार दूरच्या ग्रहावरून आले आहेत. त्या ग्रहावर एक खूप मोठा धूमकेतू आदळून संपूर्ण ग्रहाचा पूर्ण नाश झाला. पण त्या संकटाची पूर्वसूचना त्यांना बरीच वर्षे अगोदर आली होती. ग्रहावर धूमकेतू आदळण्यापूर्वीच हे सर्व लोक निसटून येथे आले. येताना त्यांनी आपल्या बरोबर सर्व यंत्रसामुग्रीही आणली होती. त्यातच माझाही समावेश आहे !'' एक एक शब्द सावकाश उच्चारत यांत्रिक नियंत्रक सांगत होता. ''आता आम्ही तुमची याने पकडून इकडे का आणतो हे सांगतो.'' आवाज पुन्हा बोलू लागला.

''या लघुग्रहावर सर्व सामग्री आहे. पण मुख्य अडचण शक्ती पुरवठ्याची आहे. त्यासाठी आम्हाला द्रव हायड्रोजन लागतो. आम्ही बरोबर आणलेला हायड्रोजन पुरवून पुरवून वापरला तरी त्याचा साठा झपाट्याने कमी होत आहे. म्हणून आम्ही आमच्या कक्षेत येणाऱ्या वाहनांना पकडून त्यातील द्रव हायड्रोजन काढून घेतो.''

''छी ! छी ! तुमच्यासारख्या इतक्या प्रगत झालेल्या नियंत्रकाला हे मुळीच शोभण्यासारखं नाही !'' पार्थ म्हणाला, ''आणि आमच्या यानाचा तर तुम्हाला काहीच उपयोग नाही. आमच्या यानात आम्ही प्लाझ्मा इंधन वापरत आहोत !'' पार्थ पुढे म्हणाला.

''आणि अशी इतरांची याने पकडून तुमचे किती दिवस काम भागेल ? बाहेरच्या सर्व ग्रहांना याचा पत्ता लवकरच लागेल, मग तुमची अखेरची घटका भरलीच म्हणून समजा !'' सुधन्वाने धमकीच्या स्वरात सुनावले.

''या लघुग्रहाची अखेर अटळ आहे. मी फक्त ती घटका लांबवण्याचा प्रयत्न करीत आहे!'' यांत्रिक आवाजात उत्तर आले.

''त्यापेक्षा तुम्ही इतर ग्रहांशी देवघेवीचा करार का करीत नाही ? आम्ही सुद्धा तुम्हाला अल्प मोबदल्यात द्रव हायड्रोजन हवा तितका पुरवू !'' जयदीपने सुचवले.

''या लघुग्रहावरून इतरांना देण्यासारखे आमच्याकडे काहीही नाही. आमचे रोजचे व्यवहार सुरळीत चालण्यासाठी इथली प्रत्येक गोष्ट आम्हाला आवश्यक आहे.'' यांत्रिक आवाज उत्तरला.

''पार्था, आपण ही प्रश्नोत्तरे करून काय मिळवणार आहोत ?'' काहीतरी सुटकेचा विचार केला पाहिजे !'' सुधन्व चिंतेच्या स्वरांत म्हणाला, ''तिकडे आपल्या यानाच्या त्यांनी पार चिंध्या करून टाकल्या असतील !''

''तुमचे यान सुरक्षित आहे. तुमच्या जवळ द्रव हायड्रोजन नाही. त्यामुळे तुमच्या यानाचा आम्हाला काही उपयोग नाही.'' पुन्हा यांत्रिक आवाज बोलू लागला. ''मात्र तुमचे तिघांचेही आयुष्य संपुष्टात आले आहे. तुम्हाला आता आण्विक विच्छेदन केंद्रात नेऊन तुमच्या शरीराचे सर्व मूलघटक वेगळे करण्यात येतील. आम्हाला त्या घटकांचा वापर करून घेता येईल !''

तिघेही जण या वाणीने हादरलेच. काही बोलायच्या आतच पुन्हा वाऱ्याचा तीव्र झोत सुरू झाला. झोताबरोबर ते उचलले जाऊन वहावत जाऊ लागले. आता ते एका बोगद्यातून जात होते. बोगद्याच्या भिंती आणि छत खडबडीत होते. बहुधा लघुग्रहाच्या मूळच्या खडकात हा बोगदा कोरून काढलेला असावा. पृष्ठभागावर गिलावा वगैरे केलेला नव्हता. पार्थाने अखेरचा प्रयत्न म्हणून बोगद्याच्या भिंतीत पुढे आलेले खडकाचे टोक घट्ट पकडून स्थिर राहाण्याचा प्रयत्न केला. पण टोक पकडताच ठिसूळ भाग तुटून त्याच्या हातात आला. हातातल्या खडकाकडे त्याने पाहिले. तो त्या खडकाचा भाग सप्तरंगी वर्णछटांनी चमचमत होता.

''अरे सुधन्व ! काय आश्चर्य ! हा सारा खडक सौरेनियम खनिजाचा बनलेला दिसतोय. आपल्या प्लाझ्मा इंजिनासाठी लागणाऱ्या इंधनाचा हवा तेवढा पुरवठा या खनिजातून होऊ शकेल ! पृथ्वीवर हे खनिज किती दुर्मिळ आहे !'' पार्थ उत्तेजित स्वरात ओरडला.

''अरे मग त्या नियंत्रकाला सांग ना हे ! आपलं विच्छेदन होण्याच्या आत सांग. आपण या खनिजाच्या मोबदल्यात त्यांना हवा तेवढा द्रव हायड्रोजन पुरवू शकू !'' सुधन्व ओरडला. बोगद्याच्या दुसऱ्या टोकाकडून येणाऱ्या गरम झळा आता तिघांनाही जाणवत होत्या. काही क्षणांतच तिघांचीही शरीरे अणुभट्टीत विलीन झाली असती.

तेवढ्यात खाडकन् आवाज होऊन बोगद्यात तारांची जाळी टाकली गेली. वाऱ्याचा वेग मंदावला. तिघेही जण जाळीवर आपटले. पण जाळीच्या तारा रबरासारख्या मऊ पण चिवट असल्याने कुणाला काही इजा झाली नाही.

बोगद्यात आता विचित्र हालचाल सुरू झाली होती. लांब तारांची शेपटे असणारी मधमाशी सारखी दिसणारी अनेक छोटी छोटी यंत्रे सर्वत्र फिरून खडकांची तपासणी करीत होती. दीन-तीन मिनिटात या साऱ्या माशा अदृश्य झाल्या.

''ठीक आहे !'' पुन्हा यांत्रिक आवाजात शब्द ऐकू येऊ लागले, ''पृथ्वीवासी मानवांनो, तुमच्या या शोधाबद्दल आभार ! आमच्याकडे प्लाझ्मा इंजिन नाही. आम्हाला या खनिजाचा उपयोग नाही. सध्या तुम्ही स्वतःबरोबर हे नवे खनिज शंभर किलो घेऊन जा, त्याच्या बदली आम्हाला शंभर किलो द्रव हायड्रोजन द्या. आमचे यांत्रिक यान यासाठी तुमच्या बरोबर येईल. कबूल आहे काय ?''

''कबूल ! एकदम कबूल !'' तिघेही जण एकदम ओरडले. कुबेर-10 यानात पुन्हा तिघेहीजण परत येताच पार्थाने ''रमण कप्तानाला बजावले ''आता परतीच्या प्रवासात माझ्याशिवाय दुसऱ्या कुणाच्याही आज्ञा पाळायच्या नाहीत, समजले ना !''

''समजले. दुसऱ्या कुणाच्याही आज्ञा पाळायच्या नाहीत. तुमच्या आज्ञाशिवाय.'' रमणने पुनरुच्चार केला. ''मात्र लघुग्रहाच्या प्रभाव कक्षेबाहेर पडल्यानंतर. रमणने पुस्ती जोडली. ''कक्षेबाहेर पडेपर्यंतच्या सर्व आज्ञा आधीच मिळाल्या आहेत.'' रमण कप्तान पुढे म्हणाला.

''चला ! एका मोठ्या प्राणसंकटातून बचावलो !'' जयदीप खुर्चीत आरामात पाय पसरून बसत म्हणाला.

''आणि एक नवा लघुग्रह मित्रही मिळाला. त्याचबरोबर आपल्या प्लाझ्मा इंजिनासाठी खनिजाचा अपार साठाही !'' पार्थ उत्तरला.

कुबेर-10 यान शंभर किलो सौरेनियमची पेटी घेऊन वेगाने पृथ्वीकडे वाटचाल करीत होते. पाठोपाठ गाईमागून वासराने धावावे तसे लघुग्रहाचे छोटे यांत्रिक यानही येत होते !

◆ ◆ ◆

# दक्षता

❑ रेखा बैजल

***ती वस्तु एक चलचित्र फीत होती. त्या परग्रहवासीयांनी ती मोठ्या कष्टानं तयार केली होती. काय असेल त्या चित्रफितीत? सर्वांच्या नजरा पडद्यावर खिळून राहिल्या !***

ऑब्झर्वेटरीच्या मोठ्या स्क्रीनवर काळंभोर आकाश दिसत होतं. संपूर्ण प्रयोगशाळाच एक गोलाकार स्क्रीन होती. वेगवेगळ्या दुर्बिणी आपापल्या कक्षात येणाऱ्या आभाळाचं प्रतिरूप त्या भिंतीवर साकारत होत्या. सर्व यंत्रणा सज्ज होती. प्रयोगशाळेबाहेर दिवस किंवा रात्र असली तरी आतल्या शास्त्रज्ञांपुढे मात्र नेहमीच काळंशार आभाळ आणि कोट्यावधी मैल दूर पसरलेलं अंतरिक्ष आणि त्यातले तारे दिसत होते. हे नेहमीचंच दृश्य होतं. पण ह्या काही दिवसात मात्र संशोधकांना उत्सुकता लागली होती. अनेक प्रयोग करून नव्या दुर्बिणी प्रयोगशाळेत आता वापरात आणल्या गेल्या होत्या. ह्या दुर्बिणींची क्षमता आधीच्या दुर्बिणीपेक्षा कित्येक पटींनी अधिक होती. त्या दुर्बिणीतून जवळ असलेल्या ताऱ्यांच्या भोवती फिरणारे त्यांचे ग्रह अस्पष्टपणे का होईना दिसत होते. त्या ताऱ्याचा फिरण्याचा वेग, त्यावर होणारी वादळं, त्या वादळांवरून किती वस्तुमानाचे ग्रह त्यांच्या भोवती असावेत ह्याचा अंदाज काढता येत होता. शास्त्रज्ञ दुर्बिणीतून सृष्टीचा प्रवास करत होते. विश्वाच्या अनंताची अनुभूती घेत होते.

आता हे निरीक्षण रोजचेच झाले होते. कोणता तारा मृत होतो आहे, कोणता तारा जन्म घेणार आहे ह्याच्या अटकळी चालल्या होत्या. त्याहूनही सर्वांनाच उत्सुकता होती ती कुठे जीवसृष्टी आहे का ह्याची. कोठून तरी कोणता संदेश मिळतो का ह्याची. अनेक उपग्रह त्यासाठी कार्यरत होते. पृथ्वीच्या वातावरणाबाहेर जाऊन कोणत्या ना कोणत्या संदेश वाहकाद्वारे जीवसृष्टीचा कानोसा घेता येतो का ते पाहात होते.

ह्या जीवसृष्टीचे स्वरूप कसे असेल ? तिथले वायूमंडल कसे असेल, तिथल्या जीवनाचे आवश्यक स्त्रोत कसे असतील ही सर्वच उत्सुकता शास्त्रज्ञांना लागली होती.

मंगळावर पाण्याच्या अस्तित्वाचे पुरावे सापडल्यापासून आशा पल्लवित झाल्या होता. कुठे ना कुठे जिवाचे अस्तित्व असणारच. पृथ्वीवर जीवसृष्टी असण्याचा जो सुखद अपघात आहे तो आणखीही कुठे तरी अस्तित्वात असेलच.

दास प्रयोगशाळेत आले. त्यांनी आपल्या दुर्बिणीचा ताबा घेतला.

''काय शारंगपाणी, सापडतोय का कुणी जिवंत प्राणी ? आपलं काम तर क्राईम ब्रँच पेक्षाही बिकट झालंय. जे क्राईम करतात ते अस्तित्वात असतात आणि म्हणूनच पोलीस त्यांचा शोध घेऊ शकतात. पण आपण ज्यांचा शोध घेतोय त्यांनी ह्या विश्वात जन्म घेण्याचा गुन्हा केलाच असेल की नाही कुणास ठाऊक.''

''म्हणजे आपण जन्म घेतला तो काय गुन्हा आहे ?''

''अरे, नाही यार ! तसं नाही. इटस अवर प्रिव्हिलेज. ह्या अंतरिक्षाचा दुर्बिणीतून ठाव घेताना वाटतं की खरंच आपण केवढे भाग्यवान आहोत की जग आपल्याला पाहायला मिळालं. खरंच शारंगपाणी, केवढं गूढ आहे ह्या जगाचं अस्तित्व. कुठला तो ध्वनीस्फोटाचा सिद्धांत ... कदाचित तो खरा असला तर त्यातून विश्वाचा जन्म झाला. कोट्यावधी वर्षांपासून हे विश्व शांत अबोध पण अस्तित्वात आहे. त्याच्या अस्तित्वात असण्याला तरी काही प्रयोजन आहे का? ह्या अंतरिक्षाच्या काळोख्या तेजात एवढे तारे... आता हळू हळू भाषाही बदलायला लागली बघ. ह्या अंतरिक्षाचा काळोख केवढा अर्थवाही आहे. किती तरी ताऱ्यांचं तेज त्यात येऊन सरमिसळतं पण ते केवळ आपल्याला दिसत नाही म्हणून आपण त्याला काळोख म्हणायचं. पण ह्या 'काळोखाचा' अर्थ निश्चितच वेगळा आहे. हा असाच काळोख आईच्या गर्भात असेल नाही !...''

''माय गॉड दास ! तुम्ही तर हळू हळू सायंटिस्ट ऐवजी फिलॉसाफर होता आहात.''

''अरे ह्या दुर्बिणीद्वारे सृष्टीची अंतरिक्षसफर झाली की आपण फिलॉसफरच होतो. सगळ्या योगायोगांवर अपघातांवर विश्वास बसू लागतो. विज्ञान सांगतं योगायोग, अपघात, ह्यावर विश्वास ठेऊ नका. पण विश्वाचा शोध घ्यायला लागलं की त्यावर विश्वास बसतो.''

''तो कसा ?''

''केवळ अपघात म्हणून आपल्या पृथ्वीचं सूर्यापासून विशिष्ट अंतर आहे हे तर मान्य, की ह्या मागे काही प्रयोजन आहे?''

''मान्य आहे दास...'' शारंगपाणी.

''म्हणून ह्या विशिष्ट टेंपरेचरला, विशिष्ट वायूंच्या मिश्रणात आपण जिवंत आहोत. समजा हे वायू वेगळे असते तर.'

''आपण अस्तित्वात नसतो...''

''हं किंवा काही वेगळ्या स्वरूपात अस्तित्वात असतो. त्या वायूंना पचवण्याची क्षमता निसर्गानं आपल्यात निर्माण केली असती. पाण्यात राहातो म्हणून मासा आपल्यापेक्षा किती भिन्न आहे !

''म्हणून म्हणतो निसर्गानं जे जे निर्माण केलं ते ते केवळ अपघात आहे. योगायोग आहे. चमत्कार आहे. पण ह्या निसर्गाचं जेव्हा आपण विश्लेषण करतो, त्याचे काहीं स्थायी भाव शोधू पाहातो तेव्हा फक्त त्या नियमांना आपण विज्ञान म्हणतो.''

''माय गॉड, म्हणजे विज्ञानाला मोडीत काढायचा तुमचा विचार आहे की काय ?'' शारंगपाणींनी विचारलं.

''नाही. ह्या विज्ञानाच्या साहाय्यानं आपण अगम्य विश्वाचा वेध घेऊ शकतो हा विज्ञानाचा केवढा फायदा ! आता बघ... ह्या दुर्बिणीपुढे रोज बसायचं, मला दिलेला अंतरिक्षाचा जो हिस्सा आहे तो मी दुर्बिणीच्या साहाय्याने ताब्यात घ्यायचा. आणि ह्या झरोक्यातून बाहेर बघायचं. शारंगपाणी, ह्या अंतरिक्षाचा काळाभोर प्रकाश बघता बघता मला पृथ्वीवरचा पांढरा प्रकाश खोटा वाटायला लागला आहे...'' ते आपल्या खुर्चीवर बसता बसता म्हणाले.

शारंगपाणींना हसू आलं.

''दास, तुम्ही आता प्रकाशाच्या व्याख्याही बदलायला लागलात.''

''त्यात चूक काय आहे ? केवळ हवेचं माध्यम आहे म्हणून तो दृष्यमान होतो एवढंच, अन्यथा तो अंतरिक्षातून येताना काळाच असतो ना ! म्हणजेचं त्याचं प्रकाशमान स्वरूप परजीवी आहे. आणि ते ग्रेट स्वॅलोअर्स ...!''

''स्वॅलोअर्स !''

''ब्लॅक होल्स शारंगपाणी - आपलाच प्रकाश स्वतःच गिळंकृत करत बसतात. लहानपणी कधीतरी आजोबा त्या कृष्णाची गीता सांगायचे समजावून. त्यात त्यानं म्हणे विश्वदर्शन घडवलं. सगळे प्राणी त्याच्या मुखात चालले आहेत असं काहीसं ते वर्णन होतं. आता ते वर्णन आठवले की मला ब्लॅक होल्सच आठवतात.

''जाऊ दे. त्याच्या अगम्यपणातून काही सापडतं का ते बघू या. आता हा माझा उत्तर दिशेकडचा पट्टा - माझ्या दुर्बिणीच्या आवाक्यात येणारे त्यातले तारे आणि ग्रह. सर्व पाठ झालंय बघ.'' बोलता बोलता दासांनी दुर्बिण ॲडजस्ट केली. दुर्बिण आपली चित्रं समोरच्या स्क्रीनवर देऊ लागली.

''हा सिनोरा तारा ... आणि त्याचे हे ग्रह. शारंगपाणी, त्या ताऱ्याच्या ग्रहांवर काही जीवन असेल असं मला वाटत नाही. अवकाशात झेप घ्यायला आतुर झालेल्या आपल्या यानांना मला सांगावं वाटतं -

''जरा वेळ आहे बाबा ... एवढे उताविळ ....'' आणि दासांचे पुढचे शब्द ओठातल्या ओठातच राहिले. त्या ऐवजी एक उद्‌गार बाहेर पडला.

''हे ऽ ऽ व्हॉटस धिस !.. देअर आर सम साईन्स...''

दासांचा उत्तेजित आवाज सर्व ऑब्झर्वेटरीत घुमला. सर्वच शास्त्रज्ञ दासांच्या दिशेनं वळाले.



दास स्क्रीनकडे पाहात होते. स्क्रीनवर सिनोर ताऱ्याच्या बाजूचा ग्रह दास अधिक फोकस करत होते. तो ग्रह अधिक सुस्पष्ट होत होता. त्या ग्रहावरून काही सिग्नल्स येत होते. दृश्य माध्यमातले.

आता मात्र सर्वच शास्त्रज्ञ उठले आणि स्क्रीनच्या भोवती जमा झाले. त्या ग्रहावरून नियमितपणे विशिष्ट ऱ्हिदम मधून सिग्नल्स येत होते ह्याचा अर्थ हे सिग्नल्स मुद्दामच दिले जात होते.

''देअर इज लाईफ ... तेथे जीवन आहे.'' अनेकांच्या ओठातून उत्स्फूर्तपणे शब्द बाहेर पडले.

कित्येक जणांनी तर अपरिमित आनंदाने एकमेकांना मिठ्याही मारल्या.

''शेवटी जे आपण शोधत होतो ते सापडलं. आपण जिंकलो.'' सर्व ऑब्झर्वेटरी आनंदानं भरून गेली होती. ताबडतोब वरिष्ठांना फोन लावले गेले.

''आता त्या यानांना सांगा... तुम्ही तयार रहा. तुम्हाला झेप घ्यायची आहे. एका नव्या विश्वात ... नव्या जगात...' दास उत्साहानं बोलत होते. उत्साहाची लाट हळुहळू स्थिरावत गेली. सगळे जण नुकत्या जन्मलेल्या बाळाकडे पाहावं तसे त्या सिग्नलकडे पाहात होते.

सर्वजण आता विचारविनिमय करत होते. ज्या अर्थी हे सिग्नल्स दिले जाताहेत त्या अर्थी त्या ग्रहवासियांची बौद्धिक आणि वैज्ञानिक प्रगतीही भरपूर असणार., कदाचित आपल्यापेक्षा जास्त : कसे असतील ते सजीव?

हातपाय असलेले... की स्युडोपोडिया असलेले ? शेवटी मात्र एक प्रश्न दासांनी न राहवून विचारला.

''मी दररोज त्या ताऱ्याचं निरीक्षण करत होतो पण कधीही त्यातून मला जीवनाचं चिन्ह दिसलं नाही. त्या ग्रहावरूनही कधी मला अशा तऱ्हेचे सिग्नल्स आले नाहीत. आणि आजच अचानक हे सिग्नल्स कसे यावेत ?

दास पुनः पुनः त्या सिग्नल्सकडे पाहात होते. ते सिग्नल्स निश्चितच मुद्दाम दिले जात होते. पण अचानक ह्या सिग्नल्सचं प्रयोजन काय हे मात्र दासांच्या आणि त्यांच्या सहकाऱ्यांच्याही लक्षात येत नव्हते.

ह्या पुढे काय करायचं हे ठरवायला एक तातडीची मिटिंग घेण्यात आली.

अंतराळवीर, अंतराळ संशोधक, स्पेस प्रोग्रॅमर्स हे सर्व जण एकत्र जमले होते.

सर्वांच्याच चेहऱ्यावर आनंद होता, उत्सुकता होती. एका नव्या अनुभवाला सगळेच जण सामोरे जाणार होते.

''हा ग्रह त्या मानानं जवळ आहे. आणि आजवर आपण ज्या मोहिमा घेतल्या आहेत त्या लक्षात घेता आपण ह्या ग्रहावर पोहोचणं सहज शक्य आहे...'' डिपार्टमेंटचे प्रमुख म्हणत होते.

‘‘होय सर... फक्त तिथल्या वातावरणाबाबत आपल्याला काही माहिती नाही म्हणून आपण योग्य ती काळजी घ्यायला हवी.’’

‘‘ते सिग्नल्स देताहेत म्हणजे ते आपल्याला आमंत्रित करताहेत ? ... की वॉर्निंग देताहेत? आपण काय समजायचं ?’’

‘‘हं, हाही एक प्रश्न आहेच. पण शेवटी अंतरिक्ष संशोधन म्हणजे अज्ञाताच्या काळोखात पाऊल टाकण्यासारखंच असतं. आपण दोन्ही गोष्टींसाठी तयार हवं.’’

‘‘सर... कसा असेल तिथला हा प्रगत सजीव ?...’’

‘‘हा प्रश्न आपल्या सगळ्यांनाच पडला आहे. तेव्हा आता ही मोहिम त्वरित हाती घ्यावी. ह्यात धोकाही आहे. आजवर आपण जिथे जीवन नाही अशा ग्रहांवर मोहिमा केल्या आहेत. पण इथे मात्र सजीव आहेत. सजीवाला सजीवापासून धोका अधिक असतो हे लक्षात घेऊन जाणाऱ्यांनी आपली मोहीम आखायची आहे.’’

दोन तीन अंतराळवीर उत्साहानं उठले. ‘‘सर, हा धोका आम्ही घ्यायला तयार आहोत. आम्हाला आमच्या जगण्या मरण्याची पर्वा नाही. पण आम्हाला या वेगळ्या मोहिमेत जायचं आहे. दुसऱ्या ग्रहावरील सजीवाला भेटून येणारे आम्ही पहिलेवहिले अंतराळवीर ठरू.’’

‘‘ठीक आहे. तुमच्या ह्या उत्साहाचं अभिनंदन. तुमच्या फिटनेस टेस्टस् घेण्यात येतील. आजपासूनच ह्या कामाला सुरुवात करायची.’’

‘‘थँक्स सर...’’

दास मात्र विचारात गर्क होते.

‘‘दास आज तुम्ही गप्प का आहात ?’’ एका शास्त्रज्ञानं विचारलं.

‘‘सर... मी नेहमी मला नेमून दिलेल्या त्या अवकाश पट्ट्याचं निरीक्षण करायचो. पण आजच अचानक सिग्नल्स कसे मिळाले याचं मला आश्चर्य वाटतं. आणि तेही एवढ्या जवळच्या सूर्यमालिकेतून ?’’

‘‘कदाचित हे सिग्नल्स देण्याचं तंत्र त्यांनी अशात अवगत केलं असेल.’’ त्या शास्त्रज्ञानं उत्तर दिलं.

‘‘हं... असं असू शकतं...’ दास ते पटून म्हणाले.

आजपर्यंत सोडण्यात आलेल्या अंतरिक्ष यानांपेक्षा वेगवान यानातून अंतरिक्ष यात्री निघाले होते. प्रथमच सजीव असलेल्या ग्रहावर जाणार असल्याने त्यांना अनेक सूचना दिल्या गेल्या होत्या. त्यांनी आपलं यान कोणत्याही परिस्थितीत सोडायचं नव्हतं. तो ग्रह आवाक्यात आला की ग्रहाची छायाचित्रं पाठवायची होती. यानातली यंत्रणा अगदी सज्ज होती.

यान ग्रहाच्या आवाक्यात आलं आणि यानातल्या कॅमेऱ्यानं छायाचित्रं पाठवायला सुरुवात केली. अंतरिक्षायात्रीही आपल्या स्क्रीनवर ग्रहाचा पृष्ठभाग पाहात होते.



आणि सगळेच आश्चर्यात पडले होते. ज्या ग्रहावरून सिग्नल्स मिळत होते त्या ग्रहावर सजीव नव्हते. ना वनस्पती, ना प्राणी, नायट्रोजन वायूनं भरलेल्या वातावरणाचा तो एक खडकाळ ग्रह होता. अंतराळयात्री बुचकळ्यात पडले होते. आणि अवकाश प्रयोगशाळेतील सर्व शास्त्रज्ञ आश्चर्यात पडले होते.

‘आता आम्ही कोठे उतरायचं ? ग्रहावर उतरायची वेळ आलेली आहे.’ यात्री विचारत होते.

दासांनी स्क्रीन कडे पाहिले. यानानं पाठवलेले फोटोग्राफ स्क्रीनवर स्पष्ट दिसत होते. ह्या ग्रहावर कदापीही जीवसृष्टी नसणार पण त्या संदेशांचं काय... त्यांनी पाहिलं, ग्रहाच्या पृष्ठभागावरून अजूनही सिग्नल्स येतच होते.

दासांनी यात्रींशी संपर्क साधला. ग्रहाच्या ज्या पृष्ठभागावरून संदेश येत होता त्या भागाचं लोकेशन त्यांना दिलं.

‘‘तुम्ही त्या ठिकाणी उतरा. आणि जे सिग्नल्स मिळताहेत त्यांचं निरीक्षण करा. तिथेच आणखी काही माहिती मिळाली तर पाहा.’’ दासांनी सूचना दिल्या.

यान अखेर जिथून सिग्नल्स मिळत होते त्या भागावर उतरलं.

खडखडीत, निर्जन, अचेतन अशा त्या ग्रहावर सिग्नल्स देणारी यंत्रणा मात्र ठेवलेली होती. पृथ्वीपेक्षा वेगळी यंत्रं तिथे होती. सर्व यंत्रणा अगदी त्या ग्रहाच्या पृष्ठभागाशी फिट केली होती. पण ह्यात एकच वेगळं वाटणारं साहित्य होतं. ते म्हणजे पृथ्वीवासियांसारखे फायबरमधून केलेले दोन हात - ते दोन्ही हात जोडून पुढे आलेले होते आणि त्या हातांमधे काही ठेवलं होतं... देण्याच्या अविर्भावात.

यात्रींनी ती वस्तू उचलली. त्यांनी त्या वस्तूचं निरीक्षण केलं. त्यांनी पृथ्वीवर मेसेज दिला.

‘‘इथे सिग्नलसची सर्व यंत्रणा पृष्ठभागाला फिट केली आहे. पण एक आश्चर्य आहे. पृथ्वीवासियासारखे दोन हात ओंजळीत काही घेऊन आहेत. आम्ही ती वस्तू घेतली. ती कदाचित चित्रफीत असावी. काही माहिती...’’

आता मात्र दास उत्तेजित झाले.

‘‘ती वस्तू घेऊन या. मानवी हातांमधे ती वस्तू आहे याचा अर्थ मुद्दाम ती वस्तू त्यांनी आपल्यासाठी ठेवली आहे. तुम्ही ग्रहाचं इतर निरीक्षण करा. तिथल्या मातीचा, हवेचा नमुना घेऊन या. आणि तुमचं सर्व काम झालं की तुम्ही परत निघायचंय.’’

दास त्यांना सूचना देत होते. आजवर अनेक ग्रहांवर अशा मोहिमा झाल्याने जीवसृष्टी जिथे अशक्य आहे, अशा ग्रहामधे फारसं स्वास्थ्य उरलं नव्हतं. तो एक सर्व रूटीन असा भाग झालेला होता.

सेंटरवर लगेच मिटींग घेण्यात आली. दास बोलत होते.

''सिग्नल्स त्या ग्रहावरचेच आहेत पण तिथे सजीव नाहीत. याचा अर्थ कोणत्यातरी ग्रहावरून तिथे ती सामुग्री पाठवण्यात आली. ती उपकरणं तिथे बसवण्यात आली. अखेर आपली ही अवकाशयात्राही फोल गेली असली तरी अवकाशात कुठेतरी सजीव आहेत आणि आपल्यापेक्षा ते प्रगत आहेत हे मात्र निश्चित. ह्या एवढ्या मोठ्या काळोख्या ब्रह्मांडाच्या सागरात आपण पृथ्वीवर एकाकी नाहीत तर सोबतीला आणखी ग्रहवासी आहेत हे तर निश्चित झालं, आणि त्या ग्रहवासियांनी आपला शोध लावला आहे. आपण कसे आहोत ह्याचा अभ्यास केला आहे. त्या शिवाय तिथे दोन हात निर्माण केले गेले नव्हते. अर्थात ह्याहून अधिक आपण सध्या तरी काही सांगू शकत नाही. एकदा ती वस्तू आपल्या जवळ आली की आपण काय ते जाणू शकू. कदाचित त्या वस्तूत त्यांनी काही सांगण्याचा प्रयत्न केला असेल. तो प्रयत्न जाणून घेणं देखील एक आव्हानच असेल. त्यांच्याजवळच्या कोणत्या ज्ञानेंद्रियांचा त्यांनी वापर केला असेल ते... परमेश्वरचं जाणे...''

शेवटी परमेश्वर हा शब्द आपल्या ओठातून बाहेर आलाच.' दासांनी विचार केला. ह्या सर्व ताऱ्यांना, ग्रहांना एकत्र बांधणारी शक्ती, ह्या अनंत ब्रह्मांडाला साकारणारी शक्ती, ताऱ्यांमधे मोठमोठ्या दरक्षणी होणाऱ्या स्फोटात लपलेली शक्ती म्हणजेच परमेश्वर ? त्या शक्तीलाच कदाचित वाटले असेल की आपण निर्माण केलेलं ब्रह्मांड कुणीतरी पाहावं... म्हणून पृथ्वीवरच्या जीविताचा जन्म घडला असेल. ही शक्ती मात्र अनाकलनीय आहे. जिचा आदि अंत आपण जाणू शकत नाही अशी आहे.'' दास नेहमीप्रमाणे वाक्य अर्धवट सोडून आपल्या विचारांमधे गढले.

अखेर अंतरिक्ष यात्री परत आले. ते निराश झाले होते. आपण एका जीवसृष्टी असलेल्या ग्रहावर जाणार ह्या आशेनं ते गेले होते. पण त्यांच्या नशिबी आला होता एक निर्जीव ग्रह. आता एकच उत्सुकता होती.... त्या वस्तूत काय दडलं आहे ? ती वस्तू .. एक चलच्चित्रफीत होती. मोठ्या पराकाष्ठेनं त्या परग्रहवासियांनी ती तयार केली होती. पृथ्वीवरचं ज्ञान, यंत्रणा, साधनं ह्याहून तिथे निश्चित सगळं वेगळं असणार. पण पृथ्वीच्या दूरवरच्या निरीक्षणातून त्यांनी काही घडवण्याचा प्रयत्न केला होता.

त्या चित्रफितीसाठी तिच्या योग्य अशी यंत्रणा सर्वांनी झटून तयार केली.

स्क्रीनवर काही सांकेतिक चित्रं दिसू लागली. आपल्या ज्ञानेंद्रियांच्या आवाक्यात आणि पृथ्वीवासियांच्या ज्ञानेंद्रियांचा विचार करत ती फीत निर्माण केली गेली होती. प्रथम नुसताच एक गोल. त्यावर बाणासारख्या खुणा... त्या नंतर ते बाण कुठली तरी उंची गाठताहेत असं दृश्य. नंतर पृथ्वीचं निळ्या रंगाचं चित्र. त्यावर मानवी आकृत्या. मधेच त्या आकृत्या जवळ येताहेत, मारताहेत... पुनः पुनः तेच दृश्य आणि त्यानंतर दोन गोल जवळ येता येता दूर गेलेले... तो दूर जाणारा ग्रह केवळ काही सिग्नल्स देत दूर गेलेला ...

चित्रफीत संपली. प्रयोगशाळेत पुनः ट्यूबचा झळझळता प्रकाश पसरला. सगळे श्वास रोखून बघत होते. पण लाईट लागल्यावर मात्र सर्वांनी एक निराशेचा उद्गार काढला.

''त्यांना काय म्हणायचंय ?''

''हॅं : फुकट गेली ही अंतरिक्ष यात्रा...''

''त्यांनी तर काही माहिती दिलीच नाही.'' वेगवेगळ्या प्रतिक्रिया येत होत्या.

दास मात्र डोळे मिटून बसले होते. त्यांच्या डोळ्यांपुढून ती चित्रफीत जात होती. आपल्या सांकेतिक भाषेत तो परग्रहवासी काय सांगतो आहे ह्याचा ते अर्थ लावत होते. पाहाता पाहाता प्रत्येक चित्राचा अर्थ त्यांच्या डोळ्यांपुढे स्पष्ट झाला..त्यांनी एक सुस्कारा सोडला.

''दास, तुम्हीही हताश झालात ना ?'' एका शास्त्रज्ञानं विचारलं.

''हो. हताश झालो. पण त्यांच्या सांगण्याचा अर्थ लक्षात येऊन हताश झालो.''

''काय ... तुम्हाला त्यातून काही अर्थ जाणवला ?''

''होय... त्यांच्या सगळ्याच वर्तनाचा अर्थ मला समजला आहे. पृथ्वीवरील मानवांचा शोध त्यांनी बराच आधी लावला असावा. ते आपलं निरीक्षण करत होते. आपली वाढती उत्सुकता आणि विज्ञानातील प्रगती हे लक्षात घेऊन त्यांनी वेगळ्या ग्रहावरून आपल्याला त्यांच्या अस्तित्वाची कल्पना दिली. आणि आपल्याला काही समजावण्याचा त्यांनी प्रयत्न केला.'' दास बोलत होते.

''समजावण्याचा प्रयत्न ?'' एकानं आश्चर्यानं विचारलं.

''होय समजावण्याचा. त्या चित्रफितीत प्रथम एक गोलाकार ग्रह आणि काही बाणाकार अस्तित्व त्यांनी दाखवलं. ते बाणाकार अस्तित्व म्हणजे ते प्रगत सजीव. त्यांनी आपलं अस्तित्व नुसतं बाणाकृतीनं दाखवलं. नंतर ते बाण उंची गाठताना दाखवले म्हणजेच, त्यांची प्रगती ते दाखवताहेत आणि त्या नंतरचा भाग हा पृथ्वीवासियांचं त्यांच्यावर जे इंप्रेशन आहे. म्हणजे त्यांनी आपल्याला जे जाणून घेतलं त्या संबंधी आहे. त्यांनी मानवी आकृती जवळ येऊन मारताना दाखवल्यात ह्याचा अर्थ स्पष्ट आहे. आपली झालेली महायुद्धं, एकमेकांचा विद्वेष, आपली आक्रमणप्रियता आपली संहारक वृत्ती हे सर्व त्यांनी ओळखलं. आणि म्हणून त्यांनी शेवटचा संदेश दिला आहे. दोन गोल जवळ येता येता दूर गेलेले दाखवलेत. म्हणजे ते आपल्या जवळ येऊ शकतात. आपल्याशी संपर्क ठेऊ शकतात. पण हा धोका ते पत्करणार नाहीत. हे सजीव शांतीप्रिय असावेत. किंवा आक्रमण त्यांच्या रक्तातच नसावं. त्यांनी आपल्याला शेवटी समजच दिली आहे की आम्ही तुमच्या जवळ येऊ इच्छितो तरीही ह्या आक्रमणाच्या धोक्यामुळे ते दूरच राहू इच्छितात. त्यांचं खरं आहे. आपल्या सर्व इतिहासात आपण आक्रमणं करतच जमीन हिरावून घेतली आहे. हा इतिहासही त्यांनी पाहिला असावा. आपण प्रेमानं एकमेकांजवळ येऊ शकत नाही म्हणून त्यांनी जवळ येणं शक्य असूनही दुरावाच पसंत केला. त्यांनी म्हणूनच आपलं अस्तित्व कसं आहे हेही चित्रफितीत दाखवलं. त्यांच्या ग्रहाची कोणतीच माहिती

त्यांनी दिलेली नाही.

"फक्त जाता जाता त्यांनी आपल्याला शुभेच्छा दिल्या आहेत. सिग्नल्स देऊन. म्हणजे त्या निर्जन ग्रहावरून येणारे सिग्नल्स त्यांच्या शुभेच्छांचे आहेत. ह्यावरून आपण काही धडा घ्यायला हवा. विश्वातला एक प्रेमळ प्रगत प्राणी आपल्या स्वभावामुळे आपल्याशी दुरावा ठेवून आहे...."

सगळे शांत बसले होते. सगळ्यांच्याच चेहऱ्यावर अपराधी भाव होता.

दासांनी स्क्रीनचं बटन दाबलं. दुर्बिण अजूनही त्या ग्रहाकडेच रोखून ठेवली होती.

स्वीच दाबल्याबरोबर ग्रहावरून येणारे सिग्नल्स लुकलुकू लागले.

सर्व जाणूनही ते परग्रहवासी शुभेच्छाच देत होते.





'काही दिवस कवीच्या सान्निध्यात होता म्हणे तो....'

व्यंगचित्र : सारंग यावलकर

# आई

❐ प्रा. मनोहर राईलकर

***'डॉक्टरजी, त्याचा हक्कच आहे माझ्यावर रागावण्याचा. पण मला एकदा तरी तो दाखवा हो. मी त्याची क्षमा मागेन आणि त्याची समजुतही काढेन.....***
***कोण आहे तो ? कुठं राहातो ?....'***
***– बाईंनी माझ्यावर प्रश्नांचा भडीमारच केला.***

*विजयचं पत्र पाहताच मला खूप आनंद झाला. आणि त्यात नक्की आनंदाचीच बातमी असणार, हे त्यावरच्या लाल रंगातल्या स्वस्तिकावरून कळून तो द्विगुणित झाला. हातातली पुस्तकं कॉटवर टाकून मी आधी त्याचं पत्र फोडलं.*

*'माझ्या आईचा शोध लागला,' पहिलंच वाक्य वाचून मी हर्षातिरेकानं वेडा झालो. 'पण सगळं सांगण्याकरता पत्र फारच अपुरं आहे. तरी तू पटियाळाला ये. नाहीतर मीच मुंबईला येतो...' पण प्रत्यक्षात यातलं काहीच शक्य नव्हतं. त्यामुळं माझी उत्सुकता लवकर शमण्याची काही चिन्हं नव्हती.*

ही एक सत्यकथा आहे. अगदी प्रत्यक्षात घडलेली. तिचा पूर्वार्ध मला प्रत्यक्ष माहीत असण्याची शक्यताच नाही. पण कथेच्या उत्तरार्धाचा मी पुष्कळ अंशी साक्षी आहे.

फार फार वर्षं झाली त्या गोष्टीला. पंचेचाळीस सालातली आमची ओळख. आम्ही त्याच वर्षी मॅट्रिकची परीक्षा देऊन कॉलेजात प्रवेश घेतला होता. मी पुण्याहून आलो होतो. आणि विजयकुमार बात्रा पटियाळाहून. तेव्हा, आमची ओळख असण्याचा संभवच नव्हता. प्रदेश, भाषा वगैरे सगळ्याच बाबतीत इतका फरक होता आमच्यात. आणि कुणाशी नव्यानं ओळख करून घेण्याइतकं धाडस माझ्यातही नव्हतं. एखाद्या पंजाबी मुलाची ओळख आपण होऊन कसली करून घेतो ! पण नियतीनंच आमची गाठ घालून द्यायचं ठरवलं असावं. योगायोगानं पहिल्या वर्षी प्रॅक्टिकलला आम्ही दोघे पार्टनर झालो होतो.

अत्यंत उमदा माणूस. पराकाष्ठेचा जिद्दी. आणि तसा आतल्या गाठीचा. पण अगदी हसतमुख. कधी उदास दिसायचा नाही. कशी कुणास ठाऊक. त्याची न माझी अगदी गट्टी होऊन गेली. आतल्या गाठीचा असला तरी गट्टी जमल्यावर त्यानं आपलं रहस्यही माझ्याजवळ

उघडं केलंन आणि म्हणाला, 'यही मेरे झिंदगी का इकलौता मक्सद है यार।''

पण, त्या एरवीच्या हसऱ्या चेहऱ्यावर त्या वेळी उमटलेले उदास भाव पाहून मला कसंसंच झालं. आपलं रहस्य त्यानं जेव्हा माझ्याजवळ उघडं केलंन, तेव्हा मला धक्काच बसला. कारण, आजवरचं माझं जीवन अगदी साधं सोपं, बाळबोध. जगात असं काही घडतं हे नव्यानंच कळून आलेलं.

लॅमिंग्टन रोडवर तो एक खोली घेऊन रहात होता. मी गिरगावात मावशीकडे. पहिले एकदोन महिने आमची इतकी घसट नव्हती. प्रॅक्टिकलला एकत्र यायचो इतकंच. पण, दोनेक महिन्यांतच आमची गट्टी झाली. त्याच्या खोलीवर जाण्याकरता मला फारशी वाकडी वाट करावी लागत नसे. खूपदा, नव्हे आठवड्यातून दोनतीनदा तरी मी त्याच्या खोलीवर जात असे. अगदी बडे बाप का बेटा असावा, हे पहिल्याच भेटीच्या वेळी माझ्या लक्षात आलं. पण इतका श्रीमंत असूनही गर्विष्ठ नव्हता. त्यामुळं, माझी न् त्याची दोस्ती कधी जमून गेली, कळलंच नाही.

पहिली टर्म संपत आली होती. संध्याकाळी साडेपाचला आमचं फिजिक्सचं टर्ममधलं शेवटचं प्रॅक्टिकल संपलं आणि आम्ही निघालो. 'यार, जरा वाळूत बसू या?' मी मान डोलवली. आमच्या विल्सन कॉलेजचा परिसर मोठा रमणीय होताच. रस्ता ओलांडला की समुद्र. त्याचा आवाज गंभीर की कॉलेजची इमारत अधिक गंभीर असा प्रश्न पडे.

आम्ही चौपाटीवरच्या चणेवाल्याकडून चणे घेऊन खात बसलो. चणे खाऊन होईतो आम्ही कुणी एकमेकांशी बोललो नाही. मी कधीच बोलत नसे म्हणा. तो जवळ असला की बहुधा तोच बडबड करी. मी मुलखाचा मुखस्तंभ. त्यामुळंच तर आमची मैत्री कशी जमली हेही अनेकांना नवल वाटण्याजोगं ठरलं होतं.

एकाएकी काय झालं कुणास ठाऊक. पण त्यानं एकदम माझा हात धरलान. म्हणाला, 'आता परीक्षा संपली की महिनाभर आपली भेट नाही व्हायची. तर माझ्या खोलीवर येशील, यार?' त्याच्या चेहऱ्यावरचं औदासीन्य आणि बोलण्यातलं आर्जव पाहून त्याला नाही म्हणणं मला कठिण गेलं. आम्ही त्याच्या खोलीवर गेलो.

'कॉफी बनावू ?' कॉलेजचे कपडे काढून पंजाबी पद्धतीची लुंगी लावता लावता त्यानं विचारलं. मी मान डोलवल्यावर तो टेबलाकडे वळला अन् नेहमीप्रमाणं मी पूर्वी अनेकदा पाहिलेल्या त्याच्या खोलीचं निरीक्षण करू लागलो. तसं पाहण्यासारखं काहीच नव्हतं. भिंतीवर एका वयस्कर जोडप्याचा फोटो होता. त्याच्या आईवडिलांचा. अनेकदा पाहिला असला तरी पुन्हा एकदा पहावा म्हणून मी उठून त्याचं निरीक्षण करू लागलो. तेवढ्यात तो कॉफी घेऊन आलाच.

'क्या देख रहे हो ? तुम्हे तो मालूम है। मेरे पापाजी और माँ। लेकिन ...' इतकं बोलून तो पटकन थांबला. माझ्यापुढं कॉफीचा कप करताना माझं त्याच्या डोळ्यांकडे लक्ष गेलं. डोळे भरले होते.

पंजाबी माणसं फार भावनाप्रधान असतात, असं मी ऐकलं होतं. पण ह्याचे डोळे का भरले असावेत, हे माझ्या लक्षात आलं नाही. पण एकदम प्रकाश पडला, आणि मी विचारलं,

'का रे विजय, ह्या हयात नाहीत का ?'

'आहेत ना.'

'मग ? तुझ्या डोळ्यांत अश्रू का ?'

'ते मी तुला सांगू शकणार नाही. कुणालाच सांगू शकणार नाही.'

खरं तर मीही थोडा दुखावलो होतो. आपलं रहस्य हा मला सांगत नाही. याचा आपल्यावर विश्वास नाही. मग कशाला याच्याशी मैत्री ठेवायची, असा विचार मनात घोळवीत मी घरी आलो. आणि त्याला यापुढं भेटायचं नाही, असंही ठरवून टाकलं. तोवर सहामाही आल्यामुळं प्रॅक्टिकल्सही संपली होती. त्यामुळं लॅबमध्ये त्याची माझी भेट होण्याची शक्यता नव्हती. चार दिवस गेले. मी त्याला भेटत नाही, हे त्याच्या लक्षात आलं असावं. तो पत्ता शोधत शोधत माझ्या मावशीकडे आला. पण त्याच वेळी माझे आईवडीलही आले होते. नाईलाजास्तव त्यांच्याशी त्याची ओळख करून द्यावी लागली. थोड्या वेळानं तो जायला निघाला. मी त्याला पोचवायला म्हणून निघालो. आणि जिन्यापर्यंत जाऊन परतणार तोच त्यानं माझा हात धरलान आणि म्हणाला, 'रागावलास काय रे ?' मी नकारार्थी मान हलवली. 'मग घरी चल ना. तू का रागावलायस ते माझ्या लक्षात आलंय. म्हणूनच मी तुला घरी बोलवतोय. त्या दिवशी मी जे सांगू शकलो नाही, ते आज तुला सांगतो. मग ? चलतोस? चलो ना यार.' त्याच्या स्वरातलं आर्जव पाहून त्याला नकार देणं कठिण गेलं. 'आलोच कपडे करून,' असं म्हणून मी वळलो.

'हं, बोल आता,' घरी गेल्या गेल्या मी म्हटलं.

'एक विचारू ? रागावणार नाहीस?' मी मान डोलवली. 'ते तुझे खरे आईवडील आहेत ना?'

मी भडकलो. 'काय म्हणायचंय तुला? तुझ्या जिभेला काही हाड?'

त्यानं माझा हात धरलान्. म्हणाला, 'रागवू नकोस. तुला दुखवायचं नाहीये मला. पण...'

'पण काय ? मी जरा घुश्श्यातच विचारलं.

'कोणाला सांगू नकोस. हे माझे खरे आईवडील नाहीत,' फोटोकडे निर्देश करीत तो म्हणाला. 'म्हणून मी तुला मगाशी तसं विचारलं.'

'म्हणजे ?'

'अरे, यार, तुला कसं सांगू ? त्यांनी मला एका छोट्या अनाथाश्रमातून उचलून आणलं.

आणि दत्तक घेऊन पाळलं. पापाजी साठ बरस के और माँ पचपन की. तरीही त्यांना मूलबाळ झालं नाही.' हसऱ्या चेहऱ्यामागच्या उदास छटेमागचं कारण मला तेव्हा कळलं.

'त्यांनी फार हाल केले का ?' सावत्र आईवडील म्हणजे काय याची एक प्रतिमाच लहानपणी तयार झालेली असते. तेवढ्या अनुभवावर मी विचारलं. खरं तर हे काही सावत्र नव्हते. दत्तक होते. पण तेवढा पोच नव्हता मला.

'नाही रे यार. वो दोनों तो देवता है।' बोलता बोलता हिंदीवर जायची सवय होती त्याला. 'लेकिन मेरी असली माबाप कौन इसका मुजे पता नही। और मैं चाहता हूँ कि उनको ढूंड निकाले।'

ही गोष्ट किती अवघड होती, हे सहज कळण्यासारखं होतं. 'पण, ते कसं शक्य आहे?' मी विचारलं. 'तुला त्यांनी घरी आणलं तेव्हा तर तू अगदी लहान असणार?'

'हो. अगदी सहा महिन्यांचा.'

'मग तर तुला काहीच आठवणं शक्य नाही. त्यांचा शोध लावणं....'

'नाही शक्य. मला कळतंय. मुळीच शक्य नाही. पण सारं जग पालथं घालीन. आणि त्यांना शोधून काढीनच. यही मेरे जिंदगी का इकलौता मक्सद है यार।' तो म्हणाला. 'माझ्या खऱ्या आईवर माझा भयंकर राग आहे. तिनं मला का टाकावं? आणि असं अनाथासारखं जिणं माझ्या नशिबी का यावं? मला तिला ज़ाब विचारायचाय. आणि शक्य असलं तर शिक्षाही करायचीय.'

'अरे विजय, असा एकाएकी निर्णय घेऊ नकोस. काही तरी तशीच अडचण असल्याशिवाय कोणती आई आपल्या रक्तामांसाच्या मुलाला असं दूर लोटील ? कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति।'

'मतलब ?'

'मुलगा वाईट असेल. पण, आई वाईट नसते. एखादी बाई वाईट असेल. पण, आई म्हणून ती कधी वाईट नसते. तूच विचार कर. एखाद्या आईवर असा प्रसंग येतो, तेव्हा केवळ तिचाच दोष असतो का? तिला फसवणाराही तितकाच दोषी नसतो का ? आणि काही सामाजिक दडपणांमुळंही हे घडू शकतं.' असं बरंच काही समजावायचा मी प्रयत्न केला. जरा वेळानं तो शांत झाला खरा. पण त्याच्या मनातून सूडाचा विचार गेला नसावा, असं मला वाटत राहिलं.

दुसऱ्या वर्षी मी ए ग्रुप घेतला आणि त्यानं बी. त्याला मेडिकलला जायचं होतं. आमची पार्टनरशिप जरी संपली तरी मैत्री चालूच राहिली. त्या काळी मेडिकलला फारसं कोणी जातच नसे. त्यामुळं प्रवेश मिळणं मुळीच त्रासाचं नसे. नंतर मी बी.एस्सी. होऊन एमेस्सीला प्रवेश घेतला. पुढं मी नोकरीनिमित्त पुण्याला स्थायिक झालो. आणि एमबीबीएस होऊन तो परदेशात गेला. वडील श्रीमंत असल्यानं त्याला ते मुळीच अवघड नव्हतं. मात्र तो परदेशी गेला तरी आमचा पत्रव्यवहार चालू राहिला. तशी आम्ही दोघांनी शपथच घेतली होती. शिवाय, त्याच्या 'मक्सद' मध्ये मलाही रस होताच. यथावकाश आमची लग्नं झाली. आणि आम्ही आपापल्या संसारात गुरफटू लागलो. एकोणीसशेसाठ साली तो परदेशातून परत येऊन पुन्हा पटियाळाला स्थायिक झाला. तो परत आल्यावर वर्षभरातच त्याचे दत्तक आईवडील निवर्तल्यामुळं त्यांच्या अफाट इस्टेटीचा तो एकमेव मालक झाला होता. आपला मक्सद सफल होण्याकरता आपल्याला आता कोणाचीही आडकाठी नाही, असं त्यानं एका पत्रात लिहिलं होतं.

तो परत आला त्यालाही पाच वर्षं लोटली. पासष्ठ साल उजाडलं. तरीही त्याच्या खऱ्या आईवडिलांचा पत्ता अजूपर्यंत लागलाच नव्हता. 'अजूनही मी हार मानलेली नाही,' असं त्याच्या एका पत्रात होतं. पण मला आशा नव्हती. कारण आमचीच तोवर पस्तिशी उलटून गेली होती. काळ लोटेल तसतसं ते आणखीच अवघड होणार हे सरळ होतं.

योगायोगानं, एकोणीसशे साठ सालच्या जुलैमध्ये चंडीगढच्या सेंटर फॉर अॅडव्हान्स स्टडीज इन मॅथेमॅटिक्स येथे माझी निवड झाली होती. एका सुटीत मी पटियाळाला त्याच्या घरी जाऊन राहिलो. एरवी पत्नी आणि दोन मुलं यांच्यात तो सुखी होता. पत्नी सुस्वभावी होती. त्याच्या मक्सदला तिचा मनापासून पाठिंबा होता, ही समाधानाची बाब होती. पण, एव्हाना तो अगदी निराश झाला होता. जिद्द म्हणूनच आपला प्रयत्न चालू ठेवायची प्रतिज्ञा तो बोलून दाखवत होता. पण मध्यरात्र हीच पुढच्या नव्या दिवसाची सुरुवात असते नाही का? आणि अमावस्या ज्या क्षणी पूर्ण होते, त्या क्षणीच नव्या महिन्याची प्रतिपदा सुरू होते.

'विजय, तुझ्या ह्या शोधमोहिमेला माझाही मनापासून पाठिंबा आहे. पण एखादी बाई तुझी आईच आहे किंवा एखादा माणूस तुझा बापच आहे, याला पुरावा काय ? ते तू सिद्ध कसं करणार ? अशा वेळी परिस्थितीजन्य पुरावा पुरेसा नसतो.'

'तू मॅथेमॅटिक्सचा माणूस. डीएनए म्हणजे काय ते तुला नावापुरतंच माहीत असेल. पण, अलीकडेच डीएनए फिंगरप्रिंटिंग नावाचं नवीन तंत्र उदयाला आलंय.'

'काय ते मला समजेल ?'

'सांगायचा प्रयत्न करतो. माझा एक मित्र डीएनए फिंगरप्रिंटिंगचा अभ्यास करून आला होता. त्याच्याशी चर्चा करताना मला याची माहिती झाली. तसं हे तंत्र अगदी नवीन आहे. तुला डीएनए म्हणजे काय हे माहीत आहे. एक पेशी वाढत वाढत इतकी मोठी होते की तिचे दोन तुकडे होऊन दोन पेशी मिळतात. त्या प्रक्रियेला मायटॉसिस म्हणतात. हे तुला माहित असेल. आपल्याला फर्स्ट इयरलाच होतं.' मी मान डोलवली. 'फार खोलात जाणं शक्य नाही. पण असं होण्याचं कारण पेशीमधला डीएनए नावाचा पदार्थ. हा पदार्थ लांबलचक आणि पीळ भरलेल्या शिडीसारखा असतो. आईवडिलांकडून निम्मे निम्मे क्रोमोसोम्स मिळतात हे तुला माहित आहेच. हे क्रोमोसोम्स डीएनएचेच भाग असतात. असं स्थूलपणं म्हणता

येईल.

'जसे कोणत्याही दोन माणसांच्या बोटांचे ठसे सारखे नसतात, तसेच कोणत्याही दोन माणसांचे डीएनएसुद्धा सारखे नसतात. फक्त एकाच पेशीपासून जन्मलेल्या जुळ्या भावंडांचे (होमोझायगॉटिक) डीएनए सारखे असतात. मात्र आईवडिलांकडून मुलाला अर्धे अर्धे जीन्स मिळत असल्यामुळं एखादी व्यक्ती एखाद्या मुलाची आई किंवा वडील आहेत किंवा नाहीत हे ठरवणं आता ह्या डीएनए फिंगरप्रिंटिंगच्या तंत्रामुळं शक्य झालं आहे.'

'याचा तू कसा उपयोग करणार आहेस हे मात्र मला कळलं नाही.'

'पाहू. पण, ते सारं तुला कळायला फार वेळ लागेल.'

आमचा विषय तिथंच संपला. कालांतरानं चंडीगढचा एक वर्षाचा अभ्यासक्रम आटोपून मी पुण्यास परतलो.

१९७१ चा फेब्रुवारी महिना असावा. माझा त्या वर्षाचा शेवटचा तास संपवून मी घरी आलो आणि माझ्या पाठोपाठच मघाशी उल्लेख केलेलं लाल स्वस्तिक काढलेलं त्याचं पत्र आलं, 'माझ्या आईचा पत्ता लागला.'

मलाही खूप आनंद झाला. मी त्याला पत्र पाठवून अभिनंदन केलं. हे सारं कसं घडलं असेल त्याची मला उत्सुकता होती. म्हणून सर्व हकीकत विस्तारानं लिहिण्याची मी त्याला विनंती केली. आणि एक दिवस मला पोस्टानं एक भलं मोठं पुडकं आलं. काय आणि कसं कसं झालं ते तुम्ही त्याच्याच शब्दांत वाचा.

□ □

आईचा शोध,

प्रिय मनोहर, तुला आठवतं, तू मला एक प्रश्न केला होता, 'हे तुझे खरे आईवडील नाहीत, हे तुला केव्हा आणि कसं कळलं ?' आणि त्या वेळी मी तुला जे सांगितलं होतं, तेच मला उपयोग पडलं. माझ्या दत्तक आईवडिलांपैकी कुणाचेच डोळे घारे नव्हते. मग माझे डोळे घारे कसे, असं मला जो तो विचारी. प्रथम प्रथम मला त्या प्रश्नामागचा अर्थ उलगडत नसे. पण एक दिवस माझ्या मनात शंका आली, हे आपले खरे आईवडील नसतील का ? म्हणून वयाच्या तेराव्या वाढदिवशी जेव्हा, 'तुला या वाढदिवसाला काय आणू ?' असा प्रश्न पापाजींनी मला विचारला, तेव्हा मी म्हणालो, 'मी मागेन ते द्याल ?' त्यावर, पापाजींनी मला जवळ घेऊन कुरवाळलं आणि म्हटलं, 'काके, तुझ्या मनात शंका का आली ? आजवर तुझ्या मनाविरुद्ध आम्ही काही केलंय ?' (पंजाबीत लहान मुलाला काका आणि मुलीला काकी म्हणतात.)

मी मान हलवली आणि मग माझी मलाच लाज वाटली. पण खऱ्या आईवडिलांच्या शोधाची ओढ इतकी जबरदस्त होती, की माँ आणि पापाजींना माझ्या प्रश्नानं किती दुःख होईल, याची पर्वा करायला माझं मन तयार नव्हतं. 'बोल काके, काय हवंय तुला ?'

'माझे खरे आईवडील कोण ते सांगा,' मी कसंबसं म्हणालो. आणि दुःखानं विदीर्ण झालेला त्यांचा चेहरा पाहून त्यांच्या मिठीतून सुटून आपल्या खोलीत पळालो.

वाढदिवसासारखा आनंदाचा प्रसंग असूनही तो दिवस साऱ्यांनाच उदास करून गेला. घरात बराच वेळ काही हालचाल दिसेना म्हणून दबकत दबकत मी पापाजींच्या खोलीपाशी आलो. तेव्हा माझ्या कानावर जे शब्द पडले ते माझं काळीज चिरीत गेले. पापाजी आईला सांगत होते, 'रो मत, विजय की माँ. आखिर जो अपने नही वो कभी अपने होते ही नही.' त्यांचाही स्वर कापरा होता. मला राहवलं नाही. मी धावतच खोलीत शिरलो आणि पापाजींना मिठी मारून म्हणालो, 'पापाजी माझं चुकलं., मला माफ करा.'

त्यांनीही माझं डोकं आपल्या छातीशी दाबून धरलं आणि ते म्हणाले, 'अरे काके, आम्ही तुझ्यावर रागावलो नाही. पण खैर, तुला जिथून आणलं तिथं मी आज जाऊन येईन. आणि काही पत्ता लागतो का पाहीन. माझ्याबरोबर वाटलं तर तूही चल. बस्स ?'

पण पत्ता लागला नाही. कारण एक तर तेरा वर्षं झाली होती. आणि जन्मल्यावर तासाभरातच कुणी तरी मला तिथं नेऊन टाकलं होतं. यापेक्षा काहीही सांगणं अनाथाश्रमाच्या संचालकांना शक्य नव्हतं. फक्त मला ज्यात गुंडाळलं होतं ते कपडे आणि माझ्या गळ्यातला ताईत इतकंच त्यांनी मला दाखवलं. मात्र, मी एक निश्चय केला. त्यानंतर त्यांना दुखवणारा हा विषय मी कधी काढला नाही, पण, तेवढ्यानं माझं समाधान होणं शक्यच नव्हतं. म्हणून मी शोध घ्यायचा निश्चय केला. एकच आशेचा किरण होता की, जिथून मला आणलं त्या आश्रमाचा पत्ता कळला होता.

मुंबईहून आल्यावर मी लवकरच परदेशी गेलो. आणि स्त्रीरोगतज्ज्ञ होऊन पटियाळालाच प्रॅक्टिस सुरू केली, हे तुला माहीतच आहे. वर्ष दोन वर्षातच मी गावातला एक नामांकित डॉक्टर म्हणून मान्यता पावलो. पुढं पापाजी आणि माँ दोघेही दिवंगत झाले, ते तुला माहीतच आहे. जास्त तपशील लिहीत नाही. पण ज्या अनाथाश्रमातून पापाजींनी मला आणलं त्या आश्रमाला माझ्या तिसाव्या वाढदिवशी माँ आणि पापाजींच्या स्मरणार्थ भली मोठी देणगी देऊन मी त्यांच्या विश्वस्त मंडळात शिरकाव करून घेतला. तीस वर्षांत पुलाखालून खूप पाणी लोटलं होतं. त्यामुळं माझ्या हेतूची कुणालाच शंका येणं शक्य नव्हतं. कारण, त्या काळातले कार्यकर्तेही कुणी आता हयात नव्हते.

त्या आश्रमाची एक पद्धत चांगली होती. मुलाबरोबर आलेल्या सगळ्या वस्तू सीलबंद करून जपून ठेवल्या जात. लहानपणी माझ्या वस्तू हस्तगत केल्या. काय होतं ? एक दुपटं, अंगावरचे कपडे आणि गळ्यातील एक ताईत. बस्स. कुणास ठाऊक ? यातलं केव्हा काय उपयोगी पडेल ते ? मी विचार केला. कारण शोध अवघड होता. मी तीस वर्षांचा. ज्याअर्थी आईनं मला टाकलं होतं त्याअर्थी माझ्या आईच्या हातून लग्नाआधी काही चूक झाली असणार म्हणजे ती कमीत कमी सोळा ते जास्तीत जास्त वीस वर्षांची असणार. म्हणजे आता सेहेचाळीस

ते पन्नास वर्षांची. म्हणून, माझ्याकडे येणाऱ्या त्या वयोगटातल्या बायकांची मी अधिक बारकाईने चौकशी करी.

दुसरी गोष्ट म्हणजे घारे डोळे, तिसरी गोष्ट म्हणजे गोरा रंग, चौथी गोष्ट म्हणजे मोठ्ठं नाक, पाचवी आणि सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे माझा ओ-पॉझिटिव रक्तगट. अर्थात हे सारं माझ्या वडिलांकडूनही आलं असण्याची शक्यता मी गृहीत धरली होतीच. तरीही, रक्तगट हा फार मोठा दुवा होता. उलट, आता माझी आई पतियाळातच असेल कशावरून हा प्रश्न होताच. एकूण, अनुकूल बाबींपेक्षा प्रतिकूल बाबीच अधिक होत्या. डीएनए फिंगरप्रिंटिंगचा उपयोग अनिवार्य होता. कोण बाई कशी उलटेल काय सांगता येणार ? कारण तिच्या अब्रूचाच आणि परिणामी पुढच्या सगळ्या जीवनाचाच प्रश्न होता.

कुणही स्त्री माझ्याकडे आली की मी ह्या साऱ्या दृष्टीनं निरीक्षण चालू करी. तिचं रक्त काढून घेऊन ओ-पॉझिटिव असल्यास डीएनए तपासणीकरता माझ्या मित्राकडे पाठवून देई.

आणखी दहा वर्षं गेली. एकेणीसशे सत्तर साल संपत आलं. जसजसा काळ लोटत होता तसतसा शोध लागण्याचा संभव कमी कमी होत होता आणि मी अधिकाधिक निराश होत होतो.

एक दिवस मात्र, चमत्कार झाला. काय सांगू तुला मनोहर. तो दिवस माझ्या जीवनात सोन्याच्या अक्षरांनी लिहिण्यासारखा आहे. एव्हाना, माझं नाव आसपासच्या शहरांतही चांगलं प्रसिद्धीला आलं होतं. लुधियानाहून एक बाई आल्या. खरं तर बाईंच्यात नि माझ्यात काहीच साम्य नव्हतं. त्यामुळं आरंभी मला काहीच जाणवलं नाही. पण आत आल्या, मला त्यांनी पाहिलं आणि त्या एकदम चमकल्या. तेवढं माझ्या ध्यानात आलं. कदाचित माझ्या वडिलांच्यात आणि माझ्यात असलेलं काही साम्य त्यांना जाणवलं असावं.

त्यांच्याबरोबर त्यांची सून होती. नाव पत्ता झाल्यावर वय विचारलं. छप्पन्न, त्यांच्या सुनेनं सांगितलं. माझं वय चाळीस. आणि माझी आई हयात असेल तर तिचं वय पंचावन्न सत्तावन्नच्या दरम्यान असलं पाहिजे, हा माझा हिशेब होताच. छप्पन्न वय म्हटल्याबरोबर आरंभी विशेष लक्षात आलं नाही, हे खरंय. पण, मी नेहमीप्रमाणं सावध झालो.

रक्तदाब वगैरे पाहून झाल्यावर रक्तगट तपासला आणि नवल म्हणजे बाईंचाही ओ-पॉझिटिव होता. पण निराशेचे इतके फटके खाल्ले होते की, घाई करायची नाही, हे धोरण मी एव्हाना शिकलो होतो. मी त्यांची हिस्ट्री विचारून लिहून घेऊ लागलो. मुलं किती ? असा प्रश्न विचारताच त्यांची चलबिचल झालेली माझ्या नजरेतून सुटली नाही. त्यांनी मुलांची माहिती दिली. प्रत्येकाची जन्मतारीख विचारली. पहिलं मूल त्यांना एकोणिसाव्या वर्षी झालं होतं. माझ्या दृष्टीनं हा मोठाच मुद्दा होता. माझं वय चाळीस अधिक आईचं संभाव्य वय सोळा बरोबर छप्पन्न. वयही जुळलं होतं. आणि मुलांच्या जन्मतारखा व कुटुंबनियोजनाची शस्त्रक्रिया झाल्याची तारीख पहात त्यांचं एकही मूल गेलं नव्हतं हे माझ्या लक्षात आलं. अर्थात मी जो



हिशेब करीत होतो तो त्यांना समजण्यापलीकडचा होता.

'मॉजी,' माझ्या शब्दासरशी त्या चमकल्या.

'काय झालं ?'

'आपण मला माँजी म्हणालात त्याचं नवल वाटलं.'

'त्यात काय नवल वाटायचं? तुमच्या वयाच्या सगळ्याच स्त्रियांना मी माँजी म्हणतो. बरं, पहिल्या बाळंतपणाच्या वेळी काही त्रास ?' माझ्या ह्या प्रश्नाचा रोखही त्यांना कळणं शक्य नव्हतं. पहिल्या खेपेला वेळ लागतोच. पण नंतरच्या वेळी तितकासा लागत नाही. तुला माहीत नसेल म्हणून सांगतो.

'काहीसुद्धा वेळ लागला नाही !'

'अगदी लवकर झालं बाळंतपण ?'

'होय डाक्टरजी. अगदी मी गेले आणि तासाभरातच झालं बाळंतपण.' माझ्या दृष्टीनं हा अत्यंत महत्वाचा मुद्दा होता. कारण पहिल्या खेपेला बाई इतक्या लवकर बाळंत होतच नाही.

'पहिल्या खेपेला इतक्या लवकर ?' मी डाव टाकला. त्या कावऱ्या बावऱ्या झाल्या पण, मी लगेच म्हटलं, 'भाग्यवान आहात माँजी,' मी म्हटलं. त्यासरशी त्यांनी सुटकेचा बारीक निश्वास सोडलेला माझ्या ध्यानात आल्यावाचून राहिला नाही. माझा बाण बरोबर लागला होता. मात्र, आमच्या दोघांत साम्य नसल्यानं मला फारशी आशा नव्हती. मनात आलं प्रत्येक बाईच्या बाबतीत आपल्याला आशा वाटते. तेव्हा हुरळून जाण्यात काहीच अर्थ नव्हता. पण, माणसाचं मन नेहमी अनुकूल असेच निष्कर्ष काढतं.

'कुणी गेलेली मुलं ?' माझ्या लक्षात आलेलं असूनही मी विचारलं. पण, असं विचारताच त्या क्षणभर गप्प झाल्या. 'माफ करा माँजी. तुम्हाला दुखवायचं नाही. पण आम्हाला सर्व माहिती असावी लागते. सांगितलीत तर बरं होईल. डॉक्टरपासून काही लपवू नये. माहीत आहे ना ?'

'आहे. पण, डाक्टरजी. माझं एकही मूल गेलं नाही,' बाई ठामपणानं म्हणाल्या. सुनेच्या देखत त्या काही बोलणं शक्य नव्हतं, हे मला कळत होतं.

'चला आत,' मी म्हटलं.

नेहमीच्या तपासण्या झाल्या. आणि शंका आलेल्या प्रत्येक बाईच्या बाबतीत वापरायचा शेवटचा हुकमाचा एक्का काढायचं मी ठरवलं. आजवर त्याचा काहीच उपयोग झाला नव्हता. आताही होईल अशी आशा मी धरली नव्हतीच. आश्रमातून आणलेले ते बाळाचे कपडे आणि ताईत एरवी पेशंटला दिसणार नाही अशा तऱ्हेनं एका काचेच्या कपाटात टांगलेले असत. ज्या बाईच्या बाबतीत मला शंका येई, तिला एका विशिष्ट कोनात बसायला सांगे. आणि मान वर करा, असं म्हणे. मान वर केल्या केल्या त्या वस्तू बाईच्या दृष्टीस पडत. आजवर कोणत्याच

बाईच्या काही खास अशा प्रतिक्रिया मला आढळल्या नाहीत. हा प्रयोग ह्या बाईवरही करायचं मी ठरवलं.

मनोहर, त्या वस्तू बाईंच्या नजरेस पडताक्षणीच त्यांच्या डोळ्यांत भूत पाहिल्यासारखी एक जबरदस्त भीती मला दिसून आली. त्यांच्या तोंडून विचित्र उद्‌गार बाहेर पडला. तरीही आपल्याला काहीच जाणवलं नाही, असं मी दाखवलं. हिस्टेरॅक्टॉमी करायला हवी, असं मी त्या दोघींना सांगितलं. 'मग केव्हा सोयीचं आहे तुम्हांला ? फार उशीर करू नका. महिन्याभरात ?' मी म्हणालो. घरच्यांशी बोलून सांगू, असं त्या म्हणाल्या. ज्या बाईबद्दल मला शंका येई, त्यांचं आणि माझं रक्त मित्राकडे मी पाठवीत असेच. तशी ह्या बाईंबद्दलही आल्यानं माझं आणि ह्या बाईंचं रक्तही पाठवून दिलं.

साधारणतः शस्त्रक्रियेला आपले लोक घाबरतात. त्यामुळं बहुधा बाई काही येणार नाहीत, असं मी धरून चाललो होतो. पण नवल म्हणजे दुसऱ्याच दिवशी त्या आल्या.

'काय ठरलंसुद्धा ?' मी विचारलं.

'होय डाक्टरजी. तारीख दोन आठवड्यानंतरची कुठलीही ठरवा. कारण सध्या, आमच्याकडे पाहुणे यायचेत. पण मी आज एकटीच आले आहे कारण, तुम्हाला एक विचारायचंय.'

'विचारा.'

'इथं नको. तुमच्या तपासायच्या खोलीत जाऊ.'

आम्ही दोघे आत गेलो. बराच वेळ त्या बोलेनात. पण ज्याअर्थी त्या आपण होऊन आल्या आहेत त्याअर्थी त्याही सोक्षमोक्ष लावण्याच्या हेतूनंच आल्या असाव्यात, हे नक्की. त्यांनी दबकतच विचारलं, 'एक विचारू?'

मी फक्त स्मित केलं. तेव्हा, 'रागावणार तर नाही?' त्या म्हणाल्या.

'ते तुम्ही काय विचाराल त्यावर अवलंबून राहील नाही का ?' मी हसत हसत म्हणालो.

'मग नाहीच विचारत.' बाई माझ्यापेक्षाही खमक्या दिसल्या.

'बरं बरं. नाही रागावणार. बोला.'

'हे बाळलेणं इथं कसं ? हे कपडे, ताईत?'

त्यांच्या त्या प्रश्नानं मी चमकलो. हा प्रश्न त्यांनी का विचारला असेल ? आमच्यात साम्य तर काही नव्हतं. कदाचित त्या काळी माझ्या आईला सहाय्य करणाऱ्या त्या तिच्या नातेवाईक किंवा दूरच्या भगिनीही असतील. काय सांगावं ?

'हात्तिच्या. ह्या प्रश्नावर कशाला रागवायचं ? पण, का हो. तुम्हाला का एवढी उत्सुकता?' एकीकडे मी सावध होतो. पण माझ्या प्रश्नावर त्या गप्प राहिल्या. त्यामुळं आपलं ध्येय जवळ येतंय की काय, ह्या कल्पनेनं मी आनंदितही होत होतो. आणि माझं हृदय धडधडतही होतं.

'माझ्या एका मित्रानं मला ते भेट दिलंय. शुभचिन्ह म्हणून,' मी दडपून दिलं. बाईंच्या मुद्रेवरचे फरक मी टिपतच होतो. त्यांची निराशा झाल्याचं माझ्या लक्षात आलं.

'पण तुम्ही माझ्या प्रश्नाचं उत्तर नाही दिलंत अजून. तुम्हाला का उत्सुकता ?'

'काही नाही. सहज. असं कुठं पाहिलं नाही. म्हणून नवल वाटलं.'

'माँजी,' आता मला राहवेना. त्यांचे आणखी हाल करणं मला बरं वाटेना. आणि खरोखरच ती माझी आई असेल तर ? तरीही आणखी खात्री करून घेणं जरूरीचं होतं. 'तुम्हाला खरं खरं सांगतो. मी एका आश्रमाचा एक विश्वस्त आहे. असं बाळलेणं शुभ असतं असं माझी आई मला म्हणाली होती. म्हणून त्या आश्रमातून मागून आणलंय.'

'कोणता आश्रम ?'

मी नाव सांगितलं. पण, नाव ऐकता- क्षणीच बाई चमकल्या. तरीही खात्री होईतो शांत राह्यचं मी ठरवलं. पण, पुढं काही विचारणार तोच, दुपट्याचं टोक तोंडावर धरून त्या झपाट्यानं निघून गेल्या. त्यांच्या प्रत्येक प्रतिक्रियेमुळे माझा समज पक्का होत होता. आता जर त्या पुन्हा आल्या तर नक्की समजायला हरकत नाही, असं मी ठरवलं. अर्थात, डीएनएचा वृत्तांत काय येतो, ह्याला महत्व जास्त होतंच.

नवल म्हणजे दुसऱ्याच दिवशी त्या आल्या. अगदी उशीरा दुपारी दवाखाना बंद व्हायच्या वेळी आल्या. आता माझी छाती पुन्हा धडधड करू लागली. 'डाक्टरजी,' त्यांनी धीर करून विचारायचं ठरवलेलं दिसत होतं. 'एक विचारू ?' मी मानेनंच होकार भरला. 'आपल्याला पेशंटचं रहस्य कळलं तरी डाक्टरलोक दुसऱ्या कुणाला सांगत नाहीत, असं मी ऐकलंय, ते खरं आहे का ?'

'खरं आहे. का हो ?'

'मी आपल्या जीवनातलं एक रहस्य तुम्हाला सांगणार आहे. कुणाला सांगणार नाही असं वचन देता ?'

'दिलं.'

'आणि ते बाळलेणं जरा खाली काढता ?' मी वर चढून लेणं खाली काढून त्यांच्या हाती दिलं. 'तुम्ही परवा विचारलंत की तुमचं एखादं मूल गेलंय का ? आणि मी नाही म्हटलं. पण ते खरं नाही.'

त्याच्या त्या उत्तरामुळं मी काहीसा निराश झालो. ह्या बाईंचं मूल गेलं म्हणजे त्या माझ्या आई असणं शक्य नाही, हे सरळ होतं. पण ते बाळलेणं तर माझंच असं त्यावेळी आश्रमाच्या अधिकाऱ्यांनी मला सांगितलं होतं. माझ्या डोक्यात गोंधळ माजला.

'त्या वेळी मी सोळा वर्षांची होते. आमच्या नात्यातल्या एका मुलाचं आणि माझं प्रेम होतं. तो लबाड नव्हता. पण भित्रा होता. मला दिवस गेलेले पाहून तो पळून गेला. पुढं त्यानं

आत्महत्या केली. आणि ... पुढचं सांगायलाच हवं का ? हे बाळलेणं माझ्या ओळखीचं आहे. नव्हे माझ्याच बाळाचं आहे. तुम्ही ते आश्रमातून आणलंत असं म्हणालात. पण तुम्हाला त्या बाळाची काही माहिती आहे का ? कारण मी वर्षाभरानं आडून आडून चौकशी केली तर ते बाळ गेल्याचं मला कळलं. डाक्टरजी, मी किती दुष्ट आहे हो ? माझ्या काळजाच्या त्या तुकड्याला टाकून दिलं. बाळाचे काय हाल झाले असतील हो ?' असं म्हणून लेणं छातीशी धरून पुन्हा त्या ढसाढसा रडू लागल्या. माझेही डोळे भरून आले. पण बाईंना दिसणार नाही, अशा बेतानं मी हळूच पुसले.

मनोहर, मी तुला लिहितोय इतक्या सहज सगळ्या गोष्टी घडत होत्या, असं नाही. पण पत्रात किती लिहिणार ? आणि कसं लिहिणार? पण त्या अश्रूंत आईवरचा माझा राग मात्र वाहून गेला. तू म्हणाला होतास ते खरं आहे. आई कधी वाईट नसते, मला पटलं.

पण, कदाचित ह्या बाई वेगळ्याच असतील तर ? आश्रमाचे चालक खोटं कशाला सांगतील? त्या सुमारास आणखी एखादं असंच प्रकरण घडलं असणं अशक्य नाही. त्या वेळी तर पटियाळा लहान गाव असणार. त्यामुळं गावात हा एकच अनाथाश्रम असणार. आणि बाळलेणीही सारखी असू शकतात, मी आपल्या मनाला समजावीत होतो. उगीच खोटी आशा बाळगण्यामुळं निराशाच येण्याचा संभव.

'तुम्हाला काही माहिती आहे का ? माझ्या बाळाची ?' थोड्या वेळानं रडं आवरून त्यांनी विचारलं.

'मला कशी माहिती असणार ? अहो, माझा तर जन्मही झालेला नसणार. आणि तुमचं बाळ तर गेलं असं म्हणालात ना ? डीएनएचा अहवाल येईतो मला सावधगिरी बाळगणं जरुरीचं होतं. बाईंच्या चेहऱ्यावरची निराशा लपत नव्हती. पण त्या निराशेच्या पाठीमागं 'आपलं पाप उघडकीस आलं तर!' अशी एक अनामिक भीतीही असावी. थोड्या वेळानं त्या निघून गेल्या.

माझी घरी परतण्याची वेळ नक्की नसे, हे हिला माहीतच होतं. पण त्या दिवशी फारच उशीर झाला, म्हणून तिनं विचारलं. तेव्हा मी तिला सगळी हकीकत सांगितली. 'ती नक्कीच तुमची आई असणार.' ती ठामपणानं म्हणाली. माझीही जवळ जवळ खात्री होती. तरीही मी गप्प राहिलो.

पाचसहा दिवसांनी त्या बाई, त्यांचा मुलगा आणि सून शस्त्रक्रियेची तारीख ठरवायला आल्या. मी मुद्दामच तीन आठवड्यानंतरची तारीख दिली. कोणत्याही परिस्थितीत डीएनएचा अहवाल माझ्या हाती तत्पूर्वी यावा अशी माझी इच्छा होती. आम्ही एकमेकांशी बोलत असताना बाई सतत माझ्याकडे शोधक नजरेनं बघत होत्या. पण, लक्षात येऊनही आपल्याला काहीच लक्षात येत नाही, असं सोंग मी आणीत होतो.

सुदैवानं शस्त्रक्रियेच्या आधी डीएनएचा अहवाल आला. एके दिवशी सकाळची गोष्ट. दहा वाजायला आले होते. नाश्ता संपवून मी खाली हॉस्पिटलात जायची तयारीच करीत होतो. तेवढ्यात, माझ्या मित्राचा डिलिवरी बॉय एक पाकीट घेऊन आला. मी अगदी भीत भीतच ते उघडलं. आणि माझ्या तोंडून काही चमत्कारिक उद्गार बाहेर पडला असावा. हिनं विचारलं. 'काय झालं ?' मी तिच्या हाती अहवाल ठेवला. तिलाही अत्यानंद झाला.

'भाग्यवान आहेस. मी आधीच म्हटलं होतं की नाही ? तुझ्या आईचा शोध लागला. आता काय करणारेस ?'

'काही ठरवलं नाही. आणि अजून बाईंनाही काही कल्पना दिलेली नाही.

'मला वाटतं आपण त्यांना आपल्या घरीच आणू.'

'तुझी कल्पना चांगली आहे. पण, ते काय इतकं सोपं आहे ? त्यांची मुलं त्यांना सोडतील का ?'

□ □

पत्र इथं संपलं होतं. बाकी मजकूर महत्वाचा नव्हता. पुढं काय झालं असेल त्याची उत्सुकता मला स्वस्थ बसू देईना. मनात वेडेवाकडे विचार येऊ लागले. हा आता आपल्या आईशी कसा वागतोय, याची भीती वाटू लागली. म्हणून रजा घेऊन मी पटियाळाला जायचं ठरवलं. पण रजा मिळायलाच पंधरा दिवस लागले. मात्र त्याला पत्र न टाकता मी तसाच गेलो. मला पाहून त्याला नवल वाटलं.

'अरे, मनोहर. अरे मला पत्र तरी पाठवायचं. मी स्टेशनवर नसतो का आलो ?

'ते जाऊ दे. मला सांग पुढं काय झालं?'

तो हसला. आणि 'माँ,' त्यानं हाक दिली. त्यासरशी एक वृद्ध बाई बाहेर आल्या.

'ही माझी आई.' तो म्हणाला. मी त्यांना वाकून नमस्कार केला.

खरं तर सांगायचं ते महत्वाचं सांगून झालं. पण प्रत्यक्षात काय काय झालं. ते जाणून घेण्याची माझ्याप्रमाणंच तुम्हालाही उत्कंठा असणार. तर आता विजयच्या तोंडूनच आपण ते ऐकू.

□ □

विजय सांगू लागला -

शस्त्रक्रियेच्या आधी दोन दिवस बाईंना यायला सांगितलं होतं. हिची नि बाईंची ओळख करून दिलीच होती. तीसुद्धा स्वतःच्या आईसारखी बाईंची सेवा करी. आणि विशेष म्हणजे मुलंही दादीमाँ, दादीमाँ म्हणून त्यांच्याच खोलीत असत.

बाईंची शस्त्रक्रिया चांगली पार पडली. जखमा सुकेपर्यंत म्हणजे आठदहा दिवस तरी राह्यला हवं, असं मी सांगितलं. पण, 'तुम्ही कुणी आला नाहीत तरी चालेल.' मी बाईंच्या मुलाला

म्हणालो, 'आमच्या हिला आणि मुलांना आईंचा खूप लळा लागलाय. तेंव्हा ती सगळं काही पाहील. मधून मधून भेटायला आलात तरी पुरेसं आहे. अगदी काळजी करू नका.'

त्या घरी परत जाण्याच्या आदल्या दिवशी हिनं रात्री त्यांना घरी जेवायला बोलावलं. जेवणं झाल्यावर आणि मुलं झोपी गेल्यावर आम्ही मोठ्या खोलीत बसलो.

'माँजी, तुम्ही मला एक प्रश्न विचारला होतात, आठवतो ?' त्या चमकल्या.

'चांगलाच. तुम्हाला काही माहिती आहे का माझ्या बाळाची. असं विचारलं होतं. पण, त्याचं आता काय ? कारणं मला कसं माहीत असेल असं, तुम्ही म्हणालात.'

'आता तोच प्रश्न पुन्हा विचारता ?'

बाईंच्या मनाची घालमेल त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती. माझा काय हेतू असेल, असं मनात येऊन त्या शोधक नजरेनं माझ्या डोळ्यांत पाहू लागल्या. 'डाक्टरजी, कशाला माझ्या मनावरची खपली काढता ? त्या काळात मी किती दुःख सोसलंय त्याची तुम्हाला कल्पना यायची नाही. आणि अजूनही मी ते विसरू शकत नाही. जाऊ द्या. माझ्या हातून बाळावर केवढा अन्याय झालाय, ते मला कळतंय. बहू' हिच्याकडे वळून त्या म्हणाल्या, 'माझं दुःख तुला कळेल. डाक्टरजींना म्हणावं, कशाला...' त्यांना पुढं बोलवेना.

हिनं मला 'पुरे आता,' अशा अर्थाची खूण केली.

'बरं, तुम्ही नका विचारू. पण, तुम्ही तो प्रश्न विचारला आहे असं समजून मी उत्तर दिलं तर ?'

'काय ?' त्या घाबरल्या.

'मला तुमच्या मुलाची माहिती आहे.'

'काय ?' बाईंनी माझा हात धरला. आणि म्हणाल्या, 'म्हणजे ?'

'बाळ जिवंत आहे.'

'माझं बाळ जिवंत आहे ? मग त्यांनी तसं का सांगावं ?'

'तुम्हाला कशाला हवंय ते आता ? तुम्ही काही त्याला जवळ करू शकणार नाही. समाज तुम्हाला तसं करू देणार नाही. तुमचीच बेअब्रू होईल. त्याला तुम्ही कसं तोंड द्याल ? तुमचं बाळं गेलं असं सांगण्यात आश्रम चालकांचा तोच हेतू असणार.' बाई गप्प राहिल्या. 'त्याला इथल्याच एका सधन कुटुंबानं दत्तक घेतलं. चांगलं शिकवलं आणि आता तो पतियाळा शहरातच राहतोय.'

'डाक्टरजी, कोण आहे तो ? तुमच्या माहितीचा आहे ? मला भेटवाल ? निदान दुरून तरी दाखवाल ? मी दुरूनच पाहीन त्याला.'

'मी त्याला विचारून ठेवीन. पण, तुम्हाला भेटायची त्याची इच्छाच नसली तर?' बाईंची मुद्रा दुःखानं विदीर्ण झाली. मलाही वेदना होत होत्या. पण अजून थोडा संयम राखणं भाग होतं. भावनेच्या आहारी जाऊन काम बिघडलं असतं.

'त्याचा हक्कच आहे माझ्यावर रागावण्याचा. पण, मला एकदा तरी दाखवा हो. मी त्याची क्षमा मागेन. डाक्टरजी. पण माझा नाइलाज होता हो. समाजानं मला जगू दिलं असतं ? तुम्हीच म्हणालात मघाशी. तुला काय वाटतं बहू ?'

मनोहर, मला सारखे तुझे शब्द आठवत होते. खरंय तुझं, आई कधी वाईट नसते.

'कसं सांगू, डाक्टरजी ? शक्य होईल का ते ? माझी मुलं मला काय म्हणतील ?'

'तुम्हाला भेटायची त्याची तयारी आहे. पण तो तुमच्यावर खूप रागावलाय. आपल्याला असं अनाथासारखं जिणं जगायची पाळी आणल्याबद्दल त्याला तुमच्यावर सूड घ्यायचाय.'

'घेऊ दे. त्याचा तो हक्क आहे. पण मी त्याची माफी मागेन. पायां पडेन. पण मला एकदा तरी भेटवा हो.'

'भेटवीन. पण, त्याची एक अट आहे.'

'मला त्याच्या सगळ्या अटी मान्य आहेत. आत्ताच सांगते.'

'अटी न विचारताच ?'

'हो. पण काय अट आहे ? ते तर सांगाल.'

'मागाहून फिरणार नाही ना ?' मी विचारलं. त्यांनी मानेनंच नाही, असं सुचवलं. 'तुम्ही आत्ताच घरं सोडून त्याच्या घरी येऊन राह्यचं.' मानेनंच त्यांनी संमति दिली.

मी उठलो. आईच्या पायापाशी जाऊन बसलो. 'आई तुझ्या अजून लक्षात नाही आलं? अग, मीच...' मला पुढं बोलवेना.

'पुत्तर,' आई भरल्या स्वरांत म्हणाली, 'अरे, तुला पहिल्या दिवशी पाहिलं ना, तेव्हाच माझ्या लक्षात आलं होतं. आणि आज तू प्रश्न विचारलास तेव्हा खात्रीच झाली. पण तुझ्या मनात काय आहे, ते कळल्याशिवाय....'

बस्स. आम्ही तिघंही नंतर कितीतरी वेळ अश्रू ढाळीत होतो.

◆◆◆



# विज्ञानव्यास

## डॉ. आयझॅक ॲसिमोव्ह

*डॉ. आयझॅक ॲसिमोव्ह यांनी स्पर्श केला नाही असा एकही विषय नाही. गणित, खगोलशास्त्रापासून प्राणीशास्त्रापर्यंत सर्व शास्त्रशाखांत त्यांचा संचार होता....*

*अशा या व्यासोपम बुद्धिवान विज्ञान लेखकाचा परिचय आणि त्यांच्या काही विज्ञानकथांचा अनुवाद श्री. निरंजन घाटे यांनी येथे सादर केलेला आहे.*

❐ निरंजन घाटे

आयझॅक ॲसिमोव्ह माझे परात्पर गुरू. त्यांचा गंडा मी कधी बांधला हे मला कळलंच नाही आणि त्यांनाही ते ठाऊक नव्हतं. १९६५च्या सुमारास त्यांची पहिली गोष्ट मी वाचली. त्यानंतर त्यांची 'पेबल्स इन द स्काय' ही कादंबरी वाचली आणि मी त्यांचा फॅन बनलो. त्यांच्याबद्दलच्या आख्यायिकाही वाचू लागलो. आयझॅक ॲसिमोव्ह जिवंतपणीच आख्यायिका बनले होते. हे भाग्य फार थोड्यांच्या नशिबी येतं.

'मी काही नम्र आणि सालस नाही, तेव्हा तसा आव कशाला आणायचा,' असं ते म्हणत असत. २ जानेवारी १९२० मध्ये जन्मलेले ॲसिमोव्ह, स्मोलेन्स्क या त्यांच्या जन्मगावातून वयाच्या तिसऱ्या वर्षी अमेरिकेस जायला निघाले. तो प्रवास ब्रुकलीनमध्ये संपला. त्यानंतर क्वचित एखादा अपवाद वगळता आयझॅकनं असा दीर्घ प्रवास केला नाही. मनानं विश्वसंचार करणाऱ्या आयझॅकला विमान प्रवासाची प्रचंड भीती वाटत असे.

तीन वर्षांचा आयझॅक आई-वडिलांबरोबर ब्रुकलीनला पोहोचला. त्यावेळी इंग्रजी नावाची भाषा अस्तित्वात आहे आणि तिची अमेरिकन नावाची एक उपभाषा आहे, याची त्याला अजिबात कल्पना नव्हती. एकपाठी आणि प्रगल्भ बुद्धिमत्ता यांचे वरदान लाभलेला आयझॅक स्वप्रयत्नानं पाचव्या वर्षी इंग्रजी लिहाय-वाचायला शिकला होताच. त्याला वाचनाचं इतकं वेड लागलं होतं की, खाऊ आणि स्टेशनरीचं दुकान चालवणाऱ्या त्याच्या वडिलांना पोराच्या या वाचनाच्या व्यसनाचा त्रास होऊ लागला. त्यांच्या दुकानात गोळ्या घ्यायला आलेली पोरं गोळ्यांबरोबर साहसकथांची नियतकालिकंही मागत असत. त्यामुळं त्यांच्या दुकानात अनेक मासिकं आणि साप्ताहिकं देखील असायची. इतर वेळी दुकानात गप्प बसलेल्या आयझॅकचा उत्साह नियतकालिकांच्या आगमनप्रसंगी मात्र उतू जायचा; पण वडिलांना ते मानवत नसे; कारण त्यामुळं त्यांच्या हिशेबात गोंधळ होत असे.

'मला वाचनाचा किडा चावला, त्याच काळात आमच्या दुकानात 'अस्टाउंडिंग सायन्स फिक्शन' येऊ लागलं होतं. ते अंक वाचल्यावर मी निश्चय केला. आपण आयुष्यात लेखक बनायचं आणि विज्ञानकथा लिहायच्या !''

दर वर्षी दोन इयत्ता पार करणारा हा पोरगा वर्गात कायम पहिला असे. मासिकं मला अभ्यासाला लागतात, असं तो वडिलांना सांगायचा. त्याच्या शाळेच्या ग्रंथालयातून तो रोज एक पुस्तक आणायचा आणि दुसऱ्या दिवशी ते परतही करायचा. आई म्हणे, 'सारखं वाचून तुझे डोळे खराब होतील.' तर ग्रंथपालबाईंना हा मुलगा चित्र नसलेली पुस्तकं घरी नेऊन करतो तरी काय,' हा प्रश्न पडत असे. त्यांनी त्या पोराला एक दिवस हटकलं. आणि तो प्रश्न विचारला.

'वाचतो!' ते पोरगं शांतपणं म्हणालं.

ताबडतोब आयझॅकनं ग्रंथालयातून नेलेली पुस्तकं बाईंनी तिथं मागवली आणि त्याची परीक्षा घेतली. एका पाठोपाठ एक अशा त्याच्या अचूक उत्तरांनी त्या थक्क झाल्या आणि 'कमाल आहे' असं म्हणत, त्यांनी ती पुस्तक पुन्हा जागेवर ठेवली.

त्यानंतर आयझॅकला ग्रंथालयात अनेक सवलती मिळू लागल्या. वयाच्या चौदाव्या वर्षी शालेय शिक्षण संपवून वडिलांच्या आग्रहास्तव आयझॅकनं वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश अर्ज भरला. पण चौदा वर्षांच्या मुलाला वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश देता येत नाही, या नियमानं आयझॅकची वाट अडवली. त्याचे वडील फार निराश झाले. कायम पहिला नंबर मिळविणाऱ्या आपल्या मुलाची हुशारीच त्याला डॉक्टर बनू देत नाही, म्हणून ते चरफडले. मग आयझॅकनं जीवरसायन शास्त्राची पदवी मिळवायचं मनावर घेतलं. ती घेतल्यानंतर पुन्हा वयाच्या अठराव्या वर्षी त्याला कुणी पीएच.डी. करू देईना. तेव्हा त्यानं भौतिक रसायनात

आणखी एक पदवी घेऊन, त्यानंतर डॉक्टरेटसाठी संशोधन करायला सुरुवात केली.

*अस्टाउंडिंग सायन्स फिक्शन* वाचता वाचता प्रत्येक अंकामधील गोष्टीचं रसग्रहण करून आयझॅक त्या मासिकाला पत्रं पाठवू लागला होता. एकदा अंक उशिरा आला, तर तो स्वतः ब्रुकलीनहून चक्क खाऊसाठी साठवलेले पैसे खर्च करून मॅनहॅटनला जाऊन आला होता. त्यासाठी त्याला बरंच चालावंही लागलं होतं. आठवीत असताना दुसऱ्यांच्या गोष्टी वाचण्याऐवजी आपणच कथा लिहावी आणि आपणच वाचावी, असा एक विचार त्याच्या मनात आला होता. लगेच तेरा वर्षांच्या आयझॅकनं कोरे कागद समोर खेचले. पेन उचललं आणि *'कॉस्मिक कॉर्क स्क्रू'* नावाची कथा लिहायला घेतली. कागद त्यानं वडिलांना न विचारताच घेतले होते. पण ते वडिलांच्या लक्षात आलं नव्हतं.

आता आपणही कथा लिहिणार, ती मासिकाला पाठवणार, लोक ती वाचणार, तिला नावं ठेवणार... आयझॅकची कल्पनाशक्ती नेहमीप्रमाणं भविष्यकाळात धावली. त्याच्या घशाला कोरड पडली. हात कापू लागला. ती गोष्ट तशीच राहिली. त्याच वेळी शाळेत सूचना लागली. शाळेच्या वार्षिकासाठी निबंध/कथा हव्या होत्या. आयझॅकनं धाकट्या भावाच्या जन्माची हकीगत लिहिली. ती छापून आली. तेव्हा आयझॅकनं आणखी एक अंक शिक्षकांकडं मागितला. 'स्वतःला मोठा लेखक-बिखक समजायला लागलास की काय ? कुणीही विनोदी गोष्ट लिहिली नव्हती, त्यामुळं टाकाऊ असूनही तुझी कथा घेतली.'' असं शिक्षक रागावून त्याला म्हणाले. ते ऐकून आयझॅक थक्क झाला. त्यानं तो निबंध अत्यंत गंभीर म्हणून लिहिला होता. आयझॅकच्या आयुष्यात असाच एक धक्कादायक प्रसंग आणखी एकदा आला.

आयझॅक तेव्हा बोस्टन विद्यापीठात सहाय्यक प्राध्यापक होता. त्याची 'नाइटफॉल' ही कथा त्यावेळी प्रचंड गाजत होती. त्याच वेळी इंग्रजी साहित्याचे गाजलेले अभ्यासक आणि समीक्षक डॉ. गॉथार्ड गुंथर, हे विज्ञानकथेवर बोलणार होते. नेहमीप्रमाणं तो शेवटच्या रांगेत बसला होता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे गुंथरनी निरुपणासाठी नेमकी आयझॅकचीच 'नाईट फॉल' ही कथा निवडली. दोन अडीच तास ते विज्ञानकथा या विषयावर बोलले. त्यातला बराचसा भाग 'नाइटफॉल'ला वाहिलेला होता. व्याख्यान संपल्यावर आयझॅक पुढं झाला. गर्दी ओसरायची वाट पाहू लागला. संधी मिळताच गुंथरना म्हणाला, ''सर, तुम्ही 'नाइटफॉल' बद्दल बरंच काही बोललात, पण ही गोष्ट लिहिली, तेव्हा लेखकाच्या मनात, तुम्ही म्हणता तसं काहीच नव्हतं.''

''हे तुला काय ठाऊक ?''

''कारण मी आयझॅक ॲसिमोव. मीच ती कथा लिहिली !'' हे सांगितल्यावर डॉ. गुंथर गडबडून जातील, असं आयझॅकला वाटलं होतं. पण प्रत्यक्षात तसं काही घडलं नाही. त्यांनी आयझॅकला नखशिखांत न्याहाळलं. मग ते म्हणाले, 'बाळ, ती कथा तू लिहिलीस हे खरं. पण त्याचा अर्थ ती तुला उमगली.. असा मात्र होत नाही.''

आयझॅक म्हणतो, ''डॉ. गुंथर यांचं ते धाडस पाहून मी त्यांचा मित्र बनलो.'' त्या दोघांची ही मैत्री अखेरपर्यंत टिकून राहिली.

आयझॅकनं वयाच्या विसाव्या वर्षी 'नाइटफॉल' लिहिली होती. त्याचवेळी तो डॉक्टरेटसाठी संशोधन करू लागला होता. युद्धानंतर आयझॅकनं लग्न केलं आणि तो पीएच.डी. मिळवायच्या मागं लागला. प्राध्यापकी चालूच होती. डॉक्टरेट मिळाली. आयझॅकच्या नावावर एक जीवरसायनशास्त्राचं पाठ्यपुस्तक जमा झालं. *'पेबल्स इन द स्काय'* मुळं आघाडीचा विज्ञानकथाकार म्हणून त्याला कीर्ती मिळाली. लेखन चालू होतं. पीएच.डी.साठी विद्यार्थ्यांच्या रांगा लागल्या होत्या. पण आयझॅकचं मन त्यात रमत नव्हतं. अखेरीस १९५८ च्या सुमारास आयझॅकनं पूर्णवेळ लेखनास वाहून घ्यायचा निर्णय घेतला आणि नोकरीचा राजीनामा दिला.

प्राध्यापकी सोडल्यानंतर आयझॅक दिवसाचे सोळा तास लिहू लागला. कसंतरी खाणंपिणं उरकून तो सतत टाइपरायटर बडवत बसे. अर्थात त्याच्या लेखनाला खूप मागणीही होती. ''प्राध्यापक असतांना इथं लिहू की नको, असा विचार माझ्या मनात येई. माझ्या लेखनामुळं मिळालेली प्रसिद्धी अनेकांना डाचत असे. नसती कटकट नको. म्हणून मी काही ठिकाणी नकार देत असे;'' असं म्हणणाऱ्या आयझॅकनं प्लेबॉय, पेंटहाऊस पासून विमान कंपन्यांच्या इन-फ्लाइट मॅगेझिनपर्यंत सर्वत्र संचार केला.

आयझॅकनं स्पर्श केला नाही, असा विषय नाही. गणित, खगोलशास्त्रापासून प्राणीशास्त्रापर्यंत सर्व शास्त्रशाखांत त्याचा संचार होता. ॲनोटेटेड बायबल, म्हणजे सटीक बायबल, द्विखंडात्मक चरित्रकोश, वात्रटिकांचे चार संग्रह, सटीक शेक्सपीअर, अमेरिकेचा इतिहास, ग्रीक आणि रोमन पुराणकथा हे विषय आयझॅकनं हाताळले. चूकभूल देणे घेणे. एकादा विषय सुटला असेल. आयझॅकनं रहस्यकथा लिहिल्या. पॉल फ्रेंच या नावानं मुलांसाठी लेखन केलं. त्याच्या वात्रटिकांसंबंधी एक किस्सा सांगण्यासारखा आहे. 'ऑम्नी' या नियतकालिकानं वात्रटिकांची (लिमेरिक्स) स्पर्धा लावली होती. त्यात आयझॅकचा तिसरा क्रमांक आला. आयझॅकला त्याचाही आनंद झाला. तो म्हणाला, ''चला, या निमित्तानं माझ्यापेक्षा अधिक वाह्यात अशी दोन माणसं या भूतलावर वावरताहेत हे तरी कळलं. त्यामुळं मला बरं वाटलं.'' आयझॅकची त्याच्या समकालीन विज्ञान लेखकांशी मैत्री होती. आर्थर क्लार्क हा त्याचा मित्र. त्याच्याबद्दल आयझॅक म्हणे : ''तो तर म्हातारा आहे. त्याचा जन्म १९१७ चा ! म्हणजे तो माझ्यापेक्षा कितीतरी आधी जन्मलाय. शिवाय त्याला टक्कलही आहे. माझ्यासारख्या तरुणाशी त्यानं स्पर्धा करू नये, हे मी त्याला नेहमीच सांगतो.''

या दोघांचा 'ट्रीटी ऑफ पार्क ॲव्हेन्यू' हा सर्व विज्ञानकथाकारांना मान्य असलेला करारही असाच मजेशीर होता. एकदा न्यूयॉर्कमध्ये टॅक्सीतून प्रवास करताना या दोघांनी हा करार केला

होता. या करारानुसार ''आयझॅक ॲसिमोव हा पृथ्वीवरला सर्वश्रेष्ठ 'लोकार्थी विज्ञानलेखक' होता, (दुसरा क्रमांक अर्थातच आर्थर क्लार्कचा), तर आर्थर क्लार्क हा पृथ्वीवरचा सर्वश्रेष्ठ 'विज्ञान कथालेखक' होता. (दुसरा क्रमांक अर्थातच आयझॅकचा)''

आयझॅक म्हणायचा, ''खरं तर या करारात माझ्यावर अन्याय झालाय. पण मी सभ्य माणूस असल्यानं या कराराबद्दल बोलत नाही. आर्थरचं तसं नाही. माझ्या पश्चात तो माझी जागा घ्यायचा प्रयत्न करतो.

''मी विनम्र नाही, पण भलतेसलते गुण चिकटवून घेणंही मला मान्य नाही'', असं आयझॅक नेहमी म्हणत असे. बरेच समीक्षक आणि विज्ञानकथांचे अभ्यासक आयझॅकच्या कथांमधून बरेच वेगवेगळे अर्थ काढीत असत. त्यावर आयझॅक म्हणे, ''त्यांचं काम ते करतात. माझं काम मी करतो. मला गोष्ट सांगणं आवडतं. मी लिहीत जातो. त्यात असा गूढ, सखोल अर्थ असेल आणि तो कुणाला समजत असेल, तर त्याला मी काही हरकत घेऊ शकत नाही.''

आयझॅकची सोपी आणि सुटसुटीत भाषा, लेखनाचा वेग हे खरोखरच आश्चर्यकारक होतं. त्यानं प्रचंड लिहिलं. शिवाय भयकथा, गूढकथा, विज्ञानकथा, फँटसी अशा जगानं ओवाळून टाकलेल्या कथा प्रकारांचे संग्रह संपादित केले. ॲसिमोव्हनं त्याच्या कल्पनेतून 'लॉज ऑफ रोबोटिक्स' निर्माण केले. आज यंत्रमानव निर्मिती आणि बुद्धिमान यंत्र बनवायचे प्रयत्न यांना जोर आहे. त्यावेळी या कायद्यांच्या भोज्याला शिवल्याशिवाय या विषयातलं कुठलंही चर्चासत्र पुढं सरकत नाही. सुसान कॅल्विन ही यंत्रमानस शास्त्रज्ञ आणि आयझॅकचे यंत्रमानव, हॅरी सेल्डन हा गणिती आणि त्यानं निर्माण केलेलं मानसेतिहास हे शास्त्र, एलिजा बेली आणि आर. डॅनील ऑलिव्हा हा यंत्रमानव, या जोड्या आता लोककथा (फोकलोअर) बनल्या आहेत. *अग्ली लिटल बॉय*, ही ॲसिमोव्हची कथा वाचताना रडू आवरणं अवघड जातं. ती कथा वाचून संपवताना डोळ्यातले अश्रू पुसणं अपरिहार्य असतं. अत्यंत तर्कशुद्ध लिहून वाचकाला अश्रू पुसायला लावणारा आयझॅक ॲसिमोव्ह हा एकमेव लेखक असावा.

ॲसिमोव्हनं फौंडेशन माला लिहिली. ती लिहून पूर्ण झाल्यानंतर त्यानं प्रिल्यूड टु फौंडेशन आणि फॉरवर्ड द फौंडेशन या कादंबऱ्या लिहून 'आधी कळस, मग पाया रे!' ही उक्ती सार्थ केली. 'फौंडेशन, सेकंड फौंडेशन अँड सेकंड एम्पायर, आणि 'फौंडेशन एज' या चार कादंबऱ्यात खरं तर त्यांची 'भविष्यकालीन इतिहास मालिका' संपुष्टात आली होती. गिबनच्या '*डिक्लाईन अँड फॉल ऑफ रोमन एम्पायर*' वरून ॲसिमोव्हला या भविष्यकालीन इतिहासाची कल्पना सुचली होती. त्या चार कादंबऱ्या लिहून झाल्यानंतर त्याने कादंबऱ्यांची पूर्वपीठिका असलेल्या विश्वसाम्राज्या संबंधी दोन कादंबऱ्या लिहिल्या.

''मला इतरांपेक्षा जास्त गोष्टींबद्दल इतरांपेक्षा जास्त माहिती आहे, याचा अर्थ मी सर्वज्ञ आहे, असा होत नाही,'' असं ॲसिमोव्ह म्हणत असे. 'मला माहित नसलेल्या



अनेक विषयांचीही मी यादी करतो. याचा अर्थ मी अज्ञानी आहे, असाही नाही.'' असं म्हणणाऱ्या ॲसिमोव्हला 'अमेरिकेचा राष्ट्रीय ठेवा' मानण्यात येत होतं. त्यानं कुणापेक्षाही जास्त विषयांवर भरपूर लिहिलं. एवढंच त्याचं महत्व आहे का ?'', या प्रश्नाचं उत्तर त्याच्या मृत्युलेखात आहे. ''ॲसिमोव्हने जीव रसायनात बुद्धी चालवली असती. तर कदाचित त्याला नोबेल पुरस्कारही मिळाला असता. पण मग अमेरिका अनेक शास्त्रज्ञांना मुकली असती.'' ॲसिमोव्हनं त्याच्या हयातीत ४८६ पुस्तकं लिहिली. त्याचं अखेरचं 'आय ॲसिमोव्ह' (आणि त्याबरोबर आणखी तीन-चार पुस्तकांची)ची मुद्रितं तपासण्यापूर्वी त्याचं निधन झालं. त्याचं लेखन वाचून विज्ञानाकडं वळलेल्या अमेरिकन शास्त्रज्ञांची संख्या फार मोठी आहे.

अशी ही जिवंतपणीच दंतकथा बनलेली व्यक्ती ६ एप्रिल १९९२ रोजी आपल्यातून गेली; तेव्हा विज्ञान लेखनाचं विश्व खरोखरच पोरकं झालं.

◆◆◆



'सरकारी खात्याने तयार केलेला दिसतोय !'

व्यंगचित्र : सारंग यावलकर

*'ते आपल्यावर नजर ठेवून आहेत. आपण अणुशक्तीचा संहारक उपयोग करू लागलोय. अग्नीबाणांची निर्मिती करतोय. त्यामुळे ते धास्तावलेत. त्यांच्या ग्रहासारखं वातावरण फक्त हिमालयात खूप उंचीवरच आढळतं.'*

*'कुठल्या ग्रहावरून आलेत ते ?' मी विचारलं...*

# एव्हरेस्टवरचे पाहुणे

**❒ मूळ कथा : आयझॅक ॲसिमोव्ह**

**मराठी अनुवाद : निरंजन घाटे**

ही तशी नेहमीचीच रड झाली आहे. एखाद्या महत्वाच्या घटनेचे पुरावे नाहीसे होतात आणि नंतर त्या घटनेवर कुणीच विश्वास ठेवत नाही; पण या गोष्टी खऱ्या असतात. इ.स. १९५२ मध्ये गिर्यारोहक एव्हरेस्टवर जायचा नाद सोडून द्यावा असा विचार करू लागले होते. पण त्या काळात काही छायाचित्रं प्रसिद्ध झाली होती त्यामुळेच एव्हरेस्टवरच्या मोहिमाही चालू राहिल्या आणि त्यांना पैसेही मिळत राहिले.

तसं बघायला गेलं तर ही छायाचित्रं काही नाव घेण्यासारखी उत्कृष्ट नव्हती. नावाजलेल्या छायाचित्रकारांनी काढलेली नव्हती. त्या काळात कॅमेरेही अगदी बाळबोध स्वरूपाचे होते; पण या अस्पष्ट फोटोत काही ठिपके दिसायचे आणि ठिपके सजीवांचेच आहेत असं ते छायाचित्रकार शपथेवर सांगायचे. त्यावर विश्वास ठेवूनच अर्थात लोकांनी मग आपल्या मोहिमा चालू ठेवल्या होत्या. आमच्या मित्रमंडळीत जिमी रोबॉन्स हा गिर्यारोहक होता. गिर्यारोहण हे त्याचं व्यसनच होतं. तिबेटमधलें लोक देवांची वस्ती असल्यामुळे एव्हरेस्टवर जात नाहीत अशी माहिती तो द्यायचा. पंचवीस हजार फूट उंचीवर सापडलेले पावलांचे ठसे, दिसलेले मानव सदृश प्राणी या सर्वांची त्याला माहिती असायची. तिथल्या तळाची तपासणी करणारे हे प्राणी कोण असावेत याबद्दलही जिमी तावातावाने चर्चा करायचा. आजही त्याच्या हातात असंच एक छायाचित्र होतं.

'बॉस, हे बघा ! ते तिथे आहेत, हे या छायाचित्रात निःसंशय दिसतंय. ते अतिशय चपळ आहेत हेसुद्धा यावरून सिद्ध होतं. अगदी माणसासारखे दिसतात ते, हे बघा, इथे हे चित्र पुसट झालंय. कारण तो खूप जोरात पळतोय !'



'कॅमेरा हलला असेल.'

'बाकीचं छायाचित्र स्पष्ट आहे. शिवाय ज्याने ते छायाचित्र घेतलं तो शपथेवर सांगतोय.'

'पण त्या उंचीवर इतक्या विरळ हवेत इतक्या चपळपणे कोण हालचाल करील ? शिवाय थंडी, वेगवान वारे यांचा विचार केलास का ?' बॉसनी विचारलं.

'बॉस, नथिंग इज इंपॉसिबल ! हे वाक्य तुम्हीच आम्हाला वारंवार ऐकवता. सागर तळातून काही विचित्र दिसणारे आंधळे मासे सापडले तेव्हा हेच म्हणालात. साडेतीन कोटी वर्षांपूर्वी नाहीसा झालेला 'सिलकांथ मासा' सापडला तेव्हाही हेच ऐकवलंत आणि आता तुम्हीच 'हे अशक्य आहे' असं म्हणताय.' जिमी तणतणला.

'आपण काहीतरी करायला हवं !' मी म्हणालो.

'काय करणार ? गेली ४० वर्षे माणूस एव्हरेस्टवर चढायचा प्रयत्न करतोय. पण ते जमत नाही ना.' जिमी म्हणला.

'खुळ्या, तुम्ही सगळे गिर्यारोहक हे असेच. कधी डोकं चालवाल तर शपथ. तुम्हाला स्वतःच्या अपयशाचं कौतुक करण्यात खूप मजा येते. एव्हरेस्टवर जायचे इतरही मार्ग आहेत.'

'तोफेत डागून माणूस उंच उडवायचा की काय ?'

'जिमी, राइटबंधूंनी १९०३ साली एक शोध लावला. त्या यंत्राला विमान म्हणतात. त्यात खूप प्रगती झालीय बघ !'

'पण तो माणूस जगेल का ?'

'त्याला खास कपडे, ऑक्सिजन सिलिंडर्स आणि अन्न पुरवठा द्यायचा अशी ती कल्पना साकार व्हायला काही महिने जावे लागले. हवाई दल, विविध शासनयंत्रणा हलवणे, यामध्ये एवढा काळ जायचाच. जिमी रोबॉन्स मग एव्हरेस्टवर उतरला. तो उतरला आणि थोड्याच वेळात एव्हरेस्टला वादळानं वेढलं. त्याच्याकडे तीन दिवस पुरेल एवढा शिधा आणि ऑक्सिजन होता. आता दोन आठवडे होऊन गेले होते. जिमीच्या मृत्यूस आपण कारणीभूत झालो या कल्पनेने मी खचलो होतो. दोन आठवड्यानंतर विमानोड्डाणास योग्य परिस्थिती निर्माण झाली. जिमीचा देह कुठे दिसतोय का हे पहायला पुन्हा विमानाने एव्हरेस्टवरून उड्डाण केलं. त्यांना जिमीचा मृतदेह मिळाला नाही. त्याऐवजी त्यांना धूर दिसला. त्यांनी दोराची शिडी खाली सोडली, तिला धरून जिमी वर आला. विमानातून परतला.

गेल्या आठवड्यात मी जिमीला भेटायला रुग्णालयात गेलो. तो हळूहळू सुधारत होता. खूप दमला होता शिवाय त्याला मानसिक धक्काही बसला होता. आम्ही सुरुवातीपासूनच ही मोहीम गुप्त ठेवली होती, त्यामुळे त्याला त्रास द्यायला कुणी वार्ताहरही उपस्थित नव्हते, मी जिमीला जवळून ओळखत होतो.

'जिमी ! नक्की काय झालं ?'

'काहीच नाही !'

'हे बघ जिमी. मी कुणालाही काहीही सांगणार नाही ! आपल्या मैत्रीची शपथ ! आणि हे बघ ! तू दोन आठवडे एव्हरेस्टवर राहिलास जगलास, एका हिमवादळाला तोंड दिलंस ! हे तुला एकट्याने निभावून नेणं शक्यच नव्हतं. आपला ऑक्सिजन पुरवठा तर फक्त तीन दिवसांपुरता मर्यादित होता.'

जिमीचे डोळे चमकले. तो हसला.

'मी त्यांनाही हेच म्हटलं, तुला फसवणं शक्य नाही. बॉस ते अतिशय बुद्धिमान आहेत. त्यांनीच माझी काळजी घेतली. त्यांचं तंत्रज्ञानसुद्धा प्रगत आहे. विमानाला खुणावण्यासाठीचा धूर त्यांनीच निर्माण केला.'

'ते खाली येऊ शकत नाहीत तर ?'

'ते आहेच आणि आपण एव्हरेस्टवर पोहोचू शकत नाही. मात्र एकदा आपल्यासारखा माणूस तिथं पोचला की ते निघून जाणार.'

'पण ते कोण आहेत, कशासाठी आले आहेत ?'

'ते आपल्यावर नजर ठेवून आहेत. आपण अणुशक्तीचा संहारक उपयोग करू लागलोय. अग्निबाणांची निर्मिती करतोय. त्यामुळे ते धास्तावलेत. त्यांच्या ग्रहासारखं वातावरण फक्त हिमालयात खूप उंचीवरच आढळतं.'

'कुठल्या ग्रहावरून आलेत ते ?'

'इतकं कमी तापमान आणि इतकी विरळ हवा कुठल्या ग्रहावर आहे बॉस ? फक्त मंगळावरच. नाही का ?'

यावर काही बोलण्यासारखं नव्हतंच. त्यामुळे पाळलेल्या गुप्ततेचा आम्हाला फायदाच झाला.

◆◆◆

*टीप :*
*ही कथा ॲसिमोवनी जानेवारी १९५३ मध्ये लिहिली.*
*त्यानंतर ५ महिन्यांनीच म्हणजे २९ मे १९५३ ला*
*मानवाने एव्हरेस्टवर पाऊल ठेवलं. तरीही ही कथा*
*डिसेंबर १९५३ मध्ये 'युनिव्हर्स' या मासिकात छापून आली.*



***पृथ्वीवरचा दुसरा बुद्धिमान प्राणी म्हणजे आपण मानव.***
***आपण कशाने नाहीसे होणार ?***

# आणि प्रोफेसर रडू लागले

❒ **मूळ कथा : आयझॅक ॲसिमोव्ह**
**मराठी अनुवाद : निरंजन घाटे**

या घटनेवर तुम्ही विश्वास ठेवणार नाही हे मला ठाऊक आहे, पण जे घडलं ते मानव जातीच्या दृष्टीने महत्वाचं आहे याची मला कल्पना आहे. म्हणूनं माझ्या छातीवरचं ओझं उतरावं, या एकाच कारणासाठी मी ही हकीकत सांगतोय.

त्या दिवशी आम्ही तिघं पीत बसलो होतो. आम्ही तिघं म्हणजे मी, सुबोध आणि अरुण. त्यामुळे आमच्या गप्पा अर्थातच विज्ञानकथेभोवती रेंगाळल्या होत्या. अरुण पीत नाही, त्याची कसर तो धूम्रपानाने भरून काढतो. त्याने निर्माण केलेल्या धुराचा त्रास विसरायला आम्ही पीत राहतो. त्या दिवशी बोलता बोलता विजय कालयंत्राच्या करामतींकडे वळला. कालयंत्राचा वापर करण्याची कल्पना वापरून अनेक देशीविदेशी कथाकारांनी एवढ्या कथा लिहिल्या पण आजमितीस दुनियेत कालयंत्र अस्तित्वात येऊ शकलेलं नाही. खरंच जर कालयंत्र अस्तित्वात आलं तर काय धमाल येईल, असं काहीतरी आम्ही बहुधा बोलत होतो. त्या वातावरणात त्या रे.प.रूम (रेस्टॉरंट परमिट रुम) मध्ये नक्की आपण काय बोललो हे आठवणं तसं अवघडच.

तर काय सांगत होतो, आमचा विषय कालयंत्राभोवती रेंगाळला होता. तेवढ्यातच एक आवाज आला.

'एक्सक्यूज मी ! माझं बोलणं ऐकायला आपल्याला फुरसत होईल का ?' सुरात कानडी हेल होता.

आता रे-प-रुममध्ये असे अनेकजण भेटतात. काहीजण एखादा पेग फुकट मिळेल याआशेने काही बाता मारतात तर काहीजण त्यांची दर्दभरी कहाणी ऐकावी म्हणून आम्हालाच दारु पाजतात, नाना पिअक्कडांच्या नाना तऱ्हा, असं कुणीसं म्हटलंच आहे. दर वेळेला काहीतरी नवं ऐकायला मिळतं म्हणून आम्ही अशा व्यक्तींची विनंती कधीही अव्हेरत नाही.

'या ना ! बसा !' अरुणने रिकाम्या खुर्चीकडे निर्देश करीत म्हटलं. बोलणारा माणूस वार्धक्याकडे झुकलेला होता. बरेचसे केस पांढरे शुभ्र झालेले. डोळ्यांवर चष्मा. काहीसा बुटका पण ताठ.

'तुम्ही लोक कालयंत्राबद्दल काही बोलत होता ना ?' बसता बसता त्या व्यक्तीने विचारलं. 'थँक्स !' बसल्यावर ते गृहस्थ म्हणाले. आम्ही दोन्ही विधानांना एकत्रच मान डोलावली.

'हे डायनोसॉर पृथ्वीवरून कसे नाहीसे झाले असावेत ?' त्यांनी विचारले.

'त्याबद्दल बरेच वेगवेगळे सिद्धांत आहेत ! तुम्हाला कुठला ऐकायचाय ?' सुबोधने विचारलं.

तेव्हा ते गृहस्थ 'काय खुळचट माणूस आहे हा ?' असं सुबोधकडे बघत हसले. ते म्हणाले, 'तुम्ही कालयंत्राबद्दल काय म्हणत होता? त्यात बसून तुम्ही डायनासॉराचं काय झालं ते बघायला जाऊ शकला असता.'

'तुम्ही कालयंत्र बांधून दिलंत की लगेच आम्ही निघालोच त्या दौऱ्यावर !' अरुण धूर सोडत म्हणाला. सुबोधने त्याच्या पाकिटातून एक सिगरेट घेतली. आमच्या तिघात सुबोध हुशार होता, मोठमोठ्या प्रकाशकांकडून त्याची पुस्तकं निघत होती. त्यामुळे त्याचा अपमान सहन करणं आम्हाला शक्यच नव्हतं

'बांधायला काहीच हरकत नाही, पण मी ते 'पाप' करणार नाही. कारण दोनच वर्षांपूर्वी मी तो उद्योग केला. मेसोझुइकच्या अखेरच्या वेळी तिथे पोहोचलो.

तो माणूस गेल्यानंतर मी सुबोधला मेसोझुइक म्हणजे काय ते विचारलं. त्या काळात पृथ्वीवर डायनोसॉरसांचं राज्य होतं. म्हणजे २४ कोटी वर्षांपूर्वी सुरू झालेल्या आणि ६ कोटी वर्षांपूर्वी संपलेल्या या डायनोसॉर युगाला भूशास्त्रज्ञ डायनोसॉर कल्प म्हणतात.

तो माणूस खुळा असावा, त्यातच मद्यप्राशन केल्यामुळे त्याच्या आधीच तल्लख कल्पनाशक्तीस धार चढलेली असावी, असा आम्ही तर्क केला. आम्ही तिघेही तसे लेखकच, त्यामुळे गोष्ट लिहायला ज्यांच्याकडून मसाला मिळण्याची शक्यता असते, त्यांचं बोलणं अगदी वृश्चिकदंश झाल्यासारखं असलं तरीही आम्ही त्यांना अव्हेरत नाही.

आम्ही नेत्रपल्लवीनं या गृहस्थाचं म्हणणं ऐकायचं निश्चित केलं आणि त्यांच्या ग्लासात आणखी मद्य ओतलं. बाटली त्याचीच असल्याने तो कितीही प्यायला तरी आम्हाला काहीच फरक पडत नव्हता.

'मग डायनोसॉरसांचा शेवट कसा झाला, हे तुम्ही बघितलंच असेल.' मी विचारलं.

'हो ना ! आणि म्हणूनच ते यंत्र मी मोडून टाकलं.'

'मोडून टाकलं ?' आम्ही तिघांनीही एका सुरात विचारलं. आमच्या सुरात अर्थातच आश्चर्य होतंच.



'अहो, पण का ?'

त्यांनी याच काय पण इतरही अनेक प्रश्नांची उत्तरं द्यायचं टाळलं. त्यांनी स्वतःचं नाव सांगितलं नाही. कुठल्यातरी विद्यापीठात त्यांनी मुलीच्या मदतीने ते यंत्र तयार केलं होतं म्हणे. त्यामुळे आम्ही त्यांना प्रोफेसर म्हणू लागलो. त्यांच्या मुलीबद्दलही ते फारसं काही बोलले नव्हते. आम्हीही मग खोलात जाऊन त्यांना फार काही विचारलं नव्हतं. शिवाय तेव्हा आमच्यापैकी कुणाचीही कुणी कालयंत्र तयार करू शकेल यावर फारसा विश्वास ठेवायची मानसिक तयारी नव्हती. प्रोफेसरनी आमच्या 'पण का?'चं उत्तर द्यायचं टाळलं, हे लक्षात आल्यावर सुबोधने म्हटलं,

'मग निदान डायनोसारसांच झालं तरी काय, ते तरी सांगा !' या पृच्छेला उत्तर द्यायलाही प्रोफेसरांनी तसा वेळच लावला.

'माझं कालयंत्र सिद्ध झाल्यावर माझ्या मुलीने मला पाच सहा वेळा तरी मेसोझुइकमध्ये पाठवलं. काही वेळा अगदी थोडा काळ तर काही वेळा तास न तास मी तिथे वावरलो. तिथे वावरण्यात धोका तर होताच कारण तेव्हा युद्ध चाललं होतं. 'ग्रेट वॉर' म्हणायचे त्याला. युद्धाचा पहिला बळी...' प्रोफेसरांनी परत अंतराळात नज़र लावली. ते असंच बोलायचे. त्यामुळे त्यांच्या बोलण्याचा अर्थ लावणं अवघड व्हायचं.

खूप उकाडा, भरपूर सूर्यप्रकाश, कुठंही दलदल आढळली नाही मला. हे आजचे शास्त्रज्ञ म्हणतात, तसं त्या अखेरच्या काळांत क्रिटेशिअसमध्ये काहीच नव्हतं. डायनोसॉरांची अखेर जवळ आली होती. तेव्हा मला ते छोटे छोटे डायनोसॉर दिसले. त्यांच्या हातात 'लेझरगन' होत्या. त्याही छोट्याच पण पहाडाएवढ्या प्राण्याला सहज झोपवणाऱ्या. अगदी कायमच झोपवणाऱ्या.

छोटे डायनोसॉर, लेझरगन, आम्हाला काही उमगेना. आम्ही एकमेकांकडे बघितलं. प्रोफेसर टेबलावर डोकं ठेवून निपचित. अरुणने त्यांना बसतं करत विचारलं, 'कुठले छोटे प्राणी, कसल्या बंदुका, काय बोलताय?'

'ते डायनोसॉरच होते. पण त्यांच्या कमरेला पट्टे होते आणि हातात संहारक अस्त्रं होती. कोट्यावधी... छोटे छोटे... चार ते पाच फूट उंचीचे, दोन पायांवर चालणारे डायनोसॉर !'

त्याचा काही पुरावा ? एवढे सांगाडे सापडले पण कुठं हत्यारं सापडली नाहीत.' सुबोध म्हणाला.

'साडेसहा कोटी वर्षे लोटली. त्यानंतर लाव्हाचे महापूर आले. कदाचित यांच्याच बॉंबनी. जे ऊर्जानिर्मिती अस्त्रं वापरतात, त्यांचे बॉंब केवढे असतील. एवढ्या प्रचंड काळात कातडी पट्टे कुजून जातात, हत्यारांची गंजून माती होते.'

'ते एवढे सामर्थ्यवान होते असं तुम्ही म्हणताय तर मग ते नाहीसे कशाने झाले ?' अरुणने

विचारलं.

प्रोफेसरांनी अरुणकडे सखेद आश्चर्याने बघितलं.

'पृथ्वीवरचा दुसरा बुद्धिमान प्राणी म्हणजे आपण मानव. आपण कशाने नाहीसे होणार? त्याच कारणाने तेही नाहीसे होणार? पृथ्वीवरचे पहिले बुद्धिमान प्राणी आपापसात लढून, एकमेकांचा नाश करून पृथ्वीवरून नाहीसे झाले. आपण होणार तसेच.'

आणि प्रोफेसर रडू लागले.

◆◆◆

'अपघाताने याच्यातील ऑईल वाहून गेलेय्. याच्या ऑईलशी मॅच होणारा रोबो तुम्ही आणायला हवा. त्याचं ऑईल घेऊं!'

व्यंगचित्र : सारंग यावलकर





**'पार्किन्सन तुला झालंय तरी काय, 'त्या' गुन्ह्यासाठी अज्ञातवासाची शिक्षाच योग्य आहे असं नाही तुला वाटत ? 'अज्ञातवास' हा शब्द कानी पडताच डौलींग दचकला....**

# तडीपार

❒ मूळ कथा : आयझॅक ॲसिमोव्ह
मराठी अनुवाद : निरंजन घाटे

''पूर्वीच्या काळी लोकांना काळ्या पाण्याची शिक्षा देत. रशियन लोकांना सैबेरियात पाठवण्यात येत असे. पृथ्वीवरच्या प्रत्येक देशाने अशा काही जागा शोधल्या होत्या. फ्रेंच मंडळी त्यांच्या कैद्यांना 'डेविल्स आयलंड' वर पाठवीत असत. तर ब्रिटिशांनी आपले कैदी ऑस्ट्रेलियात पाठवले होते.' असं म्हणत म्हणत डौलिंगने आपल्या समोरच्या बुद्धिबळाच्या पटावर हात नेला आणि हत्ती उचलावा की न उचलावा या विचारात तो थबकला. पार्किन्सनचं त्या पटाकडे आणि डौलिंगच्या बोलण्याकडेही फारसं लक्ष होतं असं वाटत नव्हतं.

पार्किन्सनचं आज खेळात लक्ष नव्हतं. परिस्थितीच तशी होती. डौलिंग याही परिस्थितीत बुद्धिबळ खेळतोय याचा त्याला मनातून रागच आलेला होता. डौलिंग खरं तर त्याच्यापेक्षाही अस्वस्थ असायला हवा होता. तो तर फिर्यादी पक्षाचा वकील होता. फिर्यादी पक्षाच्या संगणकाला भरवायच्या माहितीचा कार्यक्रम तोच तर तयार करीत होता.

आत संगणकांबरोबर काम करणारी माणसं संगणकांचे काही गुण आपलेसे करण्याची शक्यता असते. पण म्हणून एखादी व्यक्ती इतकी भावनाशून्य कशी बनू शकते हे पार्किन्सनला उमगत नव्हतं. अत्यंत तर्कदुष्ट वागणूक ही संगणकाची खासियत डौलिंगनेही आपलीशी केली होती. त्याच्या शिस्तबद्ध राहणीतून अतिव्यवस्थित पेहेरावातूनही हे स्पष्ट होत होतं.

आरोपीचा बचाव संगणकासाठी तयार करून तो संगणकाला भरवणं हे पार्किन्सनचं काम होतं. बरेचदा पार्किन्सनच्या मनात या आरोपीबद्दल सहानुभूती निर्माण व्हायची आणि तो मग खिन्न मनस्थितीत वावरत असे, आताही त्याचं त्यामुळेच समोरच्या डावाकडं लक्ष नव्हतं.

''डौलिंग, अज्ञातवासाची शिक्षा परंपरेने चालत आलीय त्यामुळे त्या शिक्षेला क्रूर शिक्षा म्हणता येणार नाही. तुझं म्हणणं मला अजिबात पटत नाही बघ!' पार्किन्सन म्हणाला.

'ती क्रूर नाही असं माझं म्हणणं नाही पण त्या शिक्षेचा धसकाच असा आहे की त्यामुळे गुन्हे कमी व्हायला मदतच होते.'' असं म्हणत डौलिंगने आपला हत्ती हलवला.

पार्किन्सनचं तिकडे लक्ष नव्हतं. त्याने वर बघितलं. बाहेर काळकुट्ट ताऱ्यांनी झगमगणारं आकाश असेल पण त्याचा त्या आकाशाशी संबंधच नव्हता. या संगणक कक्षात तो कसा आरामात बसला होता. कितीतरी वर्षात त्याने आकाश बघितलं नव्हतं की चंद्राची कोर बघितली नव्हती. आज काय असेल पौर्णिमा की अमावस्या? जाऊ द्या आपल्याला काय करायचंय त्याच्याशी? या विचाराने त्याने मान हलवली. एकेकाळी माणूस त्या आकाशाखाली मुक्तपणे वावरत होता. पण त्याला आता शेकडो वर्षे उलटून गेली होती. आता कुणीही कुठेही अवकाश प्रवास करून जात होतं. सौंदर्य बघायला वेळ कुठं होता? बरं 'ते' नावही कुणी घेत नव्हतं. ते, ती, तो मनाला येईल ते सर्वनाम लोक वापरत पण ते नाव उच्चारायचं टाकत असत. बरेचदा तर नुसतीच आकाशाकडे मान फिरवून खुणेनेच काय तो संदर्भ दिला जात होता.

''तुला असं नाही का वाटत म्हणजे त्यांना मृत्यूदंड द्यावा, या अज्ञातवासापेक्षा तो कितीतरी पटीने चांगला ठरेल बघ.''

''पार्किन्सन, तुला झालंय तरी काय? कुठल्या गुन्ह्याबद्दल आपण बोलतोय. यंत्रसामुग्रीचा घातपात करणं या गुन्ह्यासाठी या अज्ञातवासाचीच शिक्षा योग्य आहे, हे तुझ्या लक्षात कसं येत नाही ?''

''पण त्याने तर ते रागाच्या भरात केलेलं कृत्य होतं. त्यावेळी त्याला कसलंच भान राहिलेलं नव्हतं. त्याने कुठल्याही मानवाला कसलीही इजा केली नव्हती.''

''त्याने काय फरक पडतोय ! यंत्राला इजा म्हणजे संपूर्ण वसाहतीलाच धोका, हे तुझ्या लक्षात कसं येत नाही?''

पार्किन्सनने घोड्यासमोरचं प्यादं पुढे टाकलं. डौलिंगने ती चाल ओळखली. तो हसला. पार्किन्सनचा डाव त्याच्यावरच कसा उलटवून टाकावा याचा तो विचार करू लागला. विचार करता करता बोलला. ''हे बघ आपण आता अवकाशातली एक प्रगत जमात बनलोय. मागास संस्कृतीचा लवलेशही आपल्याला परवडण्यासारखा नाही. इथे चूक करायला थोडासुद्धा वाव नाही. आपल्या यंत्रांपैकी एखादी यंत्रणा बंद पडणं किंवा तिचं नुकसान होणं यामुळे संपूर्ण वसाहतीचं नुकसान होऊ शकतं. त्यात जेन्किन्सने तर उर्जा प्रणालीवरच घाला घालायचा प्रयत्न केला होता.''

''ते खरं रे पण....''

''तेच खरं ! यामुळेच तुझ्या बचाव कौशल्याला इथे वावच नाही. तूच विचार कर! कुठं तरी एखादी नळी भंगली असती तर ?''

''अरे ! त्या प्रकारात माझाही जीव धोक्यात होताच की ! पण तरीही मला असं वाटतं की त्याला तडीपार करून अज्ञातवास देण्याची शिक्षा फार क्रूर आहे.''

''पार्किन्सन ! तू भावनेच्या आहारी जाऊन हे बोलतोस पण आपली सर्व संस्कृती या यंत्रांमुळेच अस्तित्वात आहे हे तू विसरतोस. यामुळेच कुठल्याही मानवी व्यक्तीने जाणता अजाणता जरी या यंत्रणेचं नुकसान करायचा प्रयत्न केला तर त्याला जास्तीत जास्त शिक्षा देणं हेच योग्य ठरतं. नुसता मृत्यूदंड देऊन उपयोग नाही. त्यामुळे काय साध्य होणार ?''

''का बरं? लोक मृत्यूलाही घाबरतातच.''

''पण तडीपार करून अज्ञातवासाला ते जास्त घाबरतात; हे कसं तू विसरतोस ? 'त्यापेक्षा मृत्यू परवडला' हे वाक्य तर तू ऐकलेलं दिसत नाही. यामुळेच तर जवळजवळ दहा वर्षे अशा प्रकारचा गुन्हा घडलेला नव्हता.''

पार्किन्सन हे लक्षपूर्वक ऐकत होता. समोरच्या पटावरल्या डावाकडे त्याचं लक्षच नव्हतं. तेवढ्यात संगणक चिवचिवला. पार्किन्सनने तिकडे बघितलं. तो उभा राहिला. त्याचवेळी धक्का लागून पट उलटला. ''संगणकाने निर्णय घेतलेला दिसतोय.''

''तुझ्या मनात त्या निर्णयाबद्दल काही शंका ? आणि हा डाव पुन्हा मांड, आपण परत सुरुवात करू !'' डौलिंग म्हणाला.

पार्किन्सननं तिकडे दुर्लक्ष केलं. आता कुठल्याही डावात त्याचं मन रमणं शक्य नव्हतं. तो घाईघाईने संगणक कक्षातून बाहेर पडला. डौलिंगने पट उचलून नीट ठेवला आणि मग आरामात तो कोर्टाच्या दिशेने निघाला.

कोर्ट स्थानापन्न झालं. जेन्किन्स आरोपीच्या पिंजऱ्यात बसला. त्याच्या नजरेला नजर द्यायची पार्किन्सनला हिम्मत होत नव्हती. जेन्किन्सलाही आपलं भवितव्य कळून चुकलं असावं, तोही मान वर करून बघायला तयार नव्हता. आपल्या बरोबरच्या कर्मचाऱ्याला धडा शिकवायला म्हणून रागाने त्याने हात उगारला होता आणि त्याच्या हातून ऊर्जाप्रणालीला धक्का पोचला तेव्हाच त्याचं भवितव्य ठरलं होतं. खटल्याची कारवाई हा केवळ उपचार होता. हे जेन्किन्सला ठाऊक असल्याने त्याने आशेला केव्हाच रामराम ठोकला होता !

न्यायाधीश महाराजांनी बटण दाबलं. एक धीरगंभीर यांत्रिक आवाज बोलू लागला,

''आमच्या पुढे आलेल्या सर्व पुराव्याची छाननी करून पाहिली असता असं दिसून येतं की अँथनी जेन्किन्स हे ऊर्जाप्रणाली यंत्रणेच्या घातापाताच्या आरोपाखालील सर्व कलमान्वये दोषी शाबीत झाले आहेत. या अपराधासाठी असलेली जास्तीत जास्त शिक्षा त्यांना ठोठावण्यात यावी असं या न्यायालयाचं मत आहे.''

कोर्टात फक्त सहा लोक होते पण जगभरचे लोक दूरचित्रवाणीवरून न्यायालयाचे कामकाज पहात असणार याची पार्किन्सनला खात्री होती. न्यायाधीशांनी आपल्या पुढचं बटण दाबलं. कारण रिवाजानुसार मानवाला द्यावयाची शिक्षा मानवाने सुनावणंच आवश्यक ठरत होतं. ते धीरगंभीर सुरात बोलू लागले.

''आरोपीवरील सर्व गुन्हे शाबीत झाल्यामुळे आरोपीस इथून सगळ्यात जवळच्या

अवकाशस्थानावर नेण्यात येईल. तिथे उपलब्ध असलेल्या पहिल्या अवकाश यानातून त्याला या ग्रहावरून हाकलून तडीपार करण्यात येईल आणि पृथ्वी नावाच्या ग्रहावर पाठविण्यात येईल. यापुढचं सर्व आयुष्य त्याने अज्ञातवासात घालवायचं आहे.''

पार्किन्सन शहारला. त्याने जेन्किन्सकडे बघितलं. इथल्यापेक्षा सहापट जास्त गुरुत्वाकर्षण, वादळ, वावटळी, पाऊस अशा कठीण परिस्थितीत एखादी व्यक्ती आपलं संपूर्ण आयुष्य त्या पृथ्वीवर कसं घालवणार? या कल्पनेनंच तो हादरला होता. ही शिक्षा रद्द व्हायलाच हवी. यासाठी काय करता येईल या विचारात तो इतका गढून गेला की कोर्ट बरखास्त झाल्याचं त्याच्या लक्षातच आलं नाही !





'इंटिग्रेटेड सर्कीट उडाल्यामुळं तुमची स्मरणशक्ती कमजोर झालीय...'

व्यंगचित्र : सारंग यावलकर

# हरवलेली स्मृती

❒ पु. ग. वैद्य

***स्मृती गमावलेल्या माणसाची स्मृती परत आणण्याचा प्रयत्न मी माझ्या प्रयोगाद्वारे करत आहे. माणसावर हा पहिलाच प्रयोग असेल...' डॉ. पुरुषोत्तम इन्स्पेक्टर साटमांना म्हणाले.***

ढिशॅव ढिशॅव ऽ ऽ ऽ असे पिस्तुलातून गोळ्या उडविल्याचे तीन-चार आवाज आले. जिथे गोळ्या उडाल्या तिथल्या लोकांची पळापळ झाली. तर दूर असणाऱ्या लोकांनी काय झाले बघायला पिस्तुलाच्या आवाजाच्या दिशेने पळत वाट धरली. गोळ्या घालणारे केव्हाच पसार झाले होते आणि तिथे ही गर्दी जमली होती. कोणीतरी पोलिसांना फोन केल्यामुळे पोलिसांची गाडी आली त्यांचा ताफा हजर झाला होता. या गोळीबारात दोन माणसे जागीच ठार झाली होती आणि तिसरा डोक्याला गोळी चाटून गेल्यामुळे बेशुद्धावस्थेत होता. तातडीने त्याला हॉस्पिटलमध्ये हलविण्यात आले. लगेच उपचाराला सुरुवात झाली.

मरण पावलेल्या दोन व्यक्तींतील एक व्यक्ती नारायण मुंडे होती. एका खुनाच्या खटल्यातील महत्त्वाचा साक्षीदार म्हणून त्याला उडविला होता हे पोलिसांच्या सहज लक्षात आले..नारायण मुंडेला उडविताना दोन व्यक्तींनी या गुंडांना पाहिले होते. या व्यक्ती गुंडांचे वर्णन, गाडीचा नंबर वगैरे पोलिसांना सांगण्याची शक्यता होती. त्यामुळे गुंडांनी नारायण मुंडेला खलास केल्यावर या दोन व्यक्तींवरही गोळीबार केला. या गोळीबारात एस. वाय. साटम हे मृत झाले. त्यांचा त्या गुंडांशी काहीच संबंध नव्हता. ते या रस्त्याने त्यांच्या मित्राकडे चालले होते. हे गृहस्थ डीएसपी साटम यांचे वडील होते. तिसरी घायाळ झालेली व्यक्ती ही गोपीनाथ राणे होती. याही व्यक्तीचा त्या गुंडांशी काही संबंध नव्हता. नारायण मुंडेला मारताना बघितलेल्या या दोन व्यक्तींचा पुरावा नाहीसा करण्यासाठी गुंडांनी त्यांना मारले होते. यातील एस.वाय. साटम हे डीएसपींचे खुद्द वडीलच असल्यामुळे तपासाला विशेष गती आली होती आणि गुंडांना शोधण्यासाठी सारी पोलीस यंत्रणा कामाला लागली होती. या घटनेचा एकमेव साक्षीदार गोपीनाथ राणे हॉस्पिटलमध्ये बेशुद्ध अवस्थेत होता. कोणत्याही परिस्थितीत त्याला शुद्धीवर आणून मारेकऱ्यांचे वर्णन, गाडीचा नंबर इत्यादी माहिती त्याच्याकडून मिळविणे आवश्यक होते.

डॉक्टरांचे एक पथक या कामी अथक परिश्रम करत होते.

तीन दिवस झाले पण अ जूनही गोपीनाथ राणे काही शुद्धीवर आला नव्हता. त्यामुळे डीएसपी साटम अतिशय चिंतेत होते. त्याचप्रमाणे गुंडांची टोळी मागे पुढे पाहणार नाही याचीही त्यांना चांगलीच कल्पना होती. त्यामुळे त्यांनी हॉस्पिटलमध्ये आणि हॉस्पिटलच्या परिसरात कडक बंदोबस्त ठेवला होता. या बंदोबस्तात गणवेशधारी पोलिस आणि साध्या वेषातील पोलिस यांचा समावेश होता. बऱ्याच वेळेला हॉस्पिटलमध्ये काम करणारे कर्मचारी, नर्सेस, डॉक्टर्स इत्यादींना पैशाचे आमिष दाखवून किंवा खुनाची धमकी देऊन फितविले जाते. डीसपी साटमना थोडीही रिस्क घ्यायची नव्हती. त्यामुळे हॉस्पिटलच्या स्टाफमध्ये काही गुप्तहेर पोलिसांची नेमणूक करून घेतली होती. पंधरा दिवस झाले तरी गोपीनाथ राणे काही शुद्धीवर आला नाही. त्यामुळे इतका सारा बंदोबस्त ठेवून या खुनाच्या तपासाबद्दल एकही धागा हाती आला नव्हता. असेच दिवसामागून दिवस जात होते. गुन्ह्याच्या संदर्भात थोडाही संबंध असल्याचा संशय आला तरी त्याची कसून तपासणी केली जात होती. कितीतरी असे निरपराध संशयित पोलिसांकडून पिसून बाहेर पडले होते.

रात्री २ वाजता साटम साहेबांच्या फोनची घंटा खणाणली. इतक्या रात्री फोन, म्हणजे कायतरी विशेष घटना घडली असली पाहिजे.

''अभिनंदन साटम साहेब, दोन महिन्यांच्या परिश्रमानंतर अखेर गोपीनाथ राणे आज शुद्धीवर आला आहे.'' हा निरोप इन्स्पेक्टर देशपांड्यांनी साटम साहेबांच्या कानी घातला. साटम साहेब यांनी गोपीनाथ राणेची जबानी घेण्याची व्यवस्था करण्यास देशपांड्यांना सांगितले. मागोमाग स्वतः ते हॉस्पिटलमध्ये हजर झाले. डॉक्टरांचे अभिनंदन केले आणि गोपीनाथची जबानी घेण्याची इच्छा प्रदर्शित केली.

''तो आताच शुद्धीवर आला आहे. त्याला थोडी विश्रांती मिळू द्या. बोलण्याइतपत त्याच्या अंगात ताकद येऊ द्या. त्यासाठी थोडा अवधी लागेल. त्यातूनही उद्या सकाळी डॉक्टर सरदेसाई यांच्याशी तुम्ही बोला आणि काय ते ठरवा'' डॉक्टरांनी सांगितलं.

साटमसाहेबांना खुनाचे धागे-दोरे केव्हा हाती लागतात आणि केव्हा एकदा त्यांना पकडतोय असे झाले होते. एक निष्ठावंत अधिकारी म्हणून ते प्रसिद्ध होते. त्यामुळे हे त्यांचे कर्तव्य होते. याच्या जोडीला आपल्या सज्जन वडिलांना मारणाऱ्याला धडा देण्यासाठी ते अधीर होते. त्यामुळे केव्हा एकदा सकाळ होतेय आणि डॉक्टर सरदेसाई भेटतात असे त्यांना झाले होते. डॉक्टर सरदेसाईंची राऊंड सकाळी ९ ला असते हे साटम साहेबांना माहित असूनसुद्धा त्यांनी डॉक्टर सरदेसाई आले का म्हणून विचारणा करणारे दोन फोन उगीचच केले. शेवटी हॉस्पिटलमधूनच डॉ. सरदेसाई आल्याचा फोन इन्स्पेक्टर प्रधान यांनी केला. तो मिळताच ते हॉस्पिटलमध्ये जाऊन दाखल झाले.

डॉ. सरदेसाई गोपीनाथ राणेला तपासत होते. त्याच्यामध्ये व्यत्यय नको म्हणून साटम साहेब डॉक्टरांची आतुरतेने वाट पहात बाहेर उभे होते. काही वेळातच डॉ. सरदेसाई बाहेर आले. साटमसाहेबांनी डॉ. सरदेसाईंचे अभिनंदन करून गोपीनाथ राणेच्या प्रकृतीची चौकशी केली.

''साटमसाहेब, तुम्हांला जे काही कौतुक करायचे, आभार मानायचेत किंवा अभिनंदन करायचेय ते ईश्वराचे करा. विचारणा केल्यावर आम्ही जरी म्हणत होतो की हा रोगी वाचेल म्हणून पण प्रत्यक्षात खूप रक्तस्राव झाल्यामुळे असे घडण्याची शक्यता नव्हती. देवाच्या मनात त्याला मरू द्यायचे नव्हते म्हणून तो जगला. साटमसाहेबांनी लगेच जबानी घेण्याबद्दलचा प्रश्न उपस्थित केला. डॉक्टरने त्यांची हरकत नसल्याचे सांगितले. पण बोलण्याइतके त्राण त्याच्या अंगात नसल्यामुळे तुम्ही ही जबानी त्यांच्या अंगात ताकद आल्यावर घ्या असे सुचविले. साटम साहेब जरा खट्टू होऊन 'ठीक आहे' म्हणाले आणि त्यांच्या कामाला गेले.

साटमसाहेब रोज सकाळ-दुपार गोपीनाथ राणेच्या प्रकृतीची चौकशी करत होते. त्याचबरोबर पोलिस बंदोबस्त चोख आहे का नाही याचीही शहानिशा करून घेत होते. जास्त त्रास होऊ नये म्हणून कमीत कमी प्रश्नांत जबानी घेणे आवश्यक होते. कोणते प्रश्न विचारायचे याची सर्वांशी चर्चा करून प्रश्नांचे अंतिम स्वरूप लिहून काढले होते. गोपीनाथ शुद्धीवर आल्यावर अगदी मोजक्या जवळच्या नातेवाईकांनाच फक्त लांबून त्यांच्याकडे पहायला परवानगी दिली होती. फक्त पहायचे, बोलायचे नाही अशी समजही या नातेवाईकांना दिली होती.

जबानीचा दिवस उजाडला. साटम साहेब स्वतः त्यांच्या निवडक सहकाऱ्यांसह जबानी घेण्याचा प्रयत्न करत होते. बऱ्याचशा प्रश्नांना गोपीनाथ उत्तरेच देत नव्हता. तर काही प्रश्नांना दिलेली उत्तरे असंबद्ध होती. वेगवेगळ्या पद्धतीने आणि वेगवेगळ्या वळणाने प्रश्न विचारून माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला जात होता. पण कशालाच गोपीनाथकडून योग्य प्रतिसाद मिळत नव्हता. यावर काय करावे ते कोणालाच सुचत नव्हते. शेवटी पोलिसांनी बाजूला होऊन हे प्रश्न गोपीनाथच्या प्रिय व्यक्तींच्याकडून विचारून पहावेत असे ठरले. त्यासाठी त्याची आई, बायको आणि एकुलता एक मुलगा यांना बोलाविण्यात आले. याला पण गोपीनाथने प्रतिसाद दिला नाही. डॉ. सरदेसाईंनीही प्रयत्न करून पाहिला. बऱ्याच प्रयत्नानंतर त्यांच्या असे लक्षात आले की याची स्मृती गमावलेली असावी. खात्री करून घेण्यासाठी डॉ. सरदेसाईंनी आणखी काही तज्ज्ञ डॉक्टरांना बोलावून गोपीनाथची तपासणी करून घेतली. त्यांचा तर्क बरोबर असल्याचे निष्पन्न झाले. या साऱ्या प्रकारामुळे आता साटम साहेब एका नव्या काळजीत अडकले होते. डॉ. सरदेसाईंनी त्यांना धीर दिला आणि स्मृतीच्या संदर्भातील तज्ज्ञांना बोलावून आपण लगेच उद्यापासून उपचार सुरू करू असे सांगितले. एक महिन्याभरात गोपीनाथची स्मृती परत येईल असा त्यांनी विश्वास व्यक्त केला.

डॉ. सरदेसाई वेगवेगळ्या तज्ज्ञांना बोलावून गोपीनाथची स्मृती पूर्ववत् होण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करत होते. भारतातील आणि भारताबाहेरील स्मृती संबंधातील तज्ज्ञ डॉक्टरांशी विचारविनिमय केला जात होता. अमेरिकेतील या विषयातील एक तज्ज्ञ डॉ. हॅरिस सॅम्युअल हे दिल्ली येथे आंतरराष्ट्रीय परिषदेसाठी आले होते. डॉ. सरदेसाई आणि साटम साहेब यांनी वरच्या पातळीवरून प्रयत्न करून महत् प्रयासाने डॉ. सॅम्युअल यांची गोपीनाथला तपासण्यासाठी भेट ठरविली. त्याप्रमाणे ते आले. या केसचा पूर्वइतिहास त्यांना सांगण्यात आला. डॉ. सॅम्युअल यांनी ही केस एक आव्हान म्हणून स्विकारली. त्यासाठी त्यांनी त्यांचे सर्व कार्यक्रम रद्द करून दोन दिवस मुक्काम ठोकला. सर्व तपासण्या, औषधोपचार झाल्यावर गोपीनाथची स्मृती पूर्ववत येणे अशक्य आहे असे मत देऊन ते अमेरिकेस रवाना झाले. सर्व नामवंत डॉक्टर आणि पोलीस अधिकारी यांच्यात एक अपयशाची आणि निराशेची भावना निर्माण झाली. साटम साहेब आणि त्यांचे सहकारी एकत्र बसून काय करायचे ते ठरवीत होते. ''पोलिस खाते तपास करतेय का गोट्या खेळतेय?'' अशा प्रकारच्या अनेक टीका वृत्तपत्रातून वारंवार येत होत्या. जगातील सर्व तज्ज्ञ डॉक्टर पालथे घालूनही यश न आल्यामुळे, आता काहीतरी वेगळी चाल घ्यायला पाहिजे यावर सर्वांचे एकमत होत. आता आपण स्मृतीवर प्रयोग करणाऱ्या काही शास्त्रज्ञांची मदत घेऊन एक प्रयत्न करू या असे इन्स्पेक्टर प्रधानांनी सुचविले. अन्य प्रयत्न न थांबविता हे करायला काही हरकत नाही असे सर्वांनीच एकमताने ठरविले. साटम साहेबांनी ही जबाबदारी इन्स्पेक्टर प्रधानांवर सोपविली. साटम साहेबांनी इन्स्पेक्टर प्रधानांना इतर सर्व जबाबदाऱ्यांतून मुक्त करून हे एकच काम युद्ध पातळीवर करण्यास सांगितले.

इन्स्पेक्टर प्रधानांनी मानवाच्या स्मरण शक्तीवर संशोधन करणारे भारतीय आणि परदेशातील शास्त्रज्ञ शोधण्यासाठी खूप प्रयत्न केले. साधारणपणे अशा प्रकारचे संशोधन कोणी खाजगी किंवा व्यक्तिगत करू शकत नाही. कारण या संशोधनासाठी खूपच पैसा लागतो. तो साधारणपणे मोठ्या संस्थेकडे असतो. यासाठी प्रधानांनी देशातील संशोधन संस्था हाताशी धरून परदेशातील संस्थांशी संपर्क साधला. मुळात या विषयावर काम करणारे लोक अगदी हाताच्या बोटांवर मोजणारे निघाले. त्यांनी कोणीही त्यांचे प्रयोग मानव जातीवर अद्याप करून पाहिले नव्हते. प्राण्यांवर काही प्रयोग केले गेले. ते सर्व अयशस्वी झालेले होते. त्यामुळे कोणी आता हरीचा लाल भेटण्याची शक्यता नव्हती. त्यामुळे त्यांचा उत्साह मावळला होता. तरीपण ते आशावादी असल्यामुळे शक्यता वाटेल तिथे दगड टाकून पहात असत.

एक दिवस इन्स्पेक्टर प्रधान असेच निराशेच्या छायेत आता कोणता पवित्रा घ्यावा याचा विचार करत चौकीमध्ये त्यांच्या केबिनमध्ये बसले होते. पलीकडे गुन्हेगारांच्या जबान्या घेणे वगैरे पोलिसांचे नित्याचे व्यवहार चालू होते.



''ए साल्या, तुला बोलता येते की नाही? थोबाड उचकटून तुझे नाव सांग.''

''साहेब मारू नगासा. मी नाव सांगतो. माझं नाव बाळोबा किसन देशमुख.''

देशमुख आडनाव ऐकल्याबरोबर प्रधानांच्या डोळ्यासमोर त्यांचे डॉक्टर मित्र बाळकृष्ण देशमुख याची मूर्ती उभी राहिली. हा आपला बालपणीचा मित्र, आंतरराष्ट्रीय कीर्तीचा सर्जन आहे. आंतरराष्ट्रीय पातळीवरील आंतरराष्ट्रीय दर्जाच्या संशोधन परिषदांमध्ये शोध निबंध वाचायला आणि भाषणे द्यायला सतत जगभर फिरत असतो. एक चान्स घ्यावा म्हणून त्यांना बोलावण्याची कामगिरी त्यांनी हाताखालच्या इन्स्पेक्टरवर सोपविली. चाकोरीबाहेरील काहीतरी सुचावे म्हणून त्यांनी आपला मित्र येईपर्यंत किरण बेदी यांनी लिहिलेल्या, "It is always possible" या पुस्तकात डोके खुपसले. आणि काही वेळात ते या पुस्तकात हरवून गेले.

काही वेळाने प्रधान साहेबांची तंद्री भंग करत सब इन्स्पेक्टर वागळेने डॉ. देशमुख आल्याचे सांगितले. इ. प्रधानांनी वागळेंना डॉक्टरांना आत घेऊन यायला सांगितलं.

''या, या, डॉक्टर देशमुख.''

''अरे, तू मला बोलवलेस याची कल्पना नव्हती. इन्सपेक्टरने चौकीत बोलावले म्हटल्यावर मी जरा हादरलो होतो. कारण आजकाल सरळ वागणाऱ्या माणसांनाच पोलिसांचा फार त्रास होत असतो.''

''अरे काय करणार ? काही मंडळी पैसे मिळविण्यात इतकी गुंतली आहेत की ते मित्रांनासुद्धा भेटायला तयार नाहीत. तुला पकड वॉरंट काढल्याशिवाय तू भेटायचा नाहीस म्हणून बोलावले.''

''चल, चेष्टा जाऊ दे. चौकीत बोलवून घेण्याइतपत काय महत्त्वाचे काम माझ्याकडे काढलेस ?''

''मी जरा अडचणीत आहे आणि मला जरा तुझी मदत हवी आहे. म्हणून तुझी आठवण झाल्याबरोबर तुला बोलवून घेतले.'' प्रधानांनी मग ते एखाद्या स्मृतीवर संशोधन करणाऱ्या शास्त्रज्ञांच्या शोधात आहेत. असा कोणी शास्त्रज्ञ माहित असेल तर हवा आहे असे डॉक्टरांना सांगितले.

''साहेब मी सांगू का असे नाव'' असा एक आवाज बंदोबस्तात असलेल्या एका गुन्हेगाराकडून आला.

इन्सपेक्टर प्रधानांनी आश्चर्याने त्याच्याकडे पाहिले आणि अधाशासारखे सांग सांग असे म्हणाले.

''चेन्नईला एक शास्त्रज्ञ आहे. तो उंदरांवर काहीतरी प्रयोग करत असतो. पूर्वी मी चेन्नईला असताना आमच्या मालकाकडून प्रयोगासाठी मीच त्यांना उंदीर पोहचवीत असे.''

इन्सपेक्टर प्रधानांनी त्या गुन्हेगाराकडून सविस्तर माहिती घेतली आणि चेन्नईमध्ये तपास

केला. या तपासात त्यांना असे कळले की त्या शास्त्रज्ञाचे नाव व्ही. पुरुषोत्तम होते. पण ते बऱ्याच वर्षापूर्वी अमेरिकेला गेलेत. अमेरिकेतील न्यूयॉर्क येथील संशोधन संस्थेत तपास केल्यावर असे समजले की ते पाच वर्षापूर्वी निवृत्त होऊन भारतात चेन्नई येथे गेले. चेन्नई येथे पुन्हा केलेल्या चौकशीवरून तो एक वर्ष चेन्नईत राहून चेन्नई सोडून गेले. कुठे गेले, कशासाठी गेले याचा काही तपशील मिळत नव्हता. व्ही. पुरुषोत्तमांचा सुगावा लावण्याचे काही दिवस प्रयत्न करून प्रधानांनी त्यांचा नाद सोडला आणि ते नव्या शास्त्रज्ञांच्या शोधाला लागले.

दुपारी दोनचे ऊन रणरणत होते. अशा वेळी घामाघूम झालेली ७० वर्षांची व्यक्ती "May I come in, Sir" असे म्हणून दारात उभी होती. प्रधानांनी वयाला मान देत त्यांना आत बोलावून खुर्चीत बसण्यास सांगितले.

''मी इथे तक्रार नोंदवायला आलो आहे. माझे नाव व्ही. पुरुषोत्तम.....''

इन्स्पेक्टर प्रधान खुर्चीत ताडकन उभे राहिले. जंग जंग पछाडून जो माणूस मिळत नव्हता तो आपणहून समोर खुर्चीत हजर होता. या योगायोगामुळे त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. थोडा वेळ ते स्तब्ध उभे होते. आणि व्ही. पुरुषोत्तम आपली तक्रार सांगत होते. प्रधानांनी स्ततःला सावरले. व्ही. पुरुषोत्तम यांची तक्रार नोंदवून घेतली. त्यांच्याशी सहानुभूतीपर चार शब्द बोलले. त्यांची अडचण दूर केली जाईल असे आश्वासन दिले. आणि त्यांनी आपल्या कामाचे सोवळेभांडे त्यांच्यापुढे टाकले. प्रधान त्यांना डीएसपी साटम यांच्याकडे घेऊन गेले. स्मृतीवर संशोधन करणाऱ्या हव्या असणाऱ्या शास्त्रज्ञाचा शोध लागल्यामुळे प्रधान खुशीत होते.

डीएसपी साटम यांनी त्यांच्यापुढे गोपीनाथ राणेच्या स्मरणशक्तीची समस्या मांडली. त्याची स्मृती येण्यासंबंधी मार्गदर्शन करण्याची विनंती केली. व्ही. पुरुषोत्तम यांनी अमेरिकेतील बेलॉर युनिव्हर्सिटीतील डॉ. जॉर्ज उंगार यांनी स्मरणशक्तीच्या बाबतीतील उंदरावरील केलेल्या विशेष प्रयोगाची माहिती दिली.

एका पिंजऱ्यात काही उंदीर ठेवण्यात आले होते. त्या पिंजऱ्याच्या निम्म्या भागात अंधार असेल आणि निम्म्या भागात उजेड असेल अशी योजना करण्यात आली होती. त्याचप्रमाणे पिंजऱ्यात फिरता फिरता उंदीर जर अंधारात गेले तर त्यांना शॉक बसण्याची व्यवस्था केली होती. काही दिवसांनी हे उंदीर अंधाराला घाबरू लागले आणि सतत प्रकाशातच राहू लागले. असे झाल्यावर डॉ. उंगार यांनी या उंदरांच्या मेंदूतील काही पेशी काढल्या. त्या पेशीतील द्राव काढून प्रयोग न केलेल्या उंदराच्या मेंदूत टोचला. हे दुसरे उंदिरही अंधाराला आपोआप घाबरू लागले. या प्रयोगातून डॉ. उंगार यांनी असा निष्कर्ष काढला की ''अंधाराची भीति'', हे ज्ञान साठविणारे मेंदूतील एक रसायन आहे. या रसायनाला त्यांनी 'स्फोटोफोबिन'' हे नाव दिले. स्फोटोफोबिन हे पंधरा ॲमिनो आम्लांचे बनलेले एक ''पेप्टाईड प्रोटीन'' आहे. नंतर डॉ.उंगार यांनी हे रसायन पूर्णपणे कृत्रिमरित्या प्रयोगशाळेत बनविले. त्याचे इंजेक्शन इतर उंदरांना दिले, तेव्हा त्यांच्याही मनात अंधाराची भीति निर्माण झाल्याचे दिसून आले. या प्रयोगामुळे विज्ञानाला एक नवी दिशा मिळाली आहे.

हे सारे ऐकून साटमसाहेब आनंदाने हुरळून गेले. हाच प्रयोग गोपीनाथ राणे याच्यावर करण्याचा आग्रह त्यांनी धरला. व्ही. पुरुषोत्तम यांनी हे प्रयोग अजूनही उंदरांच्यापुरतेच मर्यादित आणि प्रयोगावस्थेत आहेत. असे सांगितले. त्यामुळे ते माणसांच्यावर आता लगेच करता येणे शक्य नाही असेही ते पुढे म्हणाले. यानंतर त्यांनी उंदरांवर स्वतः करत असलेल्या प्रयोगाची माहिती देण्यास सुरुवात केली.

मी मात्र माझ्या प्रयोगात व्हायब्रेशन थिअरीचा वापर केला आहे. आपले भौतिक विश्व हे प्रत्यक्षात वस्तूंनी व्यापलेले आहे. पण खरं म्हणजे सर्व विश्व हे एक प्रकारच्या ऊर्जेने व्यापलेले आहे. आपल्या संवेदन क्षमतेच्या मर्यादेमुळे आपल्याला घन, द्रव, वायुरूप इत्यादी पदार्थांचे प्रकार दिसतात. अणु, परमाणू यांचे अतिसूक्ष्म स्तरावर विश्लेषण केल्यास असे आढळून येईल की हे सर्व त्यांच्याही पेक्षा अधिक लहान लहान घटकांनी बनत गेलेले आहे. हे सूक्ष्म विश्लेषण शेवटी केवळ कंप पावणाऱ्या ऊर्जेचे स्वरूप आहे असे दिसून येते. म्हणजे आपण आणि आपल्या भोवतालचे सर्व विश्व हे कंप पावणाऱ्या ऊर्जेपासून तयार झालेले आहे.

आपल्याला जी विश्वातील विविधता दिसते ती म्हणजे कंप पावणाऱ्या ऊर्जेचे विविध प्रकार आहेत. ही ऊर्जा वेगवेगळ्या गतीने स्पंदन करत असते. त्यामुळे आपल्याला वस्तूंच्या विविध प्रकृती दिसून येतात. ''विचार हा सुद्धा सापेक्षतेने ऊर्जेच्या स्पंदनाचा हलका प्रकार आहे.'' त्यामुळे चटकन् आणि सहज तो बदलता येतो. सापेक्षतेने वस्तुमान हे स्पंदन ऊर्जेचा घन प्रकार आहे. त्यामुळे तो बदलण्यास सहज सोपा जात नाही. वस्तुमानामध्येही विविध प्रकार आहेत. जिवंत माणसाचे शरीर हे त्या मानाने चटकन बदलता येणारे वस्तुमान आहे. त्यामुळे इतर वस्तुमानांच्यामुळे त्याच्यात सहज बदल होतात. खडक हा स्पंदन ऊर्जेचा अतिघन नमुना आहे. त्यामुळे तो बदलण्यास अवघड आहे. त्यावर अन्य वस्तुमानांचे परिणाम हे सहज होत नाहीत. तरीसुद्धा प्रकाश, पाणी यांचा परिणाम त्यावर होतच असतो. त्यांचा परस्परांशी संबंध आहे. त्याचप्रमाणे त्यांचा एकमेकांवर परिणाम होत असतो. ही स्पंदन ऊर्जा चुंबकीय ऊर्जेच्या प्रकारची आहे. तसेच विशिष्ट स्पंदनांक असणारी ऊर्जा त्याचप्रकारच्या सम स्पंदनांक असणाऱ्या ऊर्जेकडे आकर्षिली जाते. याची प्रचीती आपल्याला आपल्या संवेदना क्षमतेच्या पातळीवर पडताळून पाहता येते.

एका नळीत हवा बंद करून ठेवलेली असते. या नळीतील हवेचा स्तंभ कमी जास्त करण्याची सोय केलेली असते. ट्यूनिंग फोर्क म्हणजे एक चिमटा असतो. तो रबरी पॅडवर आपटल्यावर

त्याची एका सेकंदाला विशिष्ट स्पंदने होतात. समजा या चिमट्याची एका सेकंदाला २५० स्पंदने होतात. ह्यालाच आपण या ट्यूनिंग फोर्कचा स्पंदनांक २५० आहे असे म्हणतो.

आता हा चिमटा आपण रबरावर आपटून बंद नळीपाशी नेला तर चिमट्याच्या स्पंदनामुळे नळीतील हवेचे कण स्पंदन पावावयास हवेत. पण प्रत्यक्षात असे घडेलच असे नाही. त्यासाठी काचेच्या नळीतील रबरी बूच खालीवर करून हवेने व्यापलेली जागा कमी जास्त करावी लागते. काही प्रयत्नानंतर असे दिसून येईल की हवेचा स्तंभ विशिष्ट उंचीचा असताना हवेचे सर्व कण स्पंदन पावतात. त्यातून घुंई ऽ ऽ ऽ ऽ असा आवाज येतो. याचा अर्थ ध्वनी चिमट्याचा स्पंदनाक आणि कोंडलेल्या हवेचा स्पंदनाक सारखाच आहे. म्हणजेच दोघेही एकाच वेगाने स्पंदन करत आहेत. यालाच "Resonance" असे म्हणतात. येथे ध्वनी चिमट्याचा उपयोग करून आपण बंद नळीतील हवेला विशिष्ट वेगाने कंपन पावायला लावले आहे. या प्रयोगाला कुंटस् ट्यूब एक्सपेरिमेंट असे म्हणतात. भौतिक शास्त्र घेऊन पदवी घेतलेल्या सर्व विद्यार्थ्यांनी हा प्रयोग केलेला असतो. या कल्पनेचा उपयोग मी माझ्या प्रयोगात केला आहे.




मी माझ्या प्रयोगात उंदरांच्या प्रयोगासाठी वर आकृतीत दाखविल्याप्रमाणे ''मेज'' चा वापर केला आहे. उंदराला मेजच्या प्रवेशद्वारापाशी ठेवले. या प्रवेशद्वारापासून मेजच्या पलीकडच्या बाजूस उंदराने जावे यासाठी पलीकडच्या बाजूस तीन चार भजी ठेवलेली असतात. प्रवेशद्वारापासून भज्यांकडे जाण्यासाठी अनेक मार्ग असतात. यातील एकच मार्ग भज्यांपर्यंत पोहचतो. बाकीचे मार्ग रस्त्याच्या डेड एंड प्रमाणे मध्येच कुठेतरी बंद होतात. उंदीर वेगवेगळे प्रयत्न करून भज्यांपर्यंत पोहोचण्याचा मार्ग शोधतो. सुरुवातीला त्याला जवळजवळ १२ ते १५ प्रयत्न करावे लागतात. पुढे पुढे या प्रयत्नांची संख्या कमी होऊन तो एका प्रयत्नात भज्यांपाशी पोहोचतो. अशा तऱ्हेने हा यशाचा मार्ग त्याला मिळतो. त्यानंतर प्रत्येकवेळी तो प्रथम प्रयत्नातच या भज्यांपर्यंत पोहचतो. याचा अर्थ हा मार्ग त्या उंदरांनी लक्षात ठेवला आहे. त्यानंतर त्यांच्या मेंदूवर विशिष्ट प्रकारे आघात करून त्यांच्या स्मरणशक्तीचे केंद्र निकामी केले जाते.



मेंदूवर हा आघात कसा करावा, कोठे करावा आणि किती तीव्रतेने करावा हे सर्व आम्ही उंदरांवर अनेक प्रयोग करून निश्चित केले. या मेंदूवर आघात केलेल्या उंदरांना मेजमध्ये सोडल्यावर ते भज्यांपर्यंत बरेच प्रयत्न करूनही जाऊ शकले नाहीत. याचा अर्थ त्या विशिष्ट मार्गाने जाण्याची त्याची स्मृती नष्ट झाली आहे. या उंदरांना त्यांची स्मृती परत येण्यासाठी त्यांच्या मेंदूवर विविध कंपनाकांचे आघात केले. त्यांना भजी शोधण्यासाठी मेजमध्ये सोडण्यात आले. याप्रमाणे अनेक प्रयत्न वाया गेले - आणि एक दिवस या प्रयत्नांना यश आले. म्हणजे सर्व उंदरांनी पहिल्या प्रयत्नात भज्याचा मार्ग शोधून तेथे पोचून त्यावर ताव मारला. भजी शोधण्याची इच्छा त्यांच्यात निर्माण व्हावी यासाठी प्रयोगाच्या अगोदर उंदरांना उपाशी ठेवण्यात येत असे.

शरीरातील कार्य करणाऱ्या मेंदू, हृदय, फुफ्फुस वगैरे वेगवेगळ्या संस्था आहेत. या संस्था कार्यक्षम असतात म्हणजे काय ? आणि मरतात म्हणजे नेमके काय होते ? या सर्व संस्थांमधील अतिसूक्ष्म असणारी स्पंदने जोपर्यंत विशिष्ट गतीने चालू आहेत तोपर्यंत ती कार्यक्षम असतात. या स्पंदनांची गती काही प्रमाणात म्हणजे विशिष्ट मर्यादेत कमी जास्त झाली तर त्यांची कार्यक्षमताही काही प्रमाणात कमी होते. या स्पंदनांची गती मोठ्या प्रमाणात कमी झाल्यास त्यांची कार्यक्षमता नष्ट होते आणि ती संस्था निरुपयोगी होते. आमच्या प्रयोगात मेंदूवर स्मरणशक्तीच्या भागावर आघात करून तेथील स्पंदनांचा वेग कमी झाल्यामुळे आठवण्याची क्रिया नष्ट झाली. मेंदूतील स्मरणशक्तीच्या भागावर कंपनांचा आघात करून पुन्हा त्यांची कंपनगती पूर्ववत केली. त्यामुळे त्यांना त्यांची स्मृती प्राप्त झाली.

प्रत्येक संस्थेचा कार्यक्षमतेने काम करण्यासाठी विशिष्ट कंपनांक असतो. हा प्रत्येक संस्थेच्या बाबतीत भिन्न असतो आणि त्यांचे एकमेकांवर परिणाम होत असतात. प्रत्येक संस्थेच्या कार्यक्षमतेची विशिष्ट कंपन संख्या अद्याप आम्हांला शोधता आली नाही. त्याचा प्रयत्न आम्ही करत आहोत. उंदरांच्यावरही हे प्रयोग अंतिम निर्णयाप्रत आलेले नाहीत. त्यामुळे माणसांच्यावर हे प्रयोग आताच करणे इष्ट नव्हे.''

व्ही. पुरुषोत्तम हे सर्व सांगत असताना फोनची घंटा वाजली. त्यांनी घेतलेला फोन साटम साहेबांचा होता. म्हणून तो त्यांच्याकडे दिला. फोनवर डॉक्टर सरदेसाई बोलत होते. 'गोपीनाथ राणेची प्रकृती एकाएकी बिघडली आहे आणि नवीन बरीच complications झाली आहेत. त्यामुळे त्याच्या जगण्याचाच आता भरवसा देता येत नाही. तुम्ही त्याची जबानी घेण्यासाठी

जे काही प्रयोग करायचेत ते तातडीने हाती घ्या,' या घटकेला 'ठीक आहे' असे म्हणून फोन ठेवून देण्यापलीकडे साटम साहेब काहीच करू शकत नव्हते.

साटम साहेबांनी व्ही. पुरुषोत्तम यांना उंदरांवर केलेला प्रयोग गोपीनाथ राणेवर करण्याची विनंती केली. मानवावर पूर्वी कधीही न केलेला प्रयोग एकदम असा करण्यात धोका असतो. माणूस दगावण्याची शक्यता असते. यासाठी आपण हे रिस्क घेऊ नये असे व्ही. पुरुषोत्तम यांनी सांगितले. नाहीतरी हा पेशंट केव्हाही दगावण्याची शक्यता आहे. नशिबाने पहिल्या काही प्रयत्नातील एखादा स्पंदनांक योग्य ठरतोय का याचा आपण चान्स घेऊ या असे साटम साहेबांनी प्रतिपादन केले. योगायोगाने जर हा प्रयोग यशस्वी झाला तर मानवजातीला तो एक वर ठरणार आहे. म्हणून तुम्ही उद्याच हा प्रयोग हाती घ्यावा अशी गळ साटम साहेबांनी व्ही. पुरुषोत्तम यांना घातली. मानवावर प्रयोग करण्याची चालून आलेली संधी सोडायची नाही म्हणून व्ही. पुरुषोत्तम प्रयोग करण्यास तयार झाले.

दुसऱ्या दिवशी जय्यत तयारीनिशी हॉस्पिटलमध्ये प्रयोगाची सर्व तयारी करण्यात आली. योगायोगाने पहिल्याच प्रयत्नातील कंपनांकाच्या धक्क्यामुळे राणेची स्मृती त्याला पूर्ववत प्राप्त झाली. कारण त्याने त्याला दाखविण्यात आलेल्या फोटोतील आई, मुलगा, बायको यांना व्यवस्थित ओळखले. त्याबरोबर लगेचच तेथेच तयार असलेल्या साटम साहेबांच्या टीमने राणेची जबानी घेण्यास सुरुवात केली. पोलिसांना हवे ते धागेदोरे मिळाले. सर्वचजण एक खास विजय मिळविल्याच्या आनंदात होते.

आपण व्ही. पुरुषोत्तम यांचा असिस्टंट असून त्यांना हे यंत्र तातडीने पोचवायचे आहे असे सांगत गुप्तहेरांच्या जाळ्यातून शेवटी ती व्यक्ती गोपीनाथ राणेपाशी येऊन ठेपली. मूळ पुरावा नष्ट करण्यासाठी त्या व्यक्तीने राणेवर गोळ्या झाडण्यासाठी पिस्तुल बाहेर काढले. तेथेच उपस्थित असलेल्या कमांडोंच्या हे लक्षात येताक्षणी त्यांनी त्याच्यावर झडप घातली. तोपर्यंत पिस्तुलातील गोळी उडाली होती. पण ती गोळी गोपीनाथ राणे याला न लागता व्ही. पुरुषोत्तम यांना लागून तिनं त्यांचा बळी घेतला.

मानवाला अत्यंत उपयुक्त ठरणारा शोध आणि त्याचा शोधक हरवले !



**आता पुन्हा आपली भेट एकविसाव्या शतकात !**
**'विज्ञान युग' चा या पुढील अंक**
**जानेवारी २००१ मध्ये आपल्या भेटीस येत आहे.**
**(डिसेंबर २००० चा वेगळा अंक प्रसिद्ध होणार नाही.)**



**कथेपूर्वी थोडेसेच .......**

२६ जून २००० रोजी जगात एक ऐतिहासिक घटना घडली. या घटनेची तुलना २१ जुलै १९६९ रोजी मानवाने चंद्रावर पहिले टाकलेले पाऊल या घटनेशीच करता येईल ! यंदा वरील तारखेस अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्षांच्या उपस्थितीत जगातील अठरा प्रमुख राष्ट्रांतील हजारो शास्त्रज्ञ २९५ प्रयोग शाळेत अहोरात्र खपून गेली दोन दशके संशोधन चाललेला 'ह्यूमन जेनोम प्रॉजेक्ट' म्हणजेच 'मानवी जनुक प्रकल्प' पूर्ण झाल्याचे जाहीर करण्यात आले. या शोधाचे फलीत म्हणून मानवातील सर्व गुणावगुणास कारणीभूत जे जीन्स किंवा जनुके ह्यांचा संपूर्ण नकाशाच सार्वजनिक करण्यात आला. अशा तऱ्हेने या प्रचंड खर्चिक अशा एका महत्त्वाच्या व गुप्तपणे चाललेल्या संशोधनाची माहिती सार्वजनिक झाली ! या प्रसंगी भाषण करताना राष्ट्राध्यक्ष क्लिंन्टन आपल्या काव्यमय शब्दांत म्हणाले,-

''आता कुठे खऱ्या अर्थाने मानवाला देवांच्या भाषेतील सर्वच्या सर्व मूळाक्षरे समजलेली आहेत !''

पण ही सर्व माहिती जनतेला लगेचच उघड करण्याला कारणही तसेच झाले.

सार्वजनिक 'जेनोम' प्रकल्पात बरीच वर्षे काम केलेला एक अतिशय हुषार शास्त्रज्ञ अचानक दोन वर्षांपूर्वी या प्रकल्पातून बाहेर पडला व त्या धनाढ्य शास्त्रज्ञाने स्वतःच स्वखर्चाने 'सॅलेरा जेनॅमिक्स' ही कंपनी काढून स्वतंत्रपणे पुढे या विषयावर गुप्त संशोधन सुरू केले. त्यासाठी त्याने परमहासंगणक बनवून घेतला व लगेच असं जाहीर केलं, की 'माझी कंपनी हा प्रकल्प सार्वजनिक 'जेनोम' प्रकल्प पूर्ण होण्यापूर्वीच पूर्ण करील व सर्व मानवी जनुकांचा नकाशा तयार करून त्याचे पेटंट घेईल !' तसे झाले असते तर या खाजगी कंपनीचा जनक वैज्ञानिक क्रेग व्हेन्टर याला करोडो रुपयांची रॉयल्टी दिल्याशिवाय जगात कुठेही कुणालाच पुढील वीस वर्षे जनुकांवर संशोधन करणे अशक्यच झाले असते ! मायक्रोसॉफ्टच्या बिल गेटहूनही प्रचंड अशी आर्थिक मक्तेदारी जगात निर्माण झाली असती ! अशा भविष्यातील संकटाला पायबंद बसावा म्हणून गुप्त ठेवण्यात आलेले सर्व संशोधन लवकरात लवकर उघड करण्याची संपूर्ण जगामधील शास्त्रज्ञांमध्ये अहमहमिका सुरू झाली ! शेवटी या वर्षी जूनमध्ये त्यांना त्यात यश मिळाले व क्रेग व्हेन्टरचे जगातील सर्वांत श्रीमंत व्यक्ति बनण्याचे स्वप्न तूर्तास तरी धुळीस मिळाले! मात्र यामधून काही गोष्टी प्रथमच उघडकीस आल्या. त्या अशा - गेली दोन दशके अठरा देशांमधील २५० प्रयोगशाळांत हजारो शास्त्रज्ञ संघटीतरित्या करीत असलेल्या प्रकल्पास एक मनुष्य खाजगी कंपनी काढून दोन वर्षांत ते काम पूर्णत्वास नेण्याचे आव्हान देतो. माहितीतंत्रज्ञान व संगणक यांचा चतुराईने व कौशल्याने वापर केल्यास किती काळ वाचतो हे यातून शिकता येईल ! दुसरी गोष्ट नवज्ञानं निर्माणात सध्याच्या ज्ञानमय अर्थव्यवस्थेत सतत उभा राहणारा मक्तेदारीचा धोका यापुढे लक्षात ठेवणे फार जरूरीचे आहे!

**'ब्रेनड्रेन'** ही कथा वरील संदर्भात वाचल्यास वाचकांना एक आगळावेगळा आनंद मिळेल.

# ब्रेन ड्रेन

❒ सुभाष भांडारकर

***भारतातून बुद्धिमान विद्यार्थी आपल्या देशात बोलावण्यापेक्षा भारतीयांच्या मस्तिष्क पेशीतल जनुक मिळवायचे आणि त्यापासून अनेक क्लोन मानव तयार करावयाचे असा घाट जे.के. न घातला होता... पुढं काय झालं ?***

**डॉ.** ऋषिकेश भार्गव यांना सकाळी-सकाळीच एक फोन आला. फोनवरील व्यक्तीने आपली ओळख फक्त 'जे. के.' एवढीच त्यांना करून देऊन ती व्यक्ति डॉक्टरना म्हणाली - 'डॉक्टर, प्लीज आपण मला आज सायंकाळी ठीक चारला भेटू शकाल का ? मी आपली वाट पाहीन. मला आपल्याशी काही फार महत्त्वाचं बोलायचं आहे. माझा पत्ता - 'पार्क व्ह्यू हॉटेल', कुलाबा कॉजवे, रूम नंबर २०२. मग, नक्की येणार ना ?' डॉ. भार्गव क्षणभर संभ्रमात पडले. 'कोण हा जे. के.? मला पूर्वी कधी भेटला असेल का ? मग मला कसा काय ओळखतो ? याला माझा फोन नंबर कुणी दिला ? आणि याचं असं कोणतं महत्त्वाचं काम आहे माझ्याकडे ?' अशा एका मागोमाग एक डोक्यात येऊ पाहाणाऱ्या प्रश्नांची उत्तरे त्यांचा मेंदू शोधीत असताना नेहमीच्या सवयीनुसार त्यांच्या तोंडून शब्द बाहेर पडले, 'बरं, ठीक आहे, येईन मी चार वाजता आज संध्याकाळी पार्क व्ह्यू हॉटेलवर !' दुसऱ्या बाजूने लगेच रिसिव्हर खाली ठेवल्याचा आवाज आला.

डॉ. भार्गव हे जागतिक कीर्तीचे एक निष्णात न्यूरोसर्जन होते. मेंदूवरील शल्यचिकित्सकांमध्ये त्यांच्या एवढे कौशल्य असणारे डॉक्टर्स जागतिक पातळीवरही हाताच्या बोटावर मोजता येतील एवढेच असतील असं म्हटलं तरी ती अतिशयोक्ति म्हणता आली नसती. शिवाय त्यांचा खास आवडीचा विषय अनुवंशशास्त्र व जनुक अभियांत्रिकी म्हणजे जेनेटिक्स व जेनेटिकल इंजिनियरींग. अनुवंशशास्त्रावर संशोधन करणाऱ्या अत्याधुनिक साधनांनी युक्त अशा भारतामधील आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या संशोधन शाळेचे ते मानद अध्यक्ष होते. ह्या संस्थेची एक अत्याधुनिक प्रयोगशाळा मुंबईजवळ वाशीनगरीत होती. या संशोधन शाळेत अनुवंशिक व्याधी, विकार, व्यंगे यासंबंधी संशोधन चाले.

मॉलेक्युलर बायोलॉजी, सेल्युलर सर्जरी, जेनेटिकल मॅपिंग अशा विविध शाखांमधून काम करणारे सुमारे शंभर निष्णात शास्त्रज्ञ देशविदेशांमधून इथे येऊन संशोधन करीत होते. त्यांचे विविध प्रकारचे नवेनवे संशोधन जगातील सर्व विज्ञान विषयाला वाहिलेल्या नियतकालिकांमधून तसेच वेबसाईटस् वरून जगाच्या सर्वदूर भागात पोहचे. डॉक्टरांच्या यासंस्थेस विविध जागतिक संस्थांकडून आर्थिक पाठबळ मिळत असे. शिवाय डॉक्टरांचे चाहते, हितचिंतक तसेच अनेक उद्योगपती व अनिवासी भारतीयांचेही त्याला सहाय्य होते. डॉ. भार्गव स्वतःच्या मिळकतीमधला बराचसा भाग या संस्थेवर खर्च करीत.

अलिकडेच या संस्थेत सजीवांच्या क्लोनिंग म्हणजे प्रतिकृति निर्मिती या विषयावर संशोधन करणारी एक शाखा उघडण्यात आली होती. ब्रिटनहून भारतात आलेले डॉ. तीर्थंकर आचार्य हे उमदे तरुण शास्त्रज्ञ या शाखेचे प्रमुख होते. मेंढीच्या आचळामधील कायिक पेशींपासून डॉली ही पहिली प्रतिकृति ज्या ब्रिटीश शास्त्रज्ञांनी निर्माण केली त्या वैज्ञानिक पथकामध्ये डॉ. तीर्थंकरांचा सहभाग होता. सध्या या शाखेचे प्रमुख म्हणून त्यांनी जे संशोधन हाती घेतले होते त्यात सजीवांच्या व मुख्यतः सस्तन प्राणी गर्भात असताना त्यांच्या प्राथमिक अवस्थेतील मस्तिष्क पेशीत अतिहुषार प्राण्यांच्यामधील जनुके प्रस्थापित करायची व त्यातून त्या प्राण्याची अधिक बुद्धिवान जात निर्माण करायची ह्या प्रकल्पाचा समावेश होता. तीर्थंकराच्या संशोधनात एक सर्जन या नात्याने डॉ. भार्गव त्यांना गर्भाच्या मेंदूमधील पेशी मिळवून देण्यात मदत करीत.

डॉ. भार्गव यांनी आपले काम तीनच्या सुमारास आटोपले. काही काळ विश्रांती घेतली व पावणेचारला त्यांनी आपली कार बाहेर काढून ते ठीक चारला कुलाबा कॉजवे येथील पार्क व्ह्यू हॉटेलच्या आवारात येऊन ठेपले. डॉक्टर हॉटेलच्या स्वागत कक्षातील काऊंटरपाशी आले तोच काऊंटर जवळच डोळ्यास काळा गॉगल लावलेली मध्यम वयीन, उंच, डोक्यावरचे केस थोडे कमी झालेली अशी व्यक्ति डॉक्टरांजवळ येऊन उभी राहिली व जशी डॉ. भार्गवांनी काऊंटरवरच्या रिसेप्शनिस्टकडे रूम नंबर २०२ ची चौकशी केली, तशी लगेच ती व्यक्ति चटकन् पुढे येऊन डॉक्टरांचा हात हातात घेत हस्तांदोलनाच्या पावित्र्यात उभं राहून उद्गारली, -

'हाय् ! डॉक्टरसाहेब, आपल्या सारख्या जागतिक कीर्तीच्या शास्त्रज्ञाशी आज मला हस्तांदोलन करण्याची संधी मिळाली हे माझे मी भाग्यच समजतो ! मीच तो जे. के. तुम्हाला फोन केला होता. चला, आपण आता रूमवरच जाऊन गप्पा मारू !''

डॉ. भार्गव यावर फक्त हसले आणि त्या जे.के. नामक पूर्वी कधीही न भेटलेल्या व्यक्ति-मागोमाग त्याच्या रूममध्ये शिरले. डॉक्टर व जे.के समोरासमोरच्या कोचवर बसल्यावर जे.के. डॉक्टरांना उद्देशून हसत म्हणाला, 'डॉक्टर, माझे 'जेके' हे नाव तुम्हाला तुमच्याकडील हिंदी मूव्हिज मधील एखाद्या डॉनसारखे वाटले असेल नाही ! पण माझे खरे नाव आहे. जयराम कीर. पण माझा इलाज नाही, अमेरिकेत सर्वच गोष्टींचा संक्षेप होतो. तसा माझ्या नावाचाही

'जेके' हा अमेरिकनांनी केलेला संक्षेप आहे.!'

'बरं, बरं, पण जेकेसाहेब, आपण मला कसे काय ओळखता ? व आपले माझ्याकडे असे कोणते महत्त्वाचे काम आहे ते जरा लवकर सांगाल तर बरं होईल, कारण मला सात वाजता हॉस्पिटलमध्ये एक अर्जंट अपॉइंटमेंट आहे !' डॉ. भार्गव सरळच विषयाला हात घालण्यासाठी बोलले. ते असे म्हणताच जेकेने बोलायला सुरुवात केली, 'डॉक्टर, आपण प्रथमच माझ्याकडे आलात, काही पेय वगैरे मागवू का ?' डॉक्टरांनी नकारार्थी मान हलविताच जेकेने पुढे बोलायला सुरूवात केली. 'डॉक्टरसाहेब, मी आपलं नाव अमेरिकेत बरंच ऐकलेलं आहे. आपण एक निष्णात ब्रेन सर्जन, शिवाय जेनेटिक्स विषयावरील गाढे अभ्यासक तर आहातच पण आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या एका नामांकित संशोधन शाळेचे अध्यक्षही आहात. मी कॅलिफोर्निया मधील 'स्कालपेल' या मेडिकल सायन्स जर्नलमध्ये आपण व आपल्या सहाध्यायांनी मिळून केलेल्या संशोधनावर आधारीत दोन लेख वाचले व इथे येऊन आपली भेट घ्यावी असे ठरवले. जर्नलच्या कार्यालयामधून मी आपला पत्ता व टेलिफोन नंबरही घेतला व भारतात येताच आपल्याला फोन केला. मला वाटलं नव्हतं, तुमची मला लगेचच आज अपॉईंटमेंट मिळेल म्हणून ! तसा मीच तुमच्याकडे आलो असतो, पण म्हटलं, इथे हॉटेल रूमवर कुणाचाही अडथळा न येता निवांतपणे बोलता येईल !' जेके बोलताना क्षणभर थांबताच डॉ. भार्गव त्याचे भाषण अधिक लांबू नये म्हणून मध्येच म्हणाले, 'ते सर्व ठीक हो, पण मला भेटण्याचा आपला उद्देश काय? मी तुम्हाला काय मदत करू शकतो ते लवकर बोला !'

'ते सांगण्यासाठीच तर मी एवढ्या लांबून इथे आलो आहे ! ... डॉक्टर, मी एक अनिवासी भारतीय उद्योजक आहे. वीस वर्षांपूर्वी मी एक स्वप्न घेऊन अमेरिकेत गेलो. आज अमेरिकेत प्रत्येक उद्योगधंद्यात माझी गुंतवणूक आहे ! डॉक्टर, खरे माना किंवा न माना, जगातली क्रमांक एकवरील धनाढ्य व्यक्ति बिल गेटसूशी माझी स्पर्धा सुरू आहे! तुम्ही पेपर्समध्ये तर वाचलेच असेल की, बिल गेटसूच्या मायक्रोसॉफ्ट् कंपनीचे आता अमेरिकन सुप्रिम कोर्टच्या आदेशानुसार दोन भाग होत आहेत. त्यातला एक भाग मी विकत घेणार व एवढा वाढवणार की, बिलगेटसूची मक्तेदारी संगणक क्षेत्रापुरती तरी आता संपुष्टात येणार आहे ! आणि लवकरच जगातली सर्वात धनाढ्य व्यक्ति म्हणून माझं नाव गिनीज बुकामध्ये दिसणार आहे !'

'ते सर्व जाऊ द्या. पण या सर्व बाबतीत मी काय मदत करू शकतो तेवढंच मला पटकन सांगून टाका म्हणजे झालं !' डॉ. भार्गव जेकेला मध्येच थांबवत म्हणाले.

'डॉक्टर, गेल्या महिन्यात अमेरिकन जर्नल ऑफ जेनेटिकल मेडिसिन यामध्ये आलेला आपण व आपले सहकारी यांनी केलेल्या संशोधनावर आधारित लेख वाचनात आला. लेखात म्हटलेले आहे की, ''भारतीय वंशाच्या लोकांमध्ये त्यांच्या मस्तिष्कपेशीत क्वचित काहींमध्ये एक वेगळा जीन म्हणजे जनुक आढळून आलेले आहे. अशा पेशींचे प्रयोगशाळेत संवर्धन करून जर त्यापासून क्लोन्स मानव निर्माण केले तर भविष्यात आपणास अति बुद्धिमान मानवाची एक कृत्रिम जात तयार करता येईल! हा वेगळा असा बुद्धिमान जनुक वैदिक काळातील बुद्धिमान अशा ऋषिमुनींच्या कुळांमधून सरकत सरकत भारतीयांच्या असंख्य पिढ्यांमधून पुढे जात आजच्या या मानवापर्यंत येऊन पोहोचला असावा ! हा सुप्त असला तरी एकीकडे विकसित झालेल्या तंत्रज्ञानामुळे त्या जीनला जागृत करता येणे शक्य आहे. क्वचित हा जनुक नैसर्गिकरित्या सुद्धा आपोआप काही काही मनुष्यात जन्मजात जागृत होऊन कार्य करू लागतो. अशा लहान मुलांना इंग्रजीत 'चाइल्ड प्रॉडेजी' म्हणजे 'जन्मजात विलक्षण बुद्धिमत्ता असलेले मूल' असं म्हणतात. भारतात पूर्वी गणितज्ज्ञ श्रीनिवास रामानुजम किंवा शकुंतलादेवी अशी काही झालेली उदाहरणे आहेत !

''अगदी गेल्या महिन्यात मी इंटरनेट न्यूजमध्ये वाचलं, की, आपल्या मुंबईनजीक ठाणे जिल्ह्यातली उल्हासनगर प्राथमिक शाळेत पहिल्या यत्तेत शिकणारी सहा वर्षांची चिमुरडी, भूमिका यशपाल गौतम हे तिचं नाव - ती कॉम्प्युटर हार्डवेअर जाणतेच पण सॉफ्टवेअर मध्येही सी-प्लस, वर्डस्टर, युनिक्स, फॉक्स प्रो वगैरे विविध भाषांमध्ये प्रोग्रॅम्स करू शकते ! डॉक्टर, मी हे भारतीयांमध्ये आढळणारे 'इंडियन इंटेलिजन्स जीन' वैश्विक पातळीवर नेऊ इच्छितो. तुम्ही मला तुमचे सेल्युलर मायक्रो सर्जरी तंत्रज्ञान वापरून अशा विलक्षण मेंदूमधील पेशी मिळवून द्यायच्या, ज्यात हा जनुक असेल आणि त्या मोबदल्यात मी आपणास फक्त एक अब्ज अमेरिकन डॉलर्स द्यायचे ! आहे कबूल तर लगेच सांगा ! करार करून टाकू ! शिवाय तुमच्या-माझ्यामधल्या या कराराची वाच्यता कुठेही होणार नाही याबद्दल मी वचन देतो !''

जेकेची ती विलक्षण ऑफर ऐकून डॉ. भार्गव यांना काय बोलावे तेच प्रथम सुचेना. आपल्या संशोधनाचा इतक्या लवकर असा कुणी आर्थिक फायदा उठवू इच्छील, याची त्यांना यापूर्वी जराही कधी कल्पना आलेली नव्हती ! येन केन प्रकारेण, धनाढ्य बनायचं आणि खुशाल जीवन जगायचं हाच अमेरिकन संस्कृतीमध्ये वाढलेल्या त्या भारतीयाच्या जीवनाचा जणू मूलमंत्र होता ! पण आपण जेकेच्या त्या ऑफरला बळी पडायचं नाही व आपल्या संशोधनाचं असं खुल्लम्खुल्ला व्यापारीकरण त्याला करू द्यायचं नाही असा विचार करून डॉ. भार्गव काहीच न बोलता उठून रूमच्या दरवाज्यापाशी येताच जेके पुन्हा डॉक्टरना म्हणाला, 'पहा, घरी अगदी चालून आलेल्या लक्ष्मीला आपण लाथाडीत आहांत'

''सॉरी ! सॉरी जेके, मी हे करू शकत नाही ! आपल्या दोघांचाही बराच वेळ - यात विनाकारण फुकट गेल्याचं मला फार वाईट वाटतं !'' एवढं बोलून मग डॉ. भार्गव हॉटेलमधून बाहेर येऊन जेकेचा निरोप घेऊन स्वतःच्या कारमध्ये बसून निघून गेले.

काही वेळाने हॉटेलच्या दारात दुसरी एक कार येऊन उभी राहिली. तिच्यातून एक तरुण व्यक्ति बाहेर पडली. जेकेने त्या व्यक्तीचेही स्वागत डॉ. भार्गव यांच्याचप्रमाणे मोठ्या उत्साहाने

केले. दोघेही बराच वेळ हॉटेलमधील जेकेच्या रूमवर असंच काहीतरी बोलत असताना - शेवटी हसण्याचा आवाज झाला. दोघांची ती मिटींग यशस्वी झाली असावी ! जेकेशी हस्तांदोलन करून ती तरुण व्यक्ति हॉटेलमधून बाहेर पडली व बघता बघता कारमध्ये बसून अदृश्यमान झाली ! दुसऱ्या दिवशी वाशी येथील संशोधन शाळेमधील एका तरुण शास्त्रज्ञाने राजीनामा देऊन अमेरिकेस प्रयाण केल्याची वार्ता काही वर्तमानपत्रात कुठंतरी एका छोट्याशा कोपऱ्यात अगदी आतील पानावर आली व कुणाच्याही नजरेत न भरता विस्मृतीत गेली !

□ □

सात - आठ वर्षे अशीच गेली. डॉ. भार्गव आपल्या दैनंदिन कामात मग्न होते. एके दिवशी डॉक्टरांच्या एका नातेवाईकाचं डॉक्टरना ई-मेलद्वारे संगणकाच्या पडद्यावर पत्र झळकलं - ते असं -

प्रिय ऋषि,

माझा मुलगा चारू व मी दोघेही अमेरिका सोडून जर्मनीत वास्तव्याला जात आहोत. आमच्या अमेरिकेत भारतादी आशियाई देशांमधून इथे सिलिकॉन व्हॅलीसारख्या संगणक उद्योग क्षेत्रामध्ये नोकरी करणारे हजारो तरूण हळूहळू बेकार होत चाललेले आहेत. या आशियाई संगणकतज्ज्ञांची जागा आता सर्व संगणक उद्योगांना स्वस्त व अधिक कार्यक्षमरित्या कामे करू शकणारे संगणक क्लोन्स् येथील 'जेके - तीर्थंकर इंटेलिजन्स क्लोन्स' ही कंपनी पुरवू लागलेली आहे. हे सर्व क्लोन्स म्हणजे छोटी छोटी दिसणारी चार-पांच वर्षे वयाची लहानखुरी अतिहुषार संगणकतज्ज्ञ मुले आहेत ! त्यांना संगणकांवर कोणताही प्रोग्राम, कोणत्याही संगणकीय भाषेत त्वरित आत्मसात करता येतो. हे क्लोन्स् आता फक्त 'जेके तीर्थंकर इंटेलिजन्ट् क्लोन्स्' कंपनीच जगभर पुरविणार. कारण त्यांनी त्याचे 'ग्लोबल पेटंट' घेतलेलं आहे ! त्यामुळे दुसरं कोणीच ते बनवून देऊ शकणार नाही !

काही वर्षांपूर्वी संगणक तज्ज्ञ लोकांचा ब्रेन ड्रेन होऊन भारतामधून हुषार संगणक तज्ज्ञ मंडळी अमेरिकेत येऊन स्थायिक झाली होती. आता हा ब्रेनड्रेन थांबवला तो देखील भारतीय एक उद्योगपती जेके व शास्त्रज्ञ तीर्थंकर या दोघांनी मिळूनच ... दोघेही भारतीयच ! ...

पत्र वाचता वाचता डॉ. भार्गव यांना आठ वर्षांपूर्वी हॉटेल पार्क व्ह्यू मध्ये जेके नामक कुणा अपरिचित व्यक्तीबरोबर झालेले ते संभाषण आठवले. त्यावेळी जेके त्यांना म्हणाला होता, 'बिल गेटस्‌चे आज असलेले जगातील प्रथम क्रमांकाची धनाढ्य व्यक्ति हे स्थान मी पटकावणार आहे !' मग त्यांनी आपणास दिलेली व आपण नाकारलेली ती अब्ज डॉलर्सची ऑफर, डॉ. तीर्थंकर आचार्य या तरुण शास्त्रज्ञाचं आपल्या संशोधन शाळेचा तडकाफडकी राजीनामा देऊन दुसऱ्याच दिवशी अमेरिकेस प्रयाण करणं ... वगैरे सर्व प्रसंग त्यांना एकदम आठवू लागले.

'अखेर त्या जेकेने कुठूनतरी भारतीय वंशियांच्या मेंदूतील 'इंडियन इंटेलिजन्स जीन' सुप्तावस्थेत असलेल्या त्या मेंदूतील पेशी मिळवल्याच आणि - डॉ. तीर्थंकर आचार्य या भारतीय क्लोनिंग एक्सपर्टच्या अथक् मदतीने त्यापासून क्लोन्स बनवून त्यांना संगणक प्रशिक्षित करून सर्वत्र जगातील संगणक उद्योगांना पुरवण्यात यशही मिळवले ! त्याने आपले जगातील प्रथम क्रमांकाचा श्रीमंत व्यक्ति बनण्याचे स्वप्न पुरे केले ! आणि, मी फक्त माझा एक हुषार सहकारी शास्त्रज्ञ गमावला !''

डॉ. भार्गव विचार करीत राहिले, विचार करता करता शेवटी डॉ. भार्गव यांचे विचारचक्र एकदम थांबले. आपले कुठे चुकले तेच त्यांना समजत नव्हते ! जणू काय त्यांचा ब्रेन, ड्रेन झाला होता !

◆ ◆ ◆




**'मंगळावरून येताना मौल्यवान खडक आणायला विसरू नका हं... त्या शेजारचीनं किती छान दागिने केलेत त्याचे !'**

व्यंगचित्र : सारंग यावलकर

# आपलाचि वाद आपणांशी

❒ मुरलीधर जावडेकर

***तो सगळा प्रकार डॉ. अमरेंद्र यांना अनपेक्षितच होता. आपल्या संशोधनाला असं काही फळ येईल याची त्यांनी कल्पनाही केलेली नव्हती !***

''तू लग्न करूच शकत नाहीस.''

''मी तुमची परवानगी मागायला आलेलो नाही.''

''परवानगीचा प्रश्नच नाही. तू परवानगी मागूच शकत नाहीस आणि मी परवानगी देऊच शकत नाही.''

''मी तर लग्न करायला चाललोच आहे.''

''मी तुला जाऊ देणार नाही.''

''गेल्याशिवाय मी राहणार नाही.''

''तुझा जीव गेल्याशिवाय राहणार नाही.''

''होय. होय. माझा जीव गेल्याशिवाय राहणार नाही.''

''शक्य नाही. शक्य नाही. शक्य नाही.''

''का ?''

''मी लग्न केलं नाही.''

''का ?''

''माझ्या स्वभावातच ते नव्हतं.''

''म्हणून माझ्या स्वभावात....''

''ते शक्य नाही. जे नाही त्याची वाट पाहू नकोस''

''मी काही तुमचा मुलगा नव्हे.''

''म्हणूनच.''

हा वाद एका जैवतांत्रिक बायो- टेक्नॉलॉजिकल प्रयोगशाळेत चालला होता. 'डॉ. अमरेन्द्र यांची जैवतांत्रिक प्रयोगशाळा' असा बाहेर मोठा फलकच होता. आत समोरील भिंतीवरील कॅलेंडरवर वर्ष होते - २०५०. डॉ. अमरेन्द्र हे सुमारे पन्नाशीतले शास्त्रज्ञ होते. त्यांचा पोषाख पांढराशुभ्र होता. पायांतले बूटसुद्धा पांढरे शुभ्रच होते. त्यांनी दाढी राखली होती. आणि ती अगदी वळू लागलेली आणि दुरून पांढरीच म्हणावी लागेल अशी होती. त्यांच्या डोळ्यांवर मोठ्या काचांचा चष्मा होता. आणि अंगावर पांढरा लांब गाऊन होता. त्यांच्याशी वाद घालणारा मनुष्य पंचविशीतला असावा. त्याचाही पोषाख अशा प्रयोगशाळेत काम करणाऱ्या संशोधक शास्त्रज्ञाचा म्हणजे पांढरा शुभ्र आणि वर लांब पांढरा गाऊन असाच होता. दोघांनीही डोक्याला केस झाकणाऱ्या पांढऱ्या प्लास्टिकच्या कॅप्स घातल्या होत्या आणि हातांतही पांढरे प्लॅस्टिकचे मोजेच घातलेले होते. 'लग्न करायला चाललो आहे' म्हणता म्हणताच त्या तरुणाने कॅप, मोजे, गाऊन काढून वॉशिंग मशीनमधे टाकून दिले.

एक क्षण थांबून डॉ. अमरेन्द्र पुढे म्हणाले, ''तू मुलगा असतास तर गोष्ट वेगळीच होती. बापलेकांचं कधीच पटत नाही. बापलेक विभक्त होणारच. बापलेकांत दुरावा येणारच. म्हणूनच मला मुलगा नकोच होता. माझ्याजवळ कायम राहणारा, माझ्याशी एकरूप होणारा, माझ्याशी आत्मीयता बाळगणारा...''

''माझ्यासारखा क्लोन हवा होता.''

''होय. होय. क्लोन निअरेस्ट, डिअरेस्ट, क्लोजेस्ट क्लोन.''

''क्लोन ? ... की क्लाऊन ?''

''तू माझा अपमान करतोस. मला संताप आणतोस. तू म्हणजे मीच, तर मी तुला क्लाऊन कसा समजेन ?''

''तुम्हाला हवा आहे एक निअरेस्ट, डिअरेस्ट, क्लोजेस्ट - गुलाम.''

''खोटं. खोटं. खोटं. माझं नाव - डॉ. अमरेन्द्र. सगळ्या जुन्या गोष्टींचा मला पुरा कंटाळा आला होता. त्या जुन्या चालीरीती, ते अंधविश्वास, ते पारंपारिक धर्म, म्हणून मी माझं नावसुद्धा बदलून घेतलं. जुने सगळे विषय टाकून देऊन मी फक्त विज्ञान संशोधन घेतलं. शेकडो पेटंटस घेतली आणि त्या पैशातून ही प्रयोगशाळा बांधली. हरित क्रांतीनं मेंदूत मी संपूर्ण सर्वांगीण क्रांती केली आणि माझी बुद्धी मी कोणत्याही विषयात संपूर्ण नवी सृष्टी निर्माण करण्याइतकी फुलवली. आणि अशा या बुद्धीनं माझ्या नंतरसुद्धा सृष्टीचं चित्र पूर्णपणे पालटता यावं म्हणून मी तुझ्यासारखी माझीच नवी आवृत्ती निर्माण केली. - अमर्त्येंद्र.''

''मला तुम्ही माझ्या प्रेयसीशी लग्नसुद्धा करू देत नाही. आणि ही म्हणे माझ्याशी आत्मानुभूती !''

''तू तुझ्या प्रेयसीच्या मागे गेलास की तिचा गुलाम झालास. तू तिच्या गळ्यात मंगळसूत्र घालणार पण ती तुला तिचा नवरा म्हणून दारोदार मिरवणार. तू ग्रंथालयात बसणार पण ती तुला स्वयंपाक घरात ओढून नेणार. तू प्रयोगशाळेत संशोधनात गढणार पण ती तुला आतल्या खोलीत ओढून नेणार.''

''माझी प्रेयसी अशी नाही आहे. ती माझ्याबरोबर विज्ञानातच काम करू इच्छिते.''

''भ्रम आहे तुझा. निसर्गानंच स्त्रियांना मुलं जन्माला घालण्याचं काम दिलंय. तेच त्यांचं सर्वस्व. इलाजच नाही म्हणून त्या पुरुषावर प्रेम करतात. तेवढ्यापुरतंच.''

''आता तुम्ही माझ्या प्रेयसीचा अपमान करताय. अन् तिच्यावर प्रेम करण्याची चूक करतोय म्हणून माझा अपमान करताय. मला कळलंय सगळं. तुमच्या प्रेयसीनं तुम्हाला नकार दिला त्याचा बदला तुम्ही असा घेताय. तिच्यावर प्रेम करण्याचं स्वातंत्र्य तुम्हाला होतं. मान्य. पण तुम्हाला नकार देण्याचं स्वातंत्र्य तिला होतं हे मात्र तुम्हाला अमान्य. तुम्ही स्त्री जातीचा, नव्हे मानवजातीचा, अपमान करताय.''

''नाही. नाही. नाही. माझ्या मनात स्त्रीप्रेम नव्हतं असं नाही. पण माझ्या मनात ज्ञानप्रेम जास्त होतं. तू मीच आहेस. तुझ्याही मनात स्त्रीप्रेमापेक्षा ज्ञानप्रेम जास्त आहे. तू फशी पडू नकोस म्हणून तुला मी इशारा देतोय.''

''तुम्ही मला तुमचा क्लोन म्हणून निर्माण केलंत. तुमची इच्छा पूर्ण झाली. तुमचंच मी प्रतिरूप. माझा इलाजच नाही. पण तुम्ही स्वतःला महान वैज्ञानिक म्हणवता आणि विज्ञानाचा मूल सिद्धांत विसरता. उत्क्रांती ! उत्क्रांती !! तुमचंच मी प्रतिरूप पण उत्क्रांत प्रतिरूप ! मी तुमच्यापुढे आहे. पुढचं जग पाहतोय. तुम्ही माझ्या खूप मागे आहात. तुम्हाला पुढचं दिसत नाही आहे. स्त्री प्रेमापेक्षा ज्ञानप्रेम जास्त होतं, म्हणे ! तुम्हाला स्त्रीचं जबरदस्त आकर्षण होतंच, आहेच, आणि राहणारच आहे !''

''कशावरून ?''

''माझ्यावरून ! मी तुमचंच प्रतिरूप ना? स्त्रीचं जबरदस्त आकर्षण तर पाहिजेच पण त्याबरोबर येणारी जबाबदारी मात्र नको !''

''पुष्कळ झालं. पुरे.''

''आपला दोघांचा स्वभाव अगदी सारखाच, नव्हे एकच आहे खरं. पण आपल्या दोघांच्या प्रेमपूर्तीच्या परिस्थितीत जमीन अस्मानाचं अंतर आहे, हेही खरं.''

''पुरे. पुरे. पुरे.''

''का पुरे ? अजूनही माझ्या लग्नाला पाठिंबा द्यावा असं तुम्हाला वाटत नाही. तुमच्या मते तुम्ही जगातील एकमेव अभूतपूर्व अलौकिक व्यक्ति. तुम्ही कसंही वागावं. सत्य कायमचं कधीच लपून राहत नाही. मला कळलंय सगळं !''

''काय कळलंय ?''

''माझी प्रेयसी माझी वाट बघत रडत बसली असेल. मला ताबडतोब निघालंच पाहिजे. एकच सांगतो - स्त्रीचं माझं आकर्षण जबरदस्त असणारच हे तुमच्या कहाणीवरून मला पटलं. पण त्या आकर्षणाला बळी पडून अनिर्बंध स्वैर संचार करण्याऐवजी लग्नाचं अतूट बंधन स्विकारण्याचं मी ठरवलंय. निघालो मी.''

अमर्त्येंद्र ताडताड निघून गेला. क्षणभर डॉ. अमरेंद्र त्याच्याकडे बघत पुतळ्यासारखे ताठ उभे राहिले. मग धावत जाऊन त्यांनी दारातून बघितले आणि ते उद्गारले, ''गेला. न विचारता गेला. भांडून गेला. प्रेम करतोय. स्त्रीचं मोठेपण मला शिकवतोय. मानवतेची महती मला पटवतोय. मला ! हा कसला माझा क्लोन ? हा माझा कोण ? माझा कुणीच नव्हे. माझा प्रयोग फसला, एवढा प्रयत्न केला पण फुकट गेला. हा काय माझ्यानंतर माझी प्रतिमा जिवंत ठेवणार ? आजवर मोठे लोक आपल्यामागे आपली तैलचित्रं नाहीतर पुतळे ठेवत. मी जिवंत चित्र, जिवंत पुतळा ठेवणार होतो. पण हा ... हा.... हा तर माझी प्रतिमा उजळ ठेवणारच नाही. मलीन करणार. चुकला. चुकला माझा प्रयोग. माझा प्रयोग हा. मीच केला. वाया गेला तर मीच तो नष्ट का करू नये ?''

डॉ. अमरेंद्रांच्या चेहेऱ्यावरचे भाव भराभर बदलत गेले आणि मूर्तिमंत क्रोध होऊन क्षणभर ते पुतळ्यासारखेच खिळले. मग घाईघाईनं त्यांनी खिशातून एक रिमोट कंट्रोल काढला., घाईघाईनं त्यांनी त्याच्या कळा दाबल्या आणि ते वाट बघत राहिले. फार वेळ लागला नाही. त्यांच्या सारखाच दिसणारा एक यंत्रमानव यंत्रमानवाच्या चालीने त्यांच्या समोर येऊन ठाकला आणि यंत्रमानवाच्याच सुराने म्हणाला, ''डॉ. अमरेन्द्र महाशय सरकार, आपला विजय असो ! काय हुकूम ? फर्मावा. बंदा हाजीर आहे. साहेब स्वारींनी माझं स्मरण केलं हे मला माझं भाग्य वाटतं. आपली सेवा करण्यास मला आनंद वाटेल.''

''काम तातडीनं करायचं आहे.''

''आपण सांगण्याचीच खोटी आहे.''

''काम खाजगी... गुप्त आहे.''

''फोटो, आवाज... कसलंही रेकॉर्डिंग. कुठलीही नोंद कुठेही न राहता काम केलं जाईल. बिनचूक होईल.''

''मला खात्री आहे. पण काम फार नाजूक आहे.''

''आपण नाजुकपणाचा अंश सांगा. त्या अंशानं काम केलं जाईल.''

''शाब्बास ! माणसापेक्षा यंत्रच चांगलं! माझ्यामागे माझी प्रतिमा राहावी म्हणून मी तुला तयार केलं. माझ्या बुद्धीचे सर्व घटक तुझ्या संगणकात भरले. खरोखर, तूच माझा आहेस. तो क्लोन नव्हे. तो माझा प्रयोग फसला, चुकला, वाया गेला. तो नष्ट करायचा आहे.''

''कसा ?''

''अर्थात रिव्हॉल्व्हरनं ! त्या अमर्त्येंद्राला अद्दल घडवलीच पाहिजे. माझ्या जिवानं मी त्याला मोठा केला अन् तो माझ्यावरच उलटला ! त्याल फसवून एकांतात दूर न्यायचं आणि अख्खं एक रिव्हॉल्व्हर त्याच्या डोक्यापासून पायापर्यंत त्याच्यावर रिकामं करायचं. तू रोबो

आहेस. मानवासारखा काम करणारा पण यंत्रमानव आहेस. तुला त्रास दिला तर तू बदला घेऊ शकतोस. तू माझीच प्रतिमा-चालता बोलता पुतळा आहेस. तो अमर्त्येंद्र - माझी प्रतिमा मलीन करण्याचा त्यानं विडाच उचललाय. त्याला धडा शिकवायचाच. तू कोणतीही गोष्ट करू शकतोस. रिव्हॉल्व्हरपण चालवू शकतोस. हे धर. रिव्हॉल्व्हर मीच केलेलं आहे आणि गोळ्या पण मीच केलेल्या आहेत. जगातल्या कुठल्याही रिव्हॉल्व्हरपेक्षा हे अधिक श्रेष्ठ आहे. घे. अरे, तू माझ्यासारखा बुद्धिमान आहेस. तू सापडणारच नाहीस. आणि सापडलास तरी यंत्रमानवाला थोडंच फाशी देणार ?'' आणि डॉ. अमरेन्द्र खुनशीपणानं आणि स्वतःवरच्या खुशीनं अनिवार हसू लागले.

त्यांचं हसणं संपल्यावर त्यांचा यंत्रमानव म्हणाला, ''सरकार, मी आपली प्रतिमाच आहे हे खरंच आहे आणि त्याचा मला अभिमान वाटावा, माझी मान ताठ राहावी अशीच आपण रचना केलेली आहेत, हेही खरंच आहे. पण आपल्याला आपली प्रतिमा मानवतेवर प्रेम करणाऱ्या महापुरुषाची, महात्म्याची, संताची हवी आहे आणि तसाच आदेश आपण मला देऊन ठेवलेला आहे. म्हणून मी फक्त विधायकच कार्य करू शकतो. विनाशक नाही.''

''तुझा नाश करायला मला उशीर लागणार नाही.''

''आपण तो करू शकता.''

''ठीक आहे तर. करतोच.''

असं म्हणून डॉ. अमरेन्द्र यांनी त्या यंत्रमानवासमोर दूर नियंत्रक धरला. भराभर बटने दाबली. तो यंत्रमानव खाली पडला. त्याचे डोके, हात, पाय त्यांनी तोडून फेकून दिले. त्याच्यांतल्या तारा ओढून टाकून दिल्या. सेल्स दूर भिरकावून दिले.

मग त्यांनी रिव्हॉल्व्हर समोर धरले, उघडले, सर्व गोळ्या ठिकाणी असल्याची खात्री केली आणि ते खिशात ठेवून त्या खिशावर हात धरून रागारागाने ते बाहेर पडले.

थोड्याच क्षणानंतर रिव्हॉल्व्हरचे बार ऐकू आले.

त्यानंतर काही क्षणांनी डॉ. अमरेन्द्रांना बेड्या घातलेल्या स्थितीत घेऊन एक पोलीस इन्स्पेक्टर आला, आणि म्हणाला, ''डॉ. अमरेन्द्र, हुबेहूब स्वतः दिसणारा क्लोन आणि हुबेहूब स्वतःसारखा दिसणारा यंत्रमानव तुम्ही केलात, आणि नष्टही केलात. आता जरा नीट डोळे उघडून माझ्याकडे पाहा. मीही हुबेहूब तुमच्यासारखाच आहे का ? मग मला देखील तुम्ही नष्ट करणार ?''

डॉ. अमरेन्द्र विस्फारलेल्या डोळ्यांनी मग नुसते पहातच राहिले !





# वेळेची किंमत

❒ जोसेफ तुस्कानो

*'आपले प्रियजन, आपली मुलं बाळं, शिक्षण, एखादं ध्येयवादी स्वप्न या सगळ्या गोष्टी मडक्यात अडकलेल्या त्या दगडासारख्या आहेत....'*

करकचून ब्रेक दाबीत, त्याने भरधाव वेगातली गाडी थांबविली. झटकन् दरवाजा उघडीत तो बाहेर पडला. नुकताच खणखणलेला शर्टाच्या खिशातला मोबाईल फोन काढीत, त्याने कानाला लावला. फोनवर संभाषण चालू ठेवीत, तो त्या दुकानासमोर येऊन उभा ठाकला. त्या दुकानासमोरच्या उंचीवर टांगलेल्या त्या भल्यामोठ्या पाटीवर त्याने झरकन् एक नजर टाकली. खात्री झाली, तसा तो पुढे सरकला. त्या पाटीवरील अक्षरांनी त्याचे लक्ष अचानक वेधून घेतले होते. म्हणूनच तर आपला वेगवान प्रवास त्याने ब्रेक केला होता. त्या पाटीवर मोठ्या अक्षरात लिहिले होते :

'आमच्या दुकानात सर्व काही मिळेल.

एकदा चौकशी करून जा.''

मोबाईल फोनवरील मेसेज संपताच, त्याने बटन दाबले नि दुकानातील मुख्य काऊंटरजवळ सरकत त्याने विचारले,

''तुमच्याकडे वेळ विकत मिळेल का?''

ते ऐकताच तो दुकानदारच नव्हे तर निरनिराळा माल निरखीत उभी असलेली गिऱ्हाईके देखील विस्मयित होऊन गेली. क्षणभर, तो दुकानदार संभ्रमात पडला, पण लगेच सावध होत म्हणाला, ''सॉरी साहेब, आम्ही आपली गरज पुरवू शकणार नाही.'' तेव्हा चरफडत आपल्या गाडीत परतून तो पुन्हा वेगाने परिषदेच्या दिशेने झेपावला.

गाडीच्या चाकाइतकेच त्याचे विचारचक्र देखील वेगाने फिरत होते... भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्य काळातील अस्तित्वाची अविरत प्रगती म्हणजे वेळ.... ही वेळ कधी काळाचे रूप घेते नि इतिहास बनते... विशिष्ट व्यक्ति वा घटनेशी निगडीत होऊन अमर बनते... वेळ म्हणजे एखादा प्रसंग... वेळ एक क्षणाचा असतो नि सहस्त्रावधी वर्षांचा देखील... वेळेकाळाचे भान ठेवले पाहिजे, हे तो पक्के समजून होता. कारण सतत काळाच्या पुढे जाण्याची

त्याची धडपड होती. त्यामुळे, एका वेळेला अनेक गोष्टी करण्याकडे त्याचा कल होता. तरीही वेळ पुरा पडत नाही याची त्याला पदोपदी जाणीव होत होती. त्यामुळे जरा कुठे वेळेचा अपव्यय झालेला तो खपवून घेत नसे. अर्थात, वेळोवेळी येणारे अनुभव वेगळेच संकेत घेऊन येत होते. त्याकडे दुर्लक्ष होत नव्हते ना ? .... वेळ मोजता येते.... प्रसंगी जोखता येते... अन् वेळ वाचविता देखील येते. पण, वेळ विकत घेता येत नाही, ही खंत त्याला सतत टोचत राह्यची. आपण जे काही करतोय, त्यातून आपल्या चाळीस टक्केच अपेक्षा पूर्ण होत आहेत. मग, उरलेल्या साठ टक्क्यांची आयुष्यातले अपयश म्हणून गणना करायची का ? ... या विचाराने तो अस्वस्थ व्हायचा. एक प्रकारची अपराधी भावना त्याच्या मनात सलू लागयची. मन खंतावून जायचे. आपली ही सगळी धडपड काय उपयोगाची, असं वाटून तो निराश व्हायचा.

तो रिकामा आहे नि निवांत बसला आहे, असं कधी घडायचे नाही. ऑफिसच्या कामाचा प्रचंड व्याप होताच. सोमवार ते शुक्रवार हा काळ एकच दिवसाचा आहे, अशी त्याची ग… व्हायची. एक 'वीकएन्ड' संपून दुसरा 'वीकएन्ड' येतो कधी नि तोसुद्धा निघून जातो कधी, हे त्याला कळत नसे. कागदपत्रांवर तारखा टाकताना तर त्याची नेहमीच गल्लत व्हायची. २९ किंवा ३० दिवसांचे महिने, मनगटावरील घड्याळातून तारखांची खात्री करून घेताना नेहमी धोका द्यायचे. लिखाणाचा षौक आणि समाजकार्याची आवड यातून 'वीक एन्ड' कसा भुरकन् संपायचा तेही कळत नसे. वेळ त्याला पुरत नसे. त्यामुळे नेहमी तो स्वतःवरच रागवायचा. त्यातून घरादाराकडे दुर्लक्ष व्हायचे. बायकोच्या आवडीनिवडी, मुलांचा अभ्यास, कुटुंब कर्तव्ये बाजूला सारावी लागत....

वेळेचा अंतर नि वेगाशी निकटचा संबंध विज्ञानाने दाखवून दिला होताच. वेळ कमी लागावा म्हणून अंतर कमी होणे नि वेग वाढविणे हे आवश्यक होते. त्यासाठीच तर, त्याने शहरानजिकचे हिरवेगार गाव सोडले होते. आणि शहरात कामाच्या ठिकाणाजवळ फ्लॅट विकत घेतला होता. फ्लॅट संस्कृतीचे अवघडलेपण नि संकुचितपणा त्याला रुचत नव्हता. सतत गावातील स्वच्छ हवेची, मोकळ्या वातावरणाची अन् हिरव्यागार झाडाझुडूपाची सय साद घालायची. पण आता तो एका दुष्टचक्रात सापडला होता. जगण्याच्या निमित्ताने जीवघेण्या स्पर्धेत सापडला होता. ठायीठायी, वेळ वाचविण्याचा प्रश्न उभा ठाकत होता. अंतर कमी केलं होतं, पण वेग देखील वाढवायचा होता. तेव्हा, 'स्पीडर' ही वेगवान गाडी त्यानं खरेदी केली होती. भन्नाट वेगाने गाडी चालविताना, तीन-चार जीवघेणे अपघात घडले होते. पण, त्या दुर्दैवी घटनांवर झटकन् फुंकर घालून, ते स्मृतीतून पुसून टाकण्याचा प्रयत्न देखील तत्परतेने झाला होता.

आज वेळ काढून, तो त्या 'टाईम मॅनेजमेंट' परिषदेत सहभागी व्हायला निघाला होता. तिथे वेळ व्यवस्थापन क्षेत्रातले काही तज्ज्ञ वेळेविषयी भाष्य करणार होते. ते जाणून घेण्यास तो खूप उत्सुक होता. तिथे एखादा आशेचा किरण सापडेल, असं त्याला मनोमनी वाटत होते.... अन् झालंही तसंच ! प्रगतीशील पूर्व देशातून आलेल्या एका व्यवस्थापन तज्ज्ञाने त्यांच्यापुढे एक प्रयोग करून दाखविला होता.

त्या तज्ज्ञाने एक मातीचं मडकं टेबलावर ठेवलं होतं. त्याने टेबलाखाली वाकून एक गोणपाट काढले. त्यात मुठीएवढ्या आकाराचे दगड होते. त्याने ते दगड मडक्यात भरले आणि सगळ्यांना विचारले, ''हे मडकं भरलंय् का?''

''हो,'' सर्वांनी एकसुरात म्हटले.

''खरंच ?'' त्यांनी विचारले. पुन्हा वाकून त्याने एक पिशवी टेबलाखालून उचलून घेतली. त्यात छोटे छोटे खडे होते. त्याने ते मडक्यात टाकले. मोठ्या दगडांच्या फटीतून ते खडे मडक्यात घुसले.

''आता ?'' त्याने समुहाला विचारले, ''भरलं ना, हे मडकं ?''

''बहुधा नसावं,'' श्रोते म्हणाले.

मग त्याने एका प्लास्टिकच्या भांड्यातून आणलेली वाळू त्या मडक्यात ओतली. ती वाळूसुद्धा आत घुसली.

''आता तरी ?'' त्याने आपल्या श्रोत्यांकडे पहात म्हटले.

''मुळीच नाही !'' सगळे एक सुरात ओरडले.

त्याने स्मित करीत, पाणी बाहेर काढले नि त्या गच्च भरत आलेल्या मडक्यात ओतले.

सगळेजण स्तिमित होत तो प्रयोग पहात होते. तेव्हा, त्या तज्ज्ञाने त्यांना विचारले, ''यातून काय बोध मिळतो ?''

''आपण कितीही कार्यमग्न असलो तरी आपण वेळ काढू शकतो,'' तो तत्परतेने हात वर करीत म्हणाला.

''मुळीच नाही !'' तो तज्ज्ञ म्हणाला. ''जीवनात वेळेचा योग्य वापर करायचा असला तर आपण कुठल्या कामांना प्राधान्य द्यायचे हे ठरविता आले पाहिजे. आपले प्रियजन, आपली मुलंबाळं, शिक्षण, एखादं ध्येयवादी स्वप्न या सगळ्या गोष्टी त्या मोठ्या दगडासारख्या आहेत...''

ते ऐकता ऐकता, त्याच्या लक्षात आलं... वेळेची खूप मोठी किंमत आपण देत आहोत.... गावातल्या हिरव्यागार पर्यावरणाला तो मुकला होता. दोन-चार जीवावर बेतलेले अपघात अंगावरून काढले होते. कुटुंबीयांच्या प्रेमाला पारखा झाला होता.... वेळेकाळाचे भान ठेवले पाहिजे, हे त्याला जणू उमजून आले होते. वेळेची खूपच किंमत आपण मोजली आहे. यापेक्षा जास्त किंमत देणे परवडणारे आहे का ?

एक प्रश्नचिन्ह त्याच्या नजरेपुढे उभे ठाकले होते.



# आई आम्हाला भेटेल !

❒ गजानन क्षीरसागर

***'सर, आम्ही खूप मोठे होऊं... तुमची स्वप्नं पुरी करण्यासाठी झटू.... पण आमचं आईच्या कुशीत शिरायचं स्वप्न मात्र अपुरंच रहाणार.... पण आम्ही यावरही मात करू आज ना उद्या -***

सूर्य मावळतीला टेकला आणि हळूहळू अंधारू लागलं. चौकोनी आकारांच्या आगदी छोट्या खोल्यांचं वसतिगृह विजेच्या प्रकाशानं न्हाऊन निघालं. इमारतीच्या सर्वात वरच्या मजल्यावरचे शोध दिवे लागले आणि वसतिगृहाभोवतालचा परिसरही प्रकाशात स्पष्ट दिसू लागला. वसतिगृहालगतच असलेल्या मैदानावर हालचाल वाढू लागली. मुलांचा गोंगाट वाढला आणि एक कर्णकटु शिट्टी वाजताच पुन्हा सगळीकडं चिडीचूप झालं. मुलांनी रांगा केल्या आणि एक एक रांग इमारतीच्या दिशेनं सरकू लागली. मैदानावर खेळून सगळी मुलं आपापल्या खोलीत शिस्तीत परतत होती. अवघ्या पाच-दहा मिनिटांतच मैदान मोकळं झालं. पर्यवेक्षकांनी एकवार सगळ्या मैदानावर नजर फिरवली आणि मागं कोणी राहिलेलं नाही याची खात्री पटताच तेसुद्धा आपल्या निवासाकडं निघाले.

अंधार आणखी वाढू लागला. वसति- गृहाभोवतीचा उजेड सोडला तर सगळ्या मैदानावर अंधारच होता. आता आपल्याला कुणी पाहणार नाही याची अजयला खात्री पटली. तरीही धोका नको म्हणून आणखी काही वेळ त्या झाडाआड लपून राहायचं त्यानं ठरवलं. मैदानाच्या कडेला लावलेल्या झाडांवरचे किडे आवाज करू लागले. आकाशात काही चांदण्या दिसू लागल्या. आता मैदानावर कुणाचीच चाहूल ऐकू येत नव्हती. आपल्याला खूप कंटाळा आलेला आहे हे त्याला जाणवलं आणि झाडाआडून अलगदपणे, सावधपणे तो पुढे आला. मैदान पार करीपर्यंत पावलांचा आवाजदेखील न करता तो पुढं पुढं जाऊ लागला.

एका निर्मनुष्य, ओसाड जागी अजय येऊन पोहोचला. मोडकळीस आलेल्या एका छोट्या घराजवळ येऊन तो थांबला. एकदा त्यानं सभोवार पाहून आपल्याला कोणी पाहात नाही याची खात्री करून घेतली आणि पटकन् तो त्या घरात शिरला. घराचं दारही मोडकळीस आलेलं होतं. कितीतरी वर्षं त्या घरात कुणीच राहात नसावं. जागोजागी कोळीष्टकं लागलेली होती. भिंतींचे दगड निघू लागलेले होते. घराच्या छपरातून चांदणं आत शिरलेलं होतं आणि मंद प्रकाशाचे ठिपके, पोपडे उडालेल्या जमिनीवर पडले होते.

अलगद पावलं टाकीत अजय एका खोलीत शिरला आणि मग त्यानं पत्र्याची मोडकी तोडकी गंजून गेलेली एक पेटी उघडली. सराईतपणे त्यानं पेटीच्या एका कोपऱ्यात हात घातला आणि वहीसारखं दिसणारं एक पुस्तक बाहेर काढलं. पेटीतच दडवून ठेवलेली एक अगदी छोटी विजेरी त्यानं हातात घेतली आणि त्या पुस्तकाच्या जीर्ण पानांवर हळूवारपणे हात फिरवला. पुस्तकाची पानं उलगडण्यासाठी त्यानं चंद्रप्रकाशाच्या जवळ पुस्तक आणलं आणि हवं ते पान सापडल्यावर हळूच त्यानं विजेरी लावली. हाताची ओंजळ करून विजेरीचा मंद प्रकाश फक्त पुस्तकावरच पडेल याची दक्षता घेतली आणि पुस्तकातील मजकूर मोठ्या कष्टानं, एक एक अक्षर जुळवीत तो वाचू लागला....

*''आईनं बंटीला जवळ घेतलं. त्याच्या गोबऱ्या चेहऱ्याचे भराभर पापे घेऊन ती म्हणाली, 'कुठे गेला होतास रे राजा ? माझ्या काळजाचं कसं पाणी पाणी झालं बघ. एकट्यानं असं हिंडू नये. कुठं चुकला बिकला असतास म्हणजे.....'*

*बंटी आईच्या कुशीत शिरला आणि तिला घट्ट बिलगून म्हणाला, 'आई रडू नकोस. मी आता एकटा कुठंही जाणार नाही.'*

*'शहाणा माझा बाळ !' असं म्हणून आईनं बंटीला आपल्या छातीशी घट्ट दाबून धरलं आणि त्याच्या केसात हात फिरवीत ती त्याला हळूवारपणे थोपटू लागली....''*

एवढं वाचायला देखील अजयला खूप वेळ लागला. लहानग्या बंटीचा चेहरा त्याच्या डोळ्यासमोर येऊ लागला. बंटीला आईनं छातीशी कसं घेतलं असेल याची कल्पना तो करू लागला आणि त्याच सुंदर प्रसंगात तो स्वतःला विसरून देखील गेला. खूप वेळ झाला होता. आता परत जायला हवं होतं. त्यानं ते पुस्तक पुन्हा पेटीच्या तळाशी ठेवून दिलं. विजेरी बंद करून तीही त्या मोडक्या पेटीत नीट ठेवली. पेटीवर एक दगड ठेवला आणि हळूच तो त्या पडक्या घराच्या बाहेर पडून वसतिगृहाकडं जाऊ लागला. वसतिगृहाच्या मागच्या बाजूला नेहमीच अंधार असतो हे त्याला ठाऊक होतं. उजेड टाळत तो मागच्या दरवाजापाशी आला आणि पहारेकऱ्याचं लक्ष चुकवून तो पटकन् आत शिरला. आपल्या खोलीपाशी आल्यावर त्यानं हलकेच दारावर टकटक केलं. दार किलकिलं झालं. तो आत शिरला आणि त्याच्या जोडीदारानं पाठोपाठ दार लावून घेतलं.

खोलीतला टी.व्ही. चालू होता. शेतीचा कसलातरी पाठ दाखविला जात होता. अजयनं टी.व्ही. कडं एक नजर फिरवली आणि आपल्या कॉटवर जाऊन तो आडवा झाला. त्याचा जोडीदार हळूच त्याच्याजवळ आला आणि म्हणाला -

'वाचलीस पुढची गोष्ट ?'

'हो वाचली. पण अगदी थोडीच. फार वेळ लागला. पडक्या घरात बसायची भीती वाटते.'

'काय वाचलंस सांगना !' जोडीदारानं उत्सुकतेनं विचारलं -

'सापडला का बंटी ?'

'हो सापडला !'

'मग ?'

'पुढचं मला काही नीटसं कळलं नाही. बंटीला कुणीतरी आईनं जवळ घेतलं !' तो म्हणाला.

जोडीदार गोंधळला. त्यालाही या वर्णनाचा अर्थ उलगडला नव्हता. त्याने विचारलं, 'आईनं जवळ घेतलं.....'

'नुसतं जवळच नाही घेतलं तर त्याच्या गालाचे पापेसुद्धा घेतले !'

'पापे घेतले ? आईनं ?' जोडीदाराच्या स्वरात कमालीचं आश्चर्य दडलेलं होतं. कल्पनाशक्तीला कितीही ताण दिला तरी कुणीतरी एका छोट्या मुलाला जवळ घेणं, त्याचे पापे घेणं, ही घटना त्याला अशक्य वाटत होती

'होय... पापे घेतले. त्याला छातीशी घट्ट दाबून धरलं आणि बंटीच्या केसात हात फिरवून तिनं त्याला थोपटलं देखील' तो म्हणाला.

जोडीदार काही क्षण गप्प राहिला. ही काहीतरी अद्भुत घटना आहे, हे त्याला जाणवत होतं. पण तिचा नेमका अर्थ त्याला उलगडत नव्हता.

'छे.... काहीतरीच ... असं कुणी करतं वाटतं ? आपण चुकलो तर पर्यवेक्षक आपल्याला शिक्षा करतात. हातावर फटके मारतात...'

'आणि दुसऱ्या दिवशी मग आपल्याला जेवायलासुद्धा देत नाहीत....'

'हो ना ! आणि या गोष्टीत तो बंटी चुकला तरी त्याला काही म्हणजे काही सुद्धा झालं नाही. असं घडणं शक्यच नाही....' जोडीदार ठामपणे म्हणाला; 'मग पुढे काय झालं ?'

'सांगतो ना, पुढचं वाचायला मला जमलंच नाही.'

'मग तू ते पुस्तक इकडेच का घेऊन येत नाहीस ?'

'तुला कुठं वाचता येतंय्' अजयनं म्हटलं.

'तेही खरंच !' जोडीदार हिरमुसला झाला. काही वेळानं तो म्हणाला, 'आता वाचता येण्याची गरजच नाही. सगळं टी.व्ही.वर दिसतं. 'गोष्ट, गाणी, आपले पाठ. जगातल्या सगळ्या घटना.'

'ते झालंच.' अजय म्हणाला. 'पण ते काय दाखवतात तेच आपल्याला पाहावं लागतं. पुस्तकात तसं नसतं. आपल्याला जे हवं तेवढंच आपल्याला वाचता येतं.' अजय म्हणाला, 'शिवाय चित्रं नसल्यास आपल्याला कल्पनासुद्धा करता येतात...''

जोडीदार गप्प बसला. अजय म्हणतो ते खरेच आहे, हे मनोमन त्याला पटलं होतं. ही बंटीचीच गोष्ट पाहा ना ! कशी दिसत असेल त्याची आई.... पण आई म्हणजे काय ? आई कुणाला होता येतं ? जोडीदार खूप गोंधळला आणि शेवटी काहीच सुचलं नाही तेव्हा डोक्यावर पांघरूण घेऊन मुकाट्यानं पडून राहिला. अजयनं घोटभर पाणी प्यायलं. टी.व्ही.चं बटन बंद केलं आणि खोलीतला दिवा मालवून तोही आपल्या कॉटवर पडून राहिला....

बराच वेळ शांततेत गेला. जोडीदाराची चुळबूळ चाललेली आहे, हे अजयला जाणवत होतं. त्यानं हळूच विचारलं, 'झोप नाही का येत ?'

'नाही !'

'का रे ?'

'मला ते पुस्तक वाचावंसं वाटतंय... मला वाचायला शिकवशील ?'

'शिकवीन.' अजय हलक्या स्वरात म्हणाला, 'पण आपल्याला कुणी पकडलं म्हणजे ? शिवाय पुस्तक इथं खोलीवरही आणता येणार नाही. सकाळी खोली साफ करताना सापडलं तर.....'

'तेही खरंच.... मग काय करायचं ?''

'बघू. तू आता झोप.'

नेहमीप्रमाणं दिवस सुरू झाला. सकाळी सहा वाजता दोघंही उठले. सगळं आवरलं. वसतिगृहात सगळीकडं हालचाल सुरू झालेली होती. व्यायाम आटोपून सगळी मुलं सकाळची न्याहारी करून एका मोठ्या हॉलमध्ये जमली. समोर मोठा पडदा होता आणि त्या पडद्यावर आता पुढचे पाठ सुरू होणार होते. हॉलमधला पडद्याजवळचा हिरवा दिवा लागला. हॉलचे दरवाजे आपोआप बंद झाले आणि कसलं तरी संगीत ऐकू येऊ लागलं. स्फूर्ती आणणारं. नव्या दिवसासाठी उत्साह निर्माण करणारं. संगीत संपलं आणि पडदा उजळला. पडद्यावर आजच्या अभ्यासाचा पाठ दिसू लागला. शिक्षक समजावून सांगू लागले. निरनिराळ्या संगणकीय आकृत्या पडद्यावर दिसू लागल्या... कृषिशास्त्राचा तो पाठ होता. निरनिराळी धान्यं, त्यांचं बियाणं... ते तयार करण्याची पद्धती... रोपांची लागवड... मातीशिवाय शेती.... असे एक ना दोन अनेक विषय त्यांच्यापुढं उलगडत होते....

अजय आणि त्याच्या जोडीदाराचं मात्र पडद्याकडं बिलकुल लक्ष नव्हतं. दोघांच्याही डोळ्यासमोर आईच्या कुशीतला बंटी तरळत होता...

काही वेळात पाठ संपला. हॉलचे दरवाजे आपोआप उघडले गेले. सगळी मुलं बाहेर पडली आणि मोकळ्या मैदानावर ऊन खायला पळत सुटली. ते दोघंही यांत्रिकपणे मैदानाच्या दिशेनं जाऊ लागले. पण त्यांच्यातला उत्साह कुठंतरी हरवला होता. हळूहळू ते मैदानाच्या कडेला आले आणि जोडीदारानं हळूच विचारलं -

'अजय, आपण ते पुस्तक वाचायला जाऊया का ?'

अजय थबकला आणि म्हणाला, 'खरं तर मलाही जावंसं वाटतंय.... पण आपल्याला कुणी पकडलं म्हणजे ? सगळंच बिंग फुटायचं.'

'तेही खरंच !' जोडीदार हिरमुसून म्हणाला.

'आपण आज रात्री जाऊ.'

'पण वसतिगृहातून बाहेर कसं पडायचं? मोठा दरवाजा बंद असतो.'

'आपण मैदानावरून संध्याकाळी वसतिगृहाकडं जायचंच नाही.' अजय म्हणाला, 'कुठंतरी लपून बसायचं. चांगला अंधार पडला की तिकडं जायचं. रात्रभर तिकडंच आपण राहू आणि सगळी गोष्ट वाचू...'

जोडीदाराला ही कल्पना पसंत पडली खरी; पण भीतीनं त्याचं हृदय आतापासूनच धडधडू लागलं.....

मैदानावर संध्याकाळी मुलं जमली. खूप खेळ सुरू झाले. निरनिराळे व्यायाम झाले. शिक्षक सर्व मुलांवर बारकाईनं लक्ष ठेवून होते. अंधारून आलं तशी सगळी थांबली आणि मुलं कलकलाट करीत आपापल्या खोलीकडं निघाली.

अजय आणि त्याचा जोडीदार असे दोघेजण मात्र, सगळ्यांची नजर चुकवून मागेच राहिले. मैदानाच्या कडेला असलेल्या दगडांच्या ढिगाआड दोघेही लपून राहिले आणि आता सगळेजण निघून गेलेले आहेत याचा खात्री पटल्यावर, दोघांनीही त्या घराकडं मोर्चा वळवला.

अतिशय सावधगिरीनं ते घरात शिरले. अजयनं पुस्तक काढलं आणि बॅटरीच्या प्रकाशात तो पुढची गोष्ट वाचू लागला. जोडीदाराला ऐकू जाईल इतपत मोठ्या आवाजात एक एक अक्षर जुळवीत तो गोष्ट वाचत होता.....

बंटीची आई, त्याच्यासाठी ती उपसत असलेले कष्ट; पुस्तकांच्या मदतीनं बंटी करत असलेला अभ्यास, भूक लागल्यावर शेगडी पेटवून आईनं केलेला स्वयंपाक, बंटीचा खोडकरपणा...

एक ना दोन अनेक अद्‌भुत घटना त्या गोष्टीत दडलेल्या होत्या आणि त्या ऐकत असताना जोडीदार क्षणाक्षणाला आश्चर्यचकीत होत होता. गोष्टीतले प्रसंग त्या दोघांच्याही डोळ्यासमोर तरळू लागले आणि त्या स्वप्नमय वातावरणातच दोघांच्याही डोळ्यावर झोप केव्हा आली हे समजलंच नाही.

जाग आली तेव्हा दोघंही आपल्या खोलीतच आहेत, हे पाहून अजयला आश्चर्य वाटलं. त्यानं पाहिलं. जोडीदार अजूनही झोपेतच असावा. त्याला हलवून त्यानं जागं केलं आणि म्हटलं,

'ऊठ... ऊठ .... आपण आपल्या खोलीत कसे आलो ?

जोडीदार उठला. त्याच्या चेहऱ्यावरही प्रथम आश्चर्य तरळलं आणि त्या पाठोपाठ त्याच्या नजरेत भीती दिसू लागली. तो पटकन् अंथरुणावर उठून बसला आणि म्हणाला, 'अजय, आपण तर त्या घरातच झोपलो होतो. मग इथं कसे आलो ?'

बहुधा आपल्या पाळतीवर कुणीतरी असावं आणि त्यांनी झोपेतच आपल्याला उचलून इथं आणलं असावं, असा तर्क अजयनं केला आणि घाबऱ्या स्वरात त्यानं म्हटलं, 'आपण पकडले गेलोय.'

'मग काय होणार ?'

'शिक्षा... दुसरं काय ?' अजय उद्‌गारला.

'पण मग बंटीचं पुस्तक ?'

'ते बहुधा जप्त होणार.....'

'पण त्यांना कुठ वाचता येतंय् ?'

'आपल्याला काय ठाऊक ? कदाचित येतही असेल' अजय आता गंभीर झाला होता. आपल्याला या वसतिगृहातून आणि शाळेतून हलवतील. कुठेतरी कष्टाचं काम करायला पाठवतील, अशी भीती त्याला वाटू लागली.

जोडीदारालाही त्या संकटाची कल्पना आली असावी. एखाद्या भेदरलेल्या कोकरासारखा तो अंथरुणावरच अंगाची जुडी करून बसून राहिला.

नेहमीप्रमाणंच वर्ग सुरू होणार असल्याची सूचना देणारी घंटा वाजली. भराभरा आवरून अजय आणि जोडीदार वर्गाकडं निघाले. हॉलमध्ये ते आले आणि त्याचवेळी हिरवा दिवा लागला. हॉलची दारं मात्र आतून बंद कशी झाली नाहीत, याचं सर्वांनाच नवल वाटलं. काही वेळ गेला आणि प्रोफेसर शारंगपाणींनी वर्गात प्रवेश केला. त्यांच्या पाठोपाठ दार बंद झालं.

आता पडद्यावर प्रकाश पडेल आणि पाठ सुरू होईल, अशा अंदाजाने असलेल्या विद्यार्थ्यांमध्ये चुळबूळ सुरू झाली. आज शारंगपाणी सर कसे आले ? ते काय शिकवणार आहेत, याची उत्सुकता प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होती.

प्राध्यापक शारंगपाणींनी शांत नजरेनं वर्गावर नजर फिरवली आणि अजयकडं पाहून स्मित केलं. अजय भांबावला. सरांनी आपल्याला पकडलेलं आहे, हे त्याच्या लक्षात आलं.

शारंगपाणींनी सगळ्या वर्गाला उद्देशून म्हटलं -

'मुलांनो, आज तुम्हाला मी एक गोष्ट सांगणार आहे. बंटी नावाच्या मुलाची गोष्ट !'

अजय आश्चर्यचकित झाला. बंटीची गोष्ट ! म्हणजे सरांनी आपलं पुस्तक जप्त केलं तर... मग तेच आपल्याला पुन्हा खोलीत घेऊन आलेले नसतील ना ? पण मग सर रागावले कसे नाहीत ?

आपल्याला कोणती शिक्षा होणार ? आणि बंटीची गोष्ट सरांनीही वाचली तर ! म्हणजे सरांना वाचता येतं ? एक ना दोन अनेक प्रश्नांनी त्याच्या मनात गर्दी केली. आणि मग आपण

पुस्तकात वाचलेलीच गोष्ट सर सांगत आहेत, हे त्याला जाणवलं.

गोष्ट संपली. मुलं आश्चर्यचकित झाली होती. गोष्टीतलं सगळं वातावरण त्यांना नवीन होतं. छोटीशी घरं, त्यात राहणारी मुलं, त्यांचे आई-वडील, घरी आई करत असलेला स्वयंपाक... पुस्तक वाचून अभ्यास करण्याची पद्धत, पटापट वाचू शकणारी लहान लहान मुलं. सगळं काही नवीन आणि अद्‌भुत होतं खरं ! असं कुठं असतं का ? अशी घरं, अशा शाळा कुठं असतात ?

वर्ग संपला, मुलं बाहेर पडली तरी अजय आणि त्याचा जोडीदार तसेच बसून होते. शारंगपाणी सर त्यांच्याजवळ आले तेव्हा दोघांनाही हुंदका आवरला नाही. सरांनी प्रेमळ आवाजात त्यांना विचारलं,

'तुम्हाला खेळायला जायचं नाही ? झोप येतीये ?

'सर, आम्हाला क्षमा करा. तुम्हाला सगळं ठाऊक झालंय, होय ना ?' अजयनं विचारलं.

'होय ! तुम्हा दोघांना झोपेत असताना मीच घेऊन आलो ! सर न रागावता बोलत होते.

'पण तुम्हाला आमचं गुपित कसं समजलं?'

'तुम्हा सर्व मुलांवर माझं लक्ष असतं. संगणकाची नजर सगळीकडं फिरते आणि त्याच्या मदतीनं मला सगळ्या गोष्टी समजतात, सर म्हणाले, 'पण अजय', मला सांग, असं चोरून त्या पडक्या घरातलं पुस्तक वाचायला तू कशाला जात होतास ?'

'सर .... सर... मला ते पुस्तक फार आवडलं होतं....'

'तुला वाचता येतं?'

'होय, सर्व पर्यवेक्षकांची नजर चुकवून मी वाचायला शिकलो. पण अक्षरं मला कशी ओळखू आली, त्यांचे उच्चार कसे समजले, हे मात्र मला नाही सांगता येणार....'

'तेच आम्हाला शोधून काढायचं आहे!' प्रा. शारंगपाणींचा स्वर क्षणभरच गंभीर झाला आणि क्षणार्धात ते पूर्वीच्याच प्रेमळ आवाजात म्हणाले.

'अजय, बंटीची गोष्ट मी देखील वाचली !'

'खरंच ! तुम्हाला देखील वाचता येतं सर? आवडली तुम्हाला गोष्ट ?'

'हो खूप आवडली. पण तू ती वाचायला नको होतीस !'

'का सर ?'

'अरे, ती गोष्ट, खूप खूप जुन्या काळातली आहे. त्यावेळी सगळंच वेगळं होतं.'

'म्हणजे काय सर ?' जोडीदारानं विचारलं.

'तुम्हाला कसं समजावून सांगू ?' शारंगपाणी काहीसे गोंधळले आणि मग त्यांनी म्हटलं, 'फार फार वर्षांपूर्वी मुलांना वेगवेगळी घरं होती. घरात त्यांचे आई-वडील असायचे. मुलांवर त्यांचं खूप लक्ष असायचं.'

'म्हणजे आता संगणक आणि तुम्ही आमच्यावर ठेवता तसं ?' अजयनं विचारलं.

'नाही. त्यापेक्षाही वेगळं. मुलांची आई असायची. मुलांना लागलं, दुखलं तर ती त्यांना जवळ घ्यायची.'

'म्हणजे बंटीच्या आईसारखी, होय ना?'

'होय. बंटीच्या आईसारखी. आईनं मुलांना जवळ घेतलं की मुलांचं दुःख लागलीच पळून जायचं.' शारंगपाणी म्हणाले.

'मग आम्हाला पण आई आणा की सर...' जोडीदारानं म्हटलं.

शारंगपाणी खिन्न हसले आणि जोडीदाराला जवळ घेत त्यांनी समजावणीच्या स्वरात म्हटलं -

'आता ते कसं शक्य आहे ? आताच्या या युगात तुम्हा कुणालाच आई मिळणार नाही. बाळांनो, या नव्या युगात विज्ञानानं एवढी प्रगती केलेली आहे की आता आईविना मुलं जन्माला येतात. जन्म घेण्यासाठी पूर्वी आई लागत असे. आताच्या काळात तिची गरज राहिलेली नाही.'

'म्हणजे काय सर ?' अजय गोंधळून गेला होता. आईविना बालपण म्हणजे काहीतरी महत्त्वाचं हरवल्याची जाणीव आता अधिक गडद होऊ लागली. त्याचा गळा दाटून आला अणि त्यानं केविलवाण्या आवाजात म्हटलं -

'सर, आई नसेल तर आम्ही बंटीसारखं कुणाच्या कुशीत शिरायचं ? आमच्या पाठीवर प्रेमानं कुणी हात फिरवायचा ? मग आम्ही जन्मालाच का आलो सर ? आणि आमचा जन्म तरी कसा झाला ?'

शारंगपाणी क्षणभर स्तब्ध उभे राहिले आणि शेवटी काहीशा जड आवाजात त्यांनी म्हटलं -

'अजय, आपल्या या वसतिगृहातल्या सर्व मुलांचा जन्म पेशींपासून झालेला आहे. मानवी शरीरातल्या पेशींपासून जन्माला आलेली तुम्ही मुलं आहात. तुम्हाला आई नाही आणि आई मिळण्याची शक्यताही नाही. एखाद्या झाडाला जशा आपोआप फांद्या येतात, फुटवे फुटतात, तसे तुम्ही म्हणजे मानवाचेच, पण फुटवे आहात.... हवी तशी, हव्या तेवढ्या प्रमाणात प्रजा निर्माण करण्याचं, क्लोन तयार करायचं हे शास्त्रच तुमच्या आईच्या मुळावर आलेलं आहे... आईविना वाढणारी मुलं मोठेपणी कशी होणार, तुमचे स्वभाव कसे बनणार, तुम्ही नारायण होणार की नरराक्षस होणार, हेच आम्हाला अजून समजलेल [illegible] ... पण... पण...'

'पण काय सर ?' अजयनं कातर स्वरात विचारलं.

'पण आमचा मानवाच्या मेंदूवर, त्याच्या बुद्धिमत्तेवर ... शहाणपणावर विश्वास आहे. तुम्हाला मायेची ऊब हवी आणि ती देण्याचाही आम्ही प्रयत्न करू... तुमच्यातूनच विश्वाची प्रगती साधणारे नागरिक निर्माण करण्याचा आम्ही प्रयत्न करू... पूर्ण पुरुषाचं वेदांना पडलेलं

स्वप्न खरं करण्यासाठी, आज आम्ही विज्ञानाच्या वाटेनं जात आहोत. ही वाट कशी असेल, हे पुढं पाऊल टाकल्याखेरीज समजणं कसं शक्य होईल ?'

अजय गोंधळला होता. जोडीदार भांबावून शारंगपाणींच्या तोंडाकडं पाहात राहिला. दोघांनीही एकमेकांकडं पाहिलं आणि अखेर न राहवून दोघंही शारंगपाणींना बिलगले.

'सर... सर...'

'काय रे बाळांनो....'

'सर, आम्ही खूप मोठे होऊ. तुमची स्वप्नं पुरी करण्यासाठी झटू.... पण आमचं आईच्या कुशीत शिरायचं स्वप्न मात्र अपुरंच राहाणार. पण आम्ही या संशोधनावरही मात करू आणि आज ना उद्या आई आम्हांला भेटेल.'

'हो ना सर!' जोडीदार पुटपुटला, 'आईविना सगळं जग भिकारीच राहाणार, नाही का?

प्रोफेसर शारंगपाणींचे डोळे भरून आले होते आणि त्यांचा उबदार हात त्या दोघांच्याही पाठीवरून हळूवार फिरत होता!

